शाळांतून चालण्यासाठीं मंजूर झालेलें.

# पद्यसमुच्चय

रा. भि. जोशी.

आवृत्ति आठवी.

किंमत ९ आणे.

# पद्यसमुच्चय



( मराठी कवितांचे वेंचे, टीका व कविपरिचय यांसहित )

**रामचंद्र भिकाजी जोशी**

न्यू इंग्लिश-स्कुलांतील माजी शिक्षक, प्रौढबोध व बालबोध
व्याकरण, मराठी भाषेची घटना, सुलभ अलंकार,
शब्दसिद्धि, इत्यादि पुस्तकांचे कर्ते,
यांनीं तयार केलें.



**आवृत्ति आठवी, प्रति ३०००.**

[ हें पुस्तक मराठी व इंग्रजी शाळांतून शिकविण्यासाठीं मेहेरबान डायरेक्टर साहेब यांनीं मंजूर केलें आहे ].



सन १९२४.



**किंमत नऊ आणे.**

---

**लक्ष्मण भाऊराव कोकाटे**, यांनीं ' हनुमान प्रेस, '
घ. नं. ३०० सदाशिव पेठ, पुणें येथें छापिलें.
व
**माधव रामचंद्र जोशी**, बी. ए. यांनीं नारायण पेठ
घ. नं. २९९ येथें प्रसिद्ध केलें.

# प्रस्तावना.



प्रस्तुत पुस्तक सन १८८५ सालीं पुणें, न्यू इंग्लिश स्कूल मध्यें शिकविण्यासाठीं तयार केलें. तेव्हांपासून हें त्या शाळेंत उपयोगांत आहे. सन १८९९ सालीं हें शाळाखात्यानें मंजूर केल्यापासून दुसऱ्या अनेक शाळांत चालू आहे. हें प्रथमतः तयार केलें तेव्हां नवीन कविता फारशी प्रचारांत नव्हती, यामुळें बहुतेक उतारे जुन्या कवितेचेच घेतले होते. अलीकडे नवीन कविता लोकप्रिय झाल्यामुळें नवीन कवींचे उतारे या आवृत्तींत जास्त घेतले आहेत. नवीन घातलेल्या कवितांची याद प्रस्तावनेच्या शेवटीं दिली आहे.

पुस्तकाच्या शेवटीं कठीण शब्दांचा लहानसा कोश होता. सांप्रत मुलांना उपयोगितां येण्यासारखीं स्वतंत्र कोशांचीं लहान पुस्तकें उपलब्ध असल्यामुळें हा कोश काढून टाकून, त्या जागीं ज्यांच्या कवितांचे उतारे पुस्तकांत घेतले आहेत अशा कवींचीं लहान इतिवृत्तें दिलीं आहेत. ही व्यवस्था विद्यार्थ्यांस अधिक उपयुक्त होईल.

पुस्तकांत छपाईचीं अशुद्धें राहिलेलीं आढळलीं, त्यांचें शुद्धिपत्र शेवटीं जोडलें आहे.

नवीन उतारे—भाग १—४, १२, १५, २०, २१, २५, २६.
भाग २—२, ५, ११, १५, २०.
भाग ३—४, ९, १२, १४, १६, १८.

पुणें,
जून, १९२४.

रा. भि. जोशी.

# अनुक्रमणिका.

## भाग पहिला.



## भाग दुसरा.

## भाग तिसरा.

# पद्यसमुच्चय

## भाग पहिला



### १ विश्वमंदिर.

विश्व हें च परमेश्वराचें मंदिर म्हणजे देऊळ आहे. जे कोणी ईश्वराविषयीं आस्तिक्यबुद्धि धरितात, त्यांस या विश्वमंदिरांत च परमेश्वर दिसत असतो; व परमेश्वरनिर्मित जे अनेक सृष्टिशोभेचे प्रकार, त्यांचे योगानें त्यांचे मनाची तृप्ति होते. या मंदिरांतील अतिरमणीय शोभा दाखविण्यास तत्ववेत्ते हे च दूत दारांत उभे आहेत, ते लोकांचा आंत प्रवेश करून देतात, असा यांत भावार्थ आहे.

श्लोक.

ईशें विश्व-विशाल-मंदिर पहा ऐसें कसें निर्मिलें !
शोभा दाखविण्यास हेर रुचिरीं द्वारीं उभे ठाकले;
येती प्रेक्षक जे, तयांस बघुनी ते बाहती सत्वरीं:--
"या हो या, जन हो, विलोचनसुखा घ्या, या शिरा मंदिरीं! १
या हो आंत, पहा चमत्कृति किती, द्या इंद्रियां तर्पण,
नेत्रां चित्र मनोहराकृति, तसें श्रोत्रांस मंजु स्वन;
द्वारीं मात्र करा प्रणाम शिरसा त्या ईश्वरातें अधीं,
जो दे सर्व तुम्हां, तया स्तुतिसुमां अर्पा तुम्ही, हो सुधी!" २
येणेपरी नमुनियां जन आंत जाती,
विश्वास पूर्ण धरुनी बहु सौख्य घेती;
वाहे समीर, मकरंद हरी फुलांचा,
संताप सर्व शमवी झणि मानसींचा. ३

श्रवण, नयन धाले, लोटला मोदपूर,
हृदयिं विकसलें तें प्रेम विश्वास थोर;
नयनगति हि जेणें बद्ध केली पुरा, तें—
पटल गळुनि जातें; गूढ ना तैं नरातें. ४
जें अगम्य मुनिदृष्टिस होतें,
विश्वकर्तृमुख आज दिसे तें:
प्रीतिचा प्रभु असे चि भुकेला,
हा प्रसाद मनुजांवरि केला. ५
जे न वंदिति पदांस विभूच्या,
भाव ही न धरिती वरि त्याच्या,
ते जरी प्रविशती सदनांत,
त्यांस हा सुखनिधी न मनांत. ६

महाजनी.

---

## २ विद्याप्रशंसा.

विद्येच्या योगानें मनुष्यास कोणते कोणते लाभ होतात हें यांत वर्णिलें आहे. ही कविता कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं लिहिलेली आहे.

### आर्या.

विद्येनें च मनुष्या आलें श्रेष्ठत्व या जगामाजी.
न दिसे एक हि वस्तू विद्येनें ही असाध्य आहे जी. १
स्वाभाविकां गुणांहीं केवळ बघतां समस्त सृष्टींत,
प्राणिगणीं मनुजापरि पंगू एक हि नये च दृष्टींत. २
सिंह-व्याघ्र-गजादिक असती मनुजाहुनी बळें अधिक,
भासे जयांपुढें हा बलहीन क्षुद्र, जेंवि कीं मशक. ३
देहाच्या सौंदर्यें, स्वैरगतीनें हि पाहतां दिसती-
पक्षी लक्षावधि ही, जे श्रेष्ठ नराहुनी बहुत असती. ४
राजा भर्तृहरि ह्मणे, 'नर विद्याहीन पशु च जाणावा,'

परि मज वाटे, तो पशु-पेक्षां ही फार नीच समजावा ! ५
विद्याबलसम अढळे न दुजें बल कोणतें हि या लोकीं,
तीनें निजप्रभावें वश केलें सकल विश्व, अवलोकीं ! ६
क्षुद्रा पशुपक्ष्यांची काय कथा ? पांच ही महाभूतें—
ज्ञानबळें आकळुनी, केलें मनुजें स्वदाससम त्यांतें. ७
विसरुनि परस्परांचा विरोध, जल-वन्हि सेविती त्यातें,
दासापरि वश होउनि करिती त्याच्या समस्त कृत्यांतें. ८
त्याचीं वस्त्रें विणिती, रथ ओढिति, लोटती हि नौकेतें,
बहु सांगणें कशाला ? करिती तो सांगतो तयां तें तें. ९
मोठे मोठे तरुवर मोडी, फोडी तशा शिलाराशी,
विद्युल्लता नरें ती केली संदेशहारिका दासी. १०
विद्येच्या सामर्थ्यें केला रवि चित्रकार मनुजानें,
होउनि अंकित वायु हि तुष्ट करी त्यास सुस्वरें गानें. ११
व्यासादिक आद्यमुनी, कवि अर्वाचीन सर्व थोर तसे,
म्हणती एकमतें कीं, 'धन विद्यासम नरास अन्य नसे.' १२
देउनि किंवा भोगुनि उणें न होतां सदैव वाढतसे,
ऐसें एक च विद्याधन; अद्भुत गुण न हा दुज्यांत वसे. १३
न बलात्कारें राजा, न चोर कपटें जया हरायास-
होई समर्थ, ज्याच्या अल्प हि संरक्षणीं न आयास. १४
नानाविध रत्नांचीं कनकाचीं असाति भूषणें फार,
परि विद्यासम एक हि शोभादायक नसे अलंकार. १५
या साऱ्या भुवनीं हित-कर विद्येसारखा सखा नाहीं;
अनुकूळ ती जयाला नित्य, तयाला उणें नसे कांहीं. १६
गुरुपरि उपदेश करी, संकटसमयीं उपाय ही सुचवी;
चिंतित फळ देउनियां कल्पतरूपरि मनोरथा पुरवी; १७
कांतेपरी निरंतर हृदयातें हर्षवूनियां रिझवी;
आनंदसागरीं मन बुडवुनि चिंताज्वरास ती विझवी. १८
जी करि मर्त्य नराला अजरामर, ती सुकीर्ति मिळवाया-
विद्या च साधन खरें, पुढें तिच्या अन्य साधनें वायां. १९

भूमंडळीं पसरलें यश रामयुधिष्ठिरादि राजांचें.
परि तें फळ वाल्मीकि-व्यासांच्या प्रौढवाणिचें साचें. २०
नाहीं परोपकारापरि दुसरें थोर पुण्य, हें वचन--
सत्य असे, तरि विद्यादानाशीं तुल्य पुण्य आणिक न. २१
ऐश्वर्य-बल-धनादिक सौख्यें प्रसवे समस्त जी कांहीं,
ती विद्या जो देई तेणें वद काय तें दिलें नाहीं ? २२
यापरि सकळ सुखें जी देई, दुःखें समस्त जी वारी.
त्या विद्यादेवीतें अनन्यभावें सदा भजा भारी. २३

पद्यरत्नावलि.

---

## ३ संस्कृत व मराठी.

आमच्या विद्वान् लोकांना हल्लीं जसा स्वभाषेविषयीं कंटाळा वाटत असतो, तसा पूर्वी संस्कृत पंडितांना ही वाटत असे. प्राकृतांत कोणी ग्रंथरचना केली असतां त्या वेळचे शास्त्रीपंडीत तिचा तिरस्कार करीत. या गोष्टीला उद्देशून कवि म्हणतो, कीं सर्वज्ञ पंडीत संस्कृत ग्रंथ वाचतील; पण आमच्यासारखे अज्ञ, साधे लोक, हे देशभाषेंतलि ग्रंथांवर निर्वाह करितील; कारण परमेश्वरास दोन्ही सारखींच.

### ओंव्या.

सुरस, सुंदरीं, पवित्रसृष्टीं । पक्कानें निपजवूनि पाठीं,
संस्कृत-शब्द-सुवर्ण-ताटीं । श्रेष्ठांश्रेष्ठां वोगरिलीं. १
तें चि रसायन दुर्बळपणीं । महाराष्ट्रभाषा-रंभा-पर्णीं,
वाढिलें, तरी भुकाळू-जनीं । न सेविजे किमर्थ ? २
समर्थपणें कवि पंडितीं । सर्वज्ञतेच्या रत्नदीप्तीं,
निर्गुण निर्विकार पशुपती । कनक-कमळीं अर्चिजे. ३
तेथें भावार्थी मी दुर्बळ । धत्तूर-पुष्प माझे बोल,
अल्पमतीचेनि मोल । काढावितीं ते कैंवी. ४
तथापि दोहीं ठायीं सरिसा । मोह कराल हा भरंवसा,

कां सान थोर महेशा । भजतां असे कडसणी ! ५
आणि ईश्वरस्वरूपीं डोळस । त्यांसी वर्णावर्णी द्वेष--
नुपजे, जैसा सूर्य-प्रकाश । नेणे कदां तमातें. ६
तेवीं अर्थीं घालितां दृष्टी । न म्हणे संस्कृत-मराठी,
रत्न-कुंभीं कीं मृत्तिका-घटीं । गंगोदक सारिखें. ७
व्यास-वचन इक्षु-दंडू । गाळुनी सुरस सारांश गोडू,
देशभाषा वळिले लाडू । नावडेचे आवडी. ८
ते जैसे सुज्ञीं न सेवणें । तैं आग्रहावांचून काय म्हणणें,
कळंकरेखेस्तव चांदणें । काय चकोरीं वाळिजे ? ९
व्यास-ग्रंथ-गिरीचें सोनें । संस्कृत-खोटिये गाळूनि मनें,
देषभाषां घडिलें लेणें । साहित्यरत्नीं सुजडित. १०
तें लेवविता कर्णभूषण । कां हो परते करावे कान,
श्रोते हो, तुम्ही विचक्षण । निर्मत्सर विचारा ! ११

मुक्तेश्वर.

---

## ४ मनास बोध.

हा उतारा रामदास स्वामींच्या प्रसिद्ध मनाच्या श्लोकांपैकीं आहे. यांत मनाचे द्वारें लोकांस बोध केला आहे. या काव्याचे संबंधानें न्यायमूर्ती **रानडे** यांनीं एकदां असें म्हटलें होतें;—"जिवंत वाणीनें श्रोत्यांचें मन तेव्हां च वळतें, उशीर लागत नाहीं; आणि तशी वाणी समर्थांची होती म्हणून तिनें तें कार्य झालें. अशी जिवंत वाणी मुखावाटे निघण्यास अंतःकरण शुद्ध, पवित्र आणि प्रेमळ पाहिजे. समर्थांनीं भिक्षा मागितली, त्यास छत्रपतींनीं राज्याची भिक्षा घातली; आणि इतर भिक्षेकरी कंठशोष करितात, त्यांस मूठभर धान्य मिळण्याची मारामार पडते. हें सगळें जिवंत वाणीचें चरित्र आहे. समर्थांच्या श्लोकांत वाणी खरोखर जिवंत आहे.—मूर्तिमंत आहे. तिला वाच फुटलेली आहे."

## श्लोक.

मना सज्जना, भक्तिपंथें चि जावें,
तरी श्रीहरी पाविजेतो स्वभावें;
जनीं निंद्य तें सर्व सोडोनि द्यावें,
जनीं वंद्य तें सर्वभावें करावें. १
मना, वासना दुष्ट कामा न ये रे !
मना, सर्वथा पापबुद्धी नको रे;
मना, सर्वथा नीति सोडूं नको हो,
मना, अंतरीं सारवीचार राहो. २
मना, पापसंकल्प सोडोनि द्यावा,
मना, सत्यसंकल्प जीवीं धरावा;
मना, कल्पना ते नको वीषयाची,
विकारें घडे हो जनीं सर्व छी छी ! ३
नको रे मना, क्रोध हा खेदकारी,
नको रे मना, काम नानाविकारी;
नको रे मना, सर्वथा अंगिकारूं
नको रे मना, मत्सरू, दंभ-भारू. ४
मना, श्रेष्ठ धारिष्ट जीवीं धरावें,
मना बोलणें नित्य सोशीत जावें;
स्वयें सर्वदा नम्रवाचे वदावें,
मना, सर्व लोकांसि रे नीववावें. ५
तनू त्यागितां कीर्ति मागें उरावी,
मना सज्जना, हे चि क्रीया धरावी;
मना, चंदनाचे परी त्वां झिजावें,
परी अंतरीं सज्जनां नीववावें. ६
जगीं सर्वसूखी असा कोण आहे,
विचारी मना, तूं चि शोधोनी पाहें;
मना, त्वां चि रे पूर्वसंचीत केलें.

तयासारिखें भोगणें प्राप्त झालें. ७
मरे एक, त्याचा दुजा शोक वाहे,
अकस्मात तो ही पुढें जात आहे;
पुरे ना जनीं लोभ रे, क्षोभ होतो;
म्हणोनी जगीं मागुती जन्म घेतो. ८
मना, सर्वथा सत्य सोडूं नको रे,
मना, सर्वथा मिथ्य मानूं नको रे,
मना, सत्य तें सत्य, वाचे वदावें,
मना, मिथ्य तें मिथ्य, सोडून द्यावें. ९
समर्थांचिया सेवका वक्र पाहे,
असा सर्वभूमंडळीं कोण आहे?
जयाची लिळा वर्णिती लोक तीन्ही,
नुपेक्षी कदा राम दासाभिमानी. १०
असे हो जया अंतरीं भाव जैसा,
वसे हो तया अंतरीं देव तैसा;
अनन्यास रक्षीतसे चापपाणी,
नुपेक्षी कदा राम दासाभिमानी. ११
मदें, मत्सरें सांडिली स्वार्थबुद्धी,
प्रपंचीक नाहीं जयातें उपाधी,
सदा बोलणें नम्रवाचा, सुवाचा,
जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा! १२
अती लीनता सर्वभावें स्वभावें
सदा सज्जनांलागिं संतोषवावें;
तयाकारणीं सर्व लावीत जावें,
सगूणीं अतीआदरेशीं भजावें. १३
विवेकें क्रिया आपुली पालटावी,
अतीआदरें शुद्धबुद्धी धरावी;
जनीं बोलण्यासारखें चाल बापा!
मनीं कल्पना सोड, संसारतापा. १४

सदा सर्वदा सज्जनांचेनि योगें,
क्रिया पालटे, भक्ति-भावार्थ लागे;
क्रियेवीण वाचालता ते निवारी,
तुटे वाद संवाद तो हीतकारी. १५
जयाचेनि संगें समाधान भंगे,
अहंता अकस्मात येऊनि लागे;
तया संगतीची जनीं कोण गोडी,
जिये संगतीनें मना राम सोडी. १६
मना, संग हा सर्व सोडोनि द्यावा,
अती-आदरें सज्जनांचा धरावा;
जयाचेनि संगें महादुःख भंगे,
जगीं साधनेवीण सन्मार्ग लागे. १७
धरीं रे मना संगती सज्जनांची,
जिणें वृत्ति हे पालटे दुर्जनांची;
वळे भाव हा, वृत्ति सन्मार्गिं लागे,
महाक्रूर तो काळ विक्राळ भंगे ! १८
मना, संग हा सर्व संगासि तोडी,
मना संग हा मोक्ष तत्काळ जोडी;
मना, संग हा साधना शीघ्र जोडी.
मना, संग हा द्वैत निःशेष मोडी. १९
मना, वासना वासुदेवीं असों दे,
मना, कामना कामसंगीं नसों दे;
मना, कल्पना वाउगी ते न कीजे,
मना, सज्जना, सज्जनीं वस्ति कीजे. २०

रामदास.

---

## ५ लेंकरांची जिज्ञासा

जगांतील प्रत्येक वस्तु पाहून “ हें काय ?” “ हें कुठलें ? ” वगैरे जाणण्याची जिज्ञासा लहान मुलास होते, व तो तसे प्रश्न वडील

माणसांस करितो. अशा वेळीं वडील माणसांनीं ही त्याला खरें ज्ञान होईल अशी च माहिती सांगितली पाहिजे; नाहीं तर कांहीं तरी उत्तर दिल्यानें सरळ मनानें मूल तें च खरें मानीत राहातें; व त्यास वस्तूचें यथार्थ ज्ञान होत नाहीं.

ईषत्प्रफुल्लसुमना करिं बाळगावें,
किंवा मृदुस्मित मुलाप्रति खेळवावें;
कीं तन्मनःकुसुम रम्य करीं धरावें,
उत्फुल्ल शिक्षणसुधाकिरणीं करावें. १
रेणूहुनी हि अति सूक्ष्म बियांत राही,
विस्तीर्ण पिप्पल जयासम वृक्ष नाहीं;
या अल्प मुग्ध शिशुच्या लघुचेतसांत
नांदे तसा च गुण–वृक्ष जया न अंत ! २
हा बाळ पाहुन अनेकविधां पदार्थां–
नाचे हंसे, पुसतसे वडिलांस अर्थां;
जिज्ञासु हा सकल विश्व शिकावयाला,
तो धन्य ! तो सुकृति ! जो शिकवील याला. ३
ही अल्पशी निरखुनी हंसतो शलाका,
छायेस पाहुन धरी मनिं फार धाका;
हा पांखरांसह करी मधु भाषणाला,
तो धन्य ! तो सुकृति ! जो शिकवील याला. ४
गर्जे नभांत घन ऐकुन बाळ नाचे,
" हें काय हो ? " पुसुनियां वडिलां सुवाचे;
" सासू तुझी दळण हें दळिते मुला रे ! "
अव्याज तें मन गणीत खरें च सारें ! ५
" हे काय ? " देव वडिलें म्हणतात बाऊ,
तें चित्त निर्मळ धरीत तसा च भावू;
वाढो सुबुद्धिलतिका, अथवा बिचारी
हो जीर्ण अंगि च तरी न कुणी विचारी ६
हें फूल पाहत असे उमलावयाला,

हें चंद्रबिंब चढतें उदयाचलाला;
बाहेर अंकुर निघों बघतो द्रुमाचा
होतो विकास शिशुच्या मृदुमानसाचा. ७
जो होउनी अनिल हें फुलवील फूल,
सारील दूर शशिचे घन मेघजाल;
कीं अंकुरास जल जो पुरवील माळी,
तो धन्य यत्करगता शिशुबुद्धि झाली. ८
सारें नवीन शिशुला बहु दर्शनीय,
त्या कौतुकास दुसरी सरि लोकिं काय ?
“ हें काय हो ? ” सतत ही च करीत पृच्छा,
तो धन्य जो करिल पूर्ण तदीय इच्छा. ९
जरि असेल रसज्ञपणा पुरा,
जरि परोपकृती च मनोहरा;
जरि असे चतुरत्व, तरी मुला
शिकविण्यासम छंद नसे भला ! १०

रे० टिळक.

---

## ६ राम सीतास्वयंवरास जातात.

सीतेचा बाप जनकराजा याचे घरीं शिवाचें धनुष्य होतें. तें भलत्या कोणास उचलतां येण्यासारखें नव्हतें. सीतेनें लहानपणीं च त्याचा खेळावयास घोडा केला होता. म्हणून जनकराजानें पण केला होता कीं, हें चाप उचलून जो सज्ज करील त्यास च सीता द्यावयाची विश्वामित्रास राम अवतारी पुरुष आहे व तो तें धनुष्य सहज उचलील हें ठाऊक होतें. म्हणून तो त्यास सीतेच्या स्वयंवरार्थ घेऊन आला आहे.

### श्लोक.

या परिचें भव-ताप-विमोचन-
चापशरांकित भव्यमती—

पाहुनि, सर्व नृपांहुनि उत्तम,
लाहुनि तोष, पुसे नृपतीः—
' कोण असे महि पालक-बालक—
हे जनचालकसे सुचले !
सांग मला सहसा गमनाशय,
चांग मनासि मला रुचले ! ' १

हांसोनियां नृपसभे मुनिराज बोले,—
स्वानंद-संभ्रम-भरें हृदयांत डोले;
' हा जी नृपा ! बहुत भाग्य जगीं उदेलें
यांच्या गुणें दुरित, दैन्य, समस्त गेलें. २

साकेताधिप–बाल हे, रणतटीं रक्षोगणा काल हे,
दीनांचे कनवाळ हे प्रतिपदीं, राया ! जगत्पाल हे;
पुतें हे शुभलक्षणी, रत सदा धर्मे-करूं-रक्षणीं,
आनंदाब्धि अनुक्षणीं भरतसे यांच्या कृपा-ईक्षणीं ! ३

यांहीं ढु सह ताटिका निवटिली; निष्कंटका मेदिनी—
केली काननिं; यांचिया शर गतीं पाताळ-भू-मेदिनी;
तो मारीच नभीं झुगारुनि, शरें केला सुबाहू पुरा,
नेला सिद्धिस यज्ञ, ते प्रवर हे आले तुझ्या हा पुरा. ४

चापा नृपा, आणि महोत्सवातें–
आले पहाया, बल-वैभवातें;
मार्गीं अहिल्या विपिनांत रामें–
केली शिला-मुक्त मनोभिरामें.' ५

परिसुनि मन रायें, दाटलें रामपायीं,
म्हणत मनिं ' करावा सोयिरा हा उपायीं;
कठिण तरि पणाचा व्यर्थ संकेत केला,
रघुवर नवरा हा धन्य या कन्यकेला ! ' ६

भूपांतें निरखी दिठीं निज-सखी संगें, रमेसारखी—
शोभे, ते चि उखी विखी-शशिमुखी माडीवरी पारखी।

झाली बुद्धि फिकी, नृपाकृति निकी, मानीचना आन की,
लक्ष्मी राघव कौतुकीं, तंव तुकी माथा मनीं जानकी ! ७
आनंदतनय.

---

## ७ सत्याचा महिमा.

### ओंव्या.

निर्जळीं शतकूपखनन । तें एका वापिकेसमा.
शतभरी वापिकांचें पुण्य । एकीं यज्ञीं पाविजे. १
अश्वमेधशतांचें पुण्य । एकीकडे सत्य वचन,
तुळीतां सत्य आगळें जाण । मेरु सर्षप दृष्टान्तें. २
चहूं वेदींचें सांङ्ग ज्ञान । सकळ तीर्थांचें अवगाहन,
त्याशीं तुळितां यथार्थवचन । सत्य अगणित आगळें. ३
कोटी पुण्यें जोडिलीं यत्नीं । तीं जळती एके असत्यवचनीं
जैसा पावक स्फुलिंगकणीं । नाशी कर्पूरागिरीतें. ४
सत्यापरता नाहीं धर्म । सत्य तें चि परब्रह्म,
सत्यापाशीं पुरुषोत्तम । सर्वकाळ तिष्ठत. ५
सत्यें नेमिला न चळे नेम । त्यासी वोळगे मोक्ष-धाम,
घोर संसार-भयाचें नाम । स्पर्शो न शके कल्पांतीं ६
असत्य तें चि पैं पातक । असत्य तो ची महानरक,
असत्याचेनि संगें दुःख । अनंत जन्मीं भोगिजे. ७
सत्यामृताची कनकवाटी । जोडिली न सांडे भूतटीं.
असत्यबुद्धीची नरोटी । पवित्र हातें नातळे. ८
मुक्तेश्वर.

---

## ८ यक्षाचें घर.

एक यक्ष आपल्या कामांत चुकल्यामुळें त्यास यक्षांचा राजा कुबेर यानें दूर राहण्यास पाठविलें होतें. त्यानें मेघास आपला दूत कल्पून

त्याच्याबरोबर घरीं स्वस्त्रीस निरोप धाडला.तेव्हां तो मेघाला आपल्या घराची खूण सांगत आहे.

## साक्या.

त्या नगरींत धनेशगृहाच्या उत्तरेस दिसतें जें-
दुरूनि सुंदर मंदिर मोठें, तें च जाण घर माझें. १
नानारत्नीं खचित जयाचें द्वार उंच बहु साजे,
अपूर्व शोभा पाहुनि ज्याची इंद्रचाप ही लाजे २
असे जवळ त्या एक नवीन चि कल्पवृक्ष सुकुमार
थोर फुलांचे गुच्छ येउनी जो लवलासे फार; ३
प्रिया करांनीं नित्य घालुनी पाणी सायंकाळीं-
अतिकनवाळूपणें जयाला मुलासारिखा पाळी. ४
आहे सुंदर तळें हि तेथें लहानसें, ज्यामाजी-
नित्य शोभती बहुत फुलोनी सुवर्णकमळें ताजीं. ५
पाचेच्या पायऱ्या सभोंतीं असति ज्यांत उतराया;
ज्यांत नेमस्त चि जल असतें क्रीडा स्त्रीस कराया. ६
वर्षाकाळ हि येतां तेथें हंस सुखें वसताती,
जवळ हि असतां मानस, तिकडे कधीं हि ते न च जाती.७
त्या च तळ्याच्या कांठीं आहे क्रीडापर्वत, ज्याचें—
नीळमण्याचें चमके सुंदर उंच शिखर तें साचें. ८
ज्याच्या भोंतीं सुवर्णकदली झळकति चित्रविचित्रा,
विजेसहित तुज देखुनि मजला आठवतो तो, मित्रा ! ९
मध्यें मंडप मधुमालतिचा, गुलाब शोभति भोंतीं,
काय वर्णुं तीं सुखें, त्या स्थलीं जीं अनुभविलीं होतीं! १०
त्या कुंजाच्या जवळ बकुळिचा एक सुबक तरु आहे,
तसा तांबडा अशोक, चंचलपल्लव, तेथें पाहें. ११
असे मांडला पाचमण्याचा पिंजरा तेथें थोर,
बसे त्यामधें कनकयष्टिवर रात्रीं आमुचा मोर. १२

प्राणाची मम धनीन शिकवी नाचायास जयातें,
रत्नकंकणीं-युक्त करांनीं धरूनियां तालातें. १३

कृ. शा. चिपळुणकर. ( पद्यरत्नावलि. )

---

## ९ सावधपणा.

हा उपदेश श्रीसमर्थ रामदासस्वामींनीं छत्रपति श्रीशिवाजी महाराज यांची प्रथमतः भेट झाली तेव्हां त्यांस केला, अशी आख्यायिका आहे. हा किती चांगला आहे ! हा मुलांनीं पाठ करून ध्यानांत धरावा, व तदनुरूप वर्तन करण्याचा यत्न करावा.

### ओंव्या.

कोणाचा भरंवसा न धरावा। आपुला आपण विचार पहावा,
तकवा उदंड धरावा। हा ही एकविषयीं. १
देहदुःखें कदरों नये। उदंड चि करावे उपाये,
मग सर्व सुखास काय। उणें आहे ? २
एकांतीं चाळणा करावी। धारणा उदंड धरावी,
नाना विचारणा करावी। अरि-मित्रांची. ३
प्रयत्नीं चुकों नये। सुखवासी कामा नये,
सुचावे नाना उपाये। अनेकविषयीं. ४
धुरेनें धीर सोडूं नये। मुख्य प्रसंग चुकों नये,
उद्योग-रहित कामा न ये। पशू जैसे. ५
उपाधीस कंटाळला। विचाराचा आळस आला,
म्हणजे जाणावा चेवला। बुद्धीपासूनी. ६
खबरदारी आणी वेगीं। तेणें सामर्थ्य चढे अंगीं,
नाना-प्रसंगें कार्यभागीं। अंतर चि न पडे. ७
कार्यकर्ते दुरी करावे। प्रसंगें सर्व चि हातीं धरावे,
परंतु शोधोनि पाहावे। कपटाविषयीं. ८
जेथें बहु विचार। तेथें ईश्वर अवतार,
मागें झाले थोर थोर। धके चपेटे सोसोनी. ९

आपल्या मनासी रोधावें । परांतर शोधावें,
क्षणक्षणां सांभाळावें । बदलेल म्हणुनी. १०
पाहिलें चि पाहावें । केलें चि करावें,
शोधिलें चि शोधावें । राज्यकारण. ११
इशारतीचें बोलतां न ये । बोलायाचें लिहूं न ये,
लिहावयाचें सांगूं न ये । जबाबीनें. १२

रामदास.

---

## १० नळराजा.

### दिंडी.

चौगुणीनें जरि पूर्ण शीतभानू ।
नळा ऐसा तरि कलानिधी वानूं;
प्रतापाचा जो न मावळे भानू ।
तया सारीखा दुजा कोण मानूं. १

### श्लोक.

चंद्रासि लागति कळा, उपराग येतो;
गंगेसि भंग, बहु पाणउतार होतो;
जें चूर्ण होय तरि मौक्तिक तें कशाला ?
नाहीं समान नळराज महायशाला. २

वाजीचें मन जाणता, सकळ ही राजी शिपाई जया,
याजी होउनियां द्विजांसि म्हणतो, 'या जी धनें घ्यावया!'
त्याजी जो धनदापरी, सुकृत जें त्या जीव ऐसें गणीं,
गाजी तो नळ भूप, हूप धरुनी गा जी गुणींच्या गणीं. ३

### दिंडी.

लोकबंधु जो होय रवी ऐसा,
कुवलयाला जो सुखद चंद्र जैसा,
साङ्ग नोहे तो कुसुमचाप तैसा-
निषधरायाशीं तुल्य रूप कैसा ?

श्लोक.

कसा नेणों पाठीं शरधितुनि काढी शर कसा,
कसा धन्वीं जोडी, वरि वरि हि सोडी तरि कसा;
विपक्षाच्या वक्षावरि विवर-लक्ष्यास्तव रणीं—
कळे राजेंद्राची त्वरित-शर संधान-करणी. ५
घाले घनीं पुढील याचक या नळाचे;
येतां फिरोनि समुदाय पथीं तयांचे
मागावयास जन मागिल देखियेले,
त्यांहीं च ते सकळ पूरितकाम केले ! ६

रघुनाथपंडीत

---

## ११ शर्मिष्ठा व देवयानी यांचें भांडण.

शर्मिष्ठा ही दैत्यांचा राजा वृत्रासूर म्हणून होता त्याची मुलगी, व देवयानी ही त्याचा गुरु शुक्राचार्य याची मुलगी. एकदां या मुली जलक्रीडा करून पाण्याबाहेर आल्या, तों देवयानीचें वस्त्र शर्मिष्ठा चुकून नेसली. यामुळें दोघींचा या आर्यांत वर्णिल्याप्रमाणें तंटा होऊन शर्मिष्ठेनें देवयानीस एका विहिरींत ढकलिलें. हें भांडण देवांचा मुख्य इंद्र यानें मुद्दाम लाविलें.

### आर्या.

शर्मिष्ठा काविजांबर नेसे झडकरि, कळों न वासव दे;
तों तीस देवयानी ओढुनि तत्परिहितात्मवास वदे. १
" असुरसुते, मच्छिष्या होउनि मद्वस्त्र नेसशी कां गे ?
वहु मातलीस ऐसें मज समुदाचारलोप हा सांगे ! २
मर्यादा पाळावी, निज-शिव गुरुचे चि पाय; रीतींतें—
सोडुं नये म्हणति कवी साधुपदाचीच पायरी तींतें. " ३
शर्मिष्ठा तीस म्हणे, " बैसावें जैं सभेंत मत्तातें,
त्वत्तात व्हावें तैं बंदी, तूं विसरलीस मत्ता तें ! ४

सिंहासनीं विराजे मद्गुरु, न सहस्रकरहि, परि सविता;
बैसे खालें त्वद्गुरु कवि, कविना करुनि त्यासि परिसविता.
माझी न पाविजे त्वां, मत्ताताची तुझ्या न सरि तातें;
जें जन्हुकन्यकेचें भाग्य, न पावेल अल्प सरिता तें! ६
तूं तों कन्या, जो स्तुतिकर याचक, दान घे सदा, त्याची;
मी कन्या स्तव्याची, भव्याची, सर्वसंव्यदात्याची! ७
होती महेंद्रनयनें पाहुनि राजेश्वरा जया चकितें,
मत्तातभाग्य कैचें त्वत्ताता भिक्षुकासि याचकि! तें! ८
मत्ताताची जी श्री, कीर्ति कवीला नये चि भिक्षुकि! ती;
अमृतरसाशीं व्हाया सम माधुर्यें समर्थ इक्षु किती?
राजसुतेचें यश जें तुज येइल काय गे दरिद्रे, तें?
पाहसि विकावया तूं केशरमौल्यें कसें हरिद्रेतें?" १०
निर्भर्त्सना करी बहु, संपादी द्वेष, पाप, गाढ कली—
करुनि, कविजेस कूपीं ती कोपाची महापगा ढकली ११

मोरोपंत.

---

## १२ एक अमेरिकन मुलगी.

पाठीवरी रुळति धूसर मुक्त बाल,
जैसे गुलाब फुलले दिसतात गाल;
विस्तीर्ण हें निवळ पान च केवड्याचें
जेथें सुभाग्य, मतिमत्व खुशाल नाचे १
या केवड्यावर अली बसले मधून,
तैसे च हे कुरळ शोभति दोन तीन;
या रम्य वक्र भिवया म्हणतात 'येथें—
थारा नसे कृपण दीन मनोरथातें!' २
साधें प्रसन्न मधुबाल्य करी विहार
नेत्रांत जें करि तयांप्रति लोल फार;
रत्ना! तुझें हरपलें जणुं सर्व पाणी
हीं रम्य दीर्घ नयनें गमतें बघोनी! ३

हें नेत्रसुंदर दिसे मज, चारुतेचें,-
सारल्य अग्रनतिमान अपूर्व ज्याचें-
सोत्कंठ नासिक हिचें म्हणतें जगाला,
'आर्यान्वयोद्भव खरोखर रम्य बाला !' ४
किंचित् प्रभात समयीं कळिनें फुलावें
कीं अंतरंग लपवून पुढें करावें;
हें हांसरें मुख हिचें करि ती च लीला
दावी पुन्हां लपविते रदनावलीला ५
आरक्त ओष्ठ जणु वेल च पोंवळ्यांचे
ते ही गमे विरमतील पुढें तयांचे;
किंचित विभक्त दिसती, जणुं सांगताती
निश्चित् निर्मल सुखी किति बालवृत्ति ! ६
वाटे उषा च हसते फिरते जगांत !
कीं स्फूर्ति ही च कविची मधुरूप घेत !
अव्याजता रसिकता जणुं मूल झाली
स्वर्गांतुनी सहज भूवर आज आली. ७

रे० टिळक.

---

## १३ रामशास्त्री यांनीं राघोबादादास सांगितलेलें प्रायश्चित्त.

नारायणराव पेशव्यास मारण्यामध्यें राघोबादादाचें अंग आहे असा पक्का शोध रामशास्त्री यांनीं लाविला. राघोबानें आपला अपराध कबूल करून शास्त्रीबुवांस प्रायश्चित्त विचारलें. तेव्हां त्या परमनिस्पृह गृहस्थानें हें प्रायश्चित्त त्यास सांगितलें:—

### श्लोक.

" प्रत्यक्ष बंधुसुत राज्यपदार्थ मारी
ऐसा न अन्य जगतीवर देहधारी;
कैसे तुम्ही विसरलां, जगदेकराया,
राज्यीं न वास तुमच्या मन घे कराया! १

जें शास्त्र आजवर ऐकविलें तुम्हां मी,
तें सर्व आजि दिसतें मजला निकामी.
अंधास दीप, बधिराप्रति गान झालें !
ऐसें अकर्म करणें मज भाग आलें. २
माता कष्टविली वृथा ! निजपिता तैसा स्वसंरक्षणीं,
खाया काळ भुईस भार जगलों, पापा कराया धणी;
प्रायश्चित्त तुम्हां दिसे मरण ही माझे मतें तोकडें,
येवो राग न आपणांस, वदलों जें वाटलें रोकडें !" ३
वामन दाजी ओक–पुष्पवाटिका.

---

## १४ भगवन्नामप्रताप.

### श्लोक.

आकाशअंत न कळूनि हि अंतरिक्षीं—
आकाश आक्रमिति शक्त्यनुसार पक्षी;
नामप्रताप हि यथामति या च रीतीं—
सीमा न पावति, तथापि मुनींद्र गाती. १
न कळत हि पडे हा विष्णुनामाग्नि जेथें,
दुरित-तृणगृहाचें भस्म होणार तेथें;
मग समकरुणे त्रि आयती कृष्णदृष्टी—
भिजविल, करिते जे सर्व सृष्ट्यर्थ वृष्टी. २
न कळतां पद अग्निवरी पडे। न करि दाह असें न कधीं घडे
अजित-नाम वदो भलत्या मिसें। सकळ पातक दग्ध करी तसें
न जाणत हि ये मुखा हरि, तथापि पापें हरी;
स्मरोनि महिमा, स्मरे वदनिं तीं च नामें जरी,
प्रवृत्तिविषयीं जरी असति त्या जनांचीं मनें,
विरक्त करितो हरी स्वगुण-नाम-संकीर्तनें. ४
न जाणे शिशू अग्निची शक्ति कांहीं,
जळो तूळ, इच्छा अशी ज्यास नाहीं,

तरी घालितो अग्नि, कार्पासराशी—
जळे, ये रिती नाम हा पाप नाशी. ५
आयासाविण ही कथा परिसतां गोडी हरीच्या गुणीं—
ज्या चित्तीं उपजे, निघे सहज तो त्याच्या पदीं तत्क्षणीं;
ऐसे यारिति अर्पिती सहज ही जे एकदां त्या मना,
ते स्वप्नीं नयनीं न देखिति यमा, कैंच्या तयां यातना? ६
नामोच्चारण मात्र ज्यांस घडलें, ते पावले सद्गती;
सामर्थ्यें हरिचीं अशीं घडिघडी जे वर्णिती, ऐकती,
त्यांना जे उपजेल भक्ति हरिची, अत्यंत ते शुद्धता,
तैशी तीर्थतपोव्रतें न करिती; हें जाणिजे तत्वता. ७

वामन.

---

## १५ अंत्यजाच्या मुलाचा पहिला प्रश्न.

काहीं महारांचीं मुलें मजेनें खेळत होतीं. तेथें एक ब्राह्मण डौलानें आला, आणि म्हणाला "ए म्हारड्याचे पोरांनो, चला बाजूला व्हा, मला वाट द्या." तेव्हां सर्व मुलें दूर पळालीं. पण एकजण मात्र तसा च तेथें उभा राहिला. तेव्हां त्या ब्राह्मणानें त्याच्यावर काठी उगारली, आणि म्हणाला, "गाढवा, दूर हो, नाहींतर तुझी सावली माझ्यावर पडेल ना! दूर होतोस, का देऊं या काठीचा खाऊ?" तेव्हां तो मुलगाही तेथून निघून आपल्या घरीं जाऊं लागला. वाटेनें त्याच्या मनांत आलें कीं, नुसती माझी सावली त्या ब्राह्मणावर गेली तर त्यांत मोठा दोष असा काय होतो? घरीं जाऊन त्यानें आईला तो च प्रश्न केला. परंतु नेहमींची रूढी अंगीं खिळलेल्या त्या बाईच्या मनाला त्यांत कांहींच विशेष न वाटून ती म्हणाली, "आपण नीच लोक आहोंत. तेव्हां त्या लोकांस पाहिलें कीं, नेहमीं दूर होत जा." नेहमींच्या रूढीनें आपणांस नीच म्हणवून घेण्यांतही त्या बाईला कांहीं वैषम्य वाटलें नाहीं. जुलमी मनुष्य आपण वाटेल तीं पापें केलीं तरी त्यांचा विधि-निषेध न मानतां खालच्या जातींवर मात्र अरेरावी गाजवितो, व

त्यांच्या सावलीचा ही विटाळ मानतो, हा अन्याय त्या लहान मुलास एकदम जाणवला, पण तें नेहमींचें अंगवळणीं पडल्यानें तिला त्याची आतां कल्पनाही आली नाहीं.

श्लोक

मुलें अंत्यजांचीं बिचारीं मजेनें
पथाच्या अहो खेळताती कडेनें;
दुरूनी तिथे विप्र डौलांत आला,
वदे काय तो मुग्ध त्या बालकांला:— १
" सरा रे दुरी पोर हो म्हारड्यांचे !
चला ! खेळ हे मांडले डोंबलाचे !
निघा ! वाट द्या लौकरी ब्राह्मणातें !"
पळालीं मुलें;—कोण राहील तेथें ! २
परी एक त्यांतील तैसा चि ठेला;
उगारी तधीं दुष्ट तो यष्टिकेला.
म्हणे—" गाढवा ! सावली ना पडेल ?
दुरी हो !—पहा हा च खाऊ मिळेल !" ३
तधीं बाळ तो ही घराला निघाला,
मनीं आपुल्या या करी चिन्तनाला:—
" जरी त्यावरी सावली माझि गेली
तरी काय बाधा असे ठेविलेली ?" ४
घरीं जाउनी तें चि माते विचारी;
वदे तेधवां त्यासि माता बिचारी:—
" अम्ही नीच बा, आणी ते लोक थोर;
तयां पाहतां होइजे नित्य दूर" ५
सुधें बोलली !—हें परी काय तीतें-
कळे कीं जगीं नाडुनीयां परांतें
म्हणूनी करूनी अधीं घोर पाप,
जनीं गाजवी मानवी स्वप्रताप ! ६

केशवसुत.

## १६ शिवधनुष्य-भंग.

मागील उतारा साह्यावा पाहा. श्रीरामांनीं शिव-धनुष्य उचलिलें, व तें तो सज्ज करीत असतां भंग पावलें.

### श्लोक.

घातली सदृढ कास राघवें,
वंदिलें गुरुपदाब्ज लाघवें;
ठेविला वरद हस्त मूर्धनीं,
'पाव तूं विजय, चाप मर्दुनी!' १
जनकजा मिरवे उपरीवरी,
सहचरी वसनांचळ सांवरी;
सखि म्हणे, 'रघुवीर उभा असे,
धनुष भंगिल, संशय हा नसे!' २
ती भूमीस म्हणे, 'उमानि धनुषा, रामासि साह्या करीं.
शेषा, लोटिं शरासनासि, तपना, ओढीं सहस्रां करीं.
शंभू, कार्मुक आंवरीं दशभुजीं, पृष्ठीसि कूर्मा, धरीं;
चापा दिग्गज हो, धरा; विधि, तुवां होई हळू तें करीं! ३
तीर्थें, व्रतें, जप, पुरश्चरणादि दानें,
उद्यापनादि हवनें, द्विज-भक्ति मानें,
साह्या करो सुकृत पूर्विल आजि मातें,
भंगो शरासन खरें रघुवीरहातें.' ४
नाना तिणें नवसिले सुर भूमिसाक्षी,
भंगावया धनुष ऊदित सर्वसाक्षी;
श्रीमूर्ति ते उभि असे भुपतींत देखा;
त्याच्या स्वरूपिं दुसरा करि कोण लेखा? ५
केयूरांगद, कुंडलें, मणगटीं जांबूनदें कंकणें,
वांकी, तोडर गर्जती घनरवें; पादांबुजीं भूषणें;
सीता-चित्त मयूर नृत्य करितो श्रीराम सर्वांपुढें,
धीरोदार उभा, प्रतापमहिमा नेणाति शास्त्रें मुढें! ६

राजे-मानव-देव-दानव-सभे नृत्यांगना नाचती,
वाद्यांचे घन घोष होति, अवघे रामाकडे पाहती;
नाना तें चतुरंग सैन्य परिघीं पाहों उभें ठाकलें,
विप्रांचे जयशब्द होति, अवघे चित्रोपमा थोकले ७
उल्हासें चमकोनि जाय, धनुषापाशीं उभा राहिला,
सांगातें अवघे पुरोहित, पुढें श्रीराम तो एकला;
कोदंडासि सभेसमोर उजवें घालोनियां वंदिलें,
दोर्दंडें उचलोनियां चढविलें, कर्णान्त तें ओढिलें ! ८
रामानें, सहवर्तमान-मुनिच्या, कोदंड उच्चालिलें,
राजे आणि विदेह-संशय-धियां-संयुक्त आस्फाळिलें;
सीता चित्त-समेत ओढुनि, भृगूपुत्रादि साहंकृती-
त्यांचा दुर्मद, गर्व भंगुनि, धनूभृत्यक्तसर्वाकृती. ९
घोषें जाप कडाडलें, रघुपती कोदंड ओढी बळें,
तेव्हां कोटि कडाडले घन, विजा; कोदंडकोलाहलें-
सीमा सांडिति सिंधु, मस्तक तुकी शंभु स्वयें आपुलें;
ते सर्व भुप रामशक्ति नयनीं देखोनि वेडावले ! १०

विठ्ठल.

---

## १७. भीष्मार्जुन युद्ध.

कौरवपांडवांचे युद्धांत श्रीकृष्णाची प्रतिज्ञा होती, कीं आपण शस्त्र-धारण करणार नाहीं, फक्त अर्जुनाचें सारथ्य करूं. ही प्रतिज्ञा आपण कृष्णाला मोडावयास लावूं अशी भीष्मानें प्रतिज्ञा केली होती, व ती त्यानें स्वपराक्रमानें शेवटास नेली. अर्जुनास असा गर्व झाला होता, कीं आपल्यासारखा योद्धा नाहीं; तो गर्व ही या प्रसंगीं श्रीकृष्णानें हरण केला आहे.

### श्लोक.

श्रोत्रयुग्म परिपूत कराया—
सावधान, जनमेजय राया !

जो परेशरत, धन्य अहो तो,
गोष्पदोपम तया भव होतो ! १
प्रतिज्ञा जे केली यदुकुळवरें ' युद्ध न करीं
धरीं ना शस्त्रातें कदनसमयीं मी निजकरीं; '
' घडेना हें मिथ्या जरि तरि न मी भागवत रे, '
प्रतिज्ञेतें भीष्में मनिं अवधिलें या दृढतरें. २
पिता शंतनू , माय ज्याची नदी जे,
स्वयें शुद्ध ऐशास सन्मान दीजे;
असे गर्व तो ही हरावा मनाचा,
मनींचा असा भाव त्या वामनाचा. ३
नृपा ऐकिजे युद्ध देवव्रताचें,
गमे हें चि साफल्य तुझ्या व्रताचें;
रथीं देखिले कृष्ण-कौंतेय दोघे,
म्हणे भीष्म, ' माझ्या शरातें यदो घे ! ' ४
भीष्माकडे रव भयानक दुंदुभीचा
होतां वदे तनय आनकदुंदुभीचा;
' दुश्चिन्ह आजि गमतें मज, सव्यसाची,
जाती शिवा अशिव हे अपसव्य साची ! ' ५
गर्वोक्ति फाल्गुन वदे, ' जगदेकराया,
आहे मशीं कवण तो झगडा कराया?
म्यां काळखंज वधिले अतुलप्रतापी,
पौलोम ही असुर, गो-सुर-विप्र तापी ! ' ६
पितामह वदे तया, ' प्रबळ तूं पृथानंदना,
रमेश रथि सारथी चतुर वागवी स्यंदना;
स्वयें गतवयस्क मी, सरस वीर तूं रे नवा,
भिडें रणधुरंधरा, जय घडो सुखें वा न वा ! ' ७
पारिक्षिता, मग शरासन पांडवानें
ओढूनियां हुतवहार्पितखांडवानें,

ज्याचिया क्रियें सकळ पद्मभवांड वाने ! ८

गांगेय कोपा चढला कसा रे,
ज्या मानिती हाचि कृतांत सारे:
गर्जोनियां सिंहरवें जयातें
पाहे, जणों मारिल आज यातें ! ९

'त्वां काय कर्म करिजे लघुलेंकरानें,'
बोलूनियां मग धनू धरिलें करानें:
तों व्यापिलें सकळ सैन्य महाशरांनीं
ग्रीष्मीं जसा पतित होय हुताश रानीं. १०

तो स्तोम येतां बहुसायकांचा,
झाला चि पार्थव्यवसाय कांचा:
कांचावला वीर, पुढें धसेना,
झाली, नृपा ! सर्व भयांध सेना. ११

पुष्पवर्ण नटला पळसाचा,
पार्थ सावध नसे पळ साचा:
पाहिलें जंव निदान तयाचें,
तों दिसे वदन आनत याचें. १२

प्रतोद मग ठेविला, उतरला रथाधःस्थळीं,
म्हणे, 'प्रबळ भीष्म हा, जय घडे न या दुर्बळीं,'
करीं कमलनेत्र तो प्रथित चक्र तें स्वीकरी,
प्रमोद यमनंदना बहु, तया यशस्वी करी. १३

असा येतां देखे रथनिकट तो श्यामल हरी,
नृपा गांगेयाच्या हृदयीं भरल्या प्रेमलहरी;
शरातें, चापातें त्यजुनि वदला गद्गदरवें,
"जगन्नाथें केलें मज सकल लोकांत बरवें ! १४

'ये रथावरि क्षणीं, यदुराया !
खड्ग देइन विकोश कराया;
तोडिं मस्तक, पडो चरणीं या,
धन्य होइन तदाश्रयणीं या, १५

' श्रीमाधवावांचुनि आनदेवा—
भजें, तरी हो मज आण, देवा !
तुझीच कीं वाहतसें हरी रे,
मिथ्या, झडो हे तरि वैखरी रे. १६

' मारावें मजला असेंच असलें चित्तीं तुझ्या केशवा,
तैं मातें मग कोण रक्षिल पहा, विश्वेश नाकेश वाः
हा मुख्यार्थ जनार्दना मज गमे, भक्तप्रतिज्ञा खरी
कीजे, सर्वजनांत होइल मृषा, हो, आपुली वैखरी!" १७

हें भीष्मवाक्य परिसोनि जगन्निवासें,
केलें विलोकन मृदुस्मित पीतवासेंः
वेगें फिरोनि चढला मग तो रथातें,
पार्थाचिया पुरविणार मनोरथातें. १८

वामन.

---

## १८ भीम-जरासंध-युद्ध.

श्रीकृष्ण व पांडव यांस जरासंधाला जिंकावयाचें होतें, म्हणून श्रीकृष्ण भीमार्जुनांना घेऊन ब्राह्मणवेषानें जरासंधाचे घरीं गेला. हा जरासंध मोठा पराक्रमी होता, व त्यास युद्धांत राजरोस रितीनें जिंकणें कठीण होतें; त्यास जिंकल्याखेरीज तर धर्माचे राज्य निष्कंटक होत नव्हतें, व त्यास सार्वभौमत्व मिळत नव्हतें; म्हणून कृष्णानें त्यास एकट्यास गांठून भीमाकडून मारविलें. आधुनिक काळांत शिवाजीनें आपल्यास वश न होणारा जावळीकर चंद्रराव मोरे यास असेंच मारविलें, व कंटक काढून टाकला. ही युक्ति शिवाजीस कृष्णाच्या जरासंध वधावरून सुचली असेल यांत शंका नाहीं.

### ओंव्या.

कंसारी संसार-गज-केसरी। हांसोनि बोले श्रीकृष्ण शौरी,
" पांडुपुत्र हे निर्धारीं। भीमार्जुन जाण पां. १
मागें अपराध केले क्षमा। कार्याकारणें पुरुषाधमा,
लोटली मर्यादेची सीमा। शेवटीं फळ भोगीं कां, २

सरला सुकृताचा तंतू । आयुष्य-तैला झाला अंतू,
माझिये हस्तीं व्यजनवातू । भीमरूपें उदेला, ३
तो झगटतां सत्वरगती । प्राणदीप पंचज्योती—
मालवोनि पडेल क्षिती । गात्र-पात्र पालथें. ४
करीं रायांचें बंधमोचन । किं युद्धा उठीं न लागतां क्षण,
या वेगळा विचार आन । करणें आतां घडे ना. ५
तिघांमाजी जो आवडे । त्यासींच भीडिजे झडेपाडें."
मागध म्हणे, "मूर्खा ! तोंडें । जल्पना करिशी वाचाटा! ६
तूं बहुरूपी खेळसी सोंगें । कोणतें युद्ध जिंकिलें आंगें ?
वेडीं वागडीं भाविकें भणंगें । तुझें शूरत्व त्यांमाजीं. ७
पार्थ पृथेचें सुकुमार बाळ । शस्त्राभ्यासीं गेला काळ,
मजसीं अयोग्य; परि अळुमाळ । भीम कांहीं दिसतसे. ८
तोही मंद, जड, आळसी । बहुत आहार, निद्रा, त्यासी,
आयुष्य सरलें म्हणून ऐसी । बुद्धी उदेली तुम्हांतें. ९
तिघांतें हाणोनि चडकणा । क्षणामाजी मेळवीन मरणा,
बळें सर्पाचिया सदना । मंडूक वस्ती पावला." १०
"मंडूक किंवा तिघे गरुड । आतांची होईल हा निवाड,
समय प्राप्त झालिया वाड । बोल टाकी माघारा." ११
ऐसें बोलतां चक्रपाणी । उभे ठेले समरांगणीं,
जरासंधें राज्यासनीं । अभिषेकिलें सहदेवा. १२
प्रधानातें निरोपी मुखें । "राज्य रक्षावें अतिविवेकें,
होणार तें होतसे सुखें । निर्भय सर्वी असावें." १३
सरसावूनी वीरमुंठी । भीम लक्षिला दारुणदृष्टी,
जैसा मदोन्मत्त करटी । सिंहेश्वरें लक्षाघा. १४
भीमाआंगीं विरश्रीचा लोटू। धरितां न धरवे अतिउद्भटू,
अगस्ती धांवे समुद्र घोटूं । तैसा झगटे पुढारां. १५
दोघे पिटिती पाणीतळें । जानुमूळ, बाहुमूळें,
मही ताडितां पादतळें । शैलमौळें थरकती. १६
दोघे स्मरती कुळदैवतें । मागध मागे महेशातें,

" शत्रुयाचकां माझेनि मृत्यें । यशभिक्षा लाधो मज." १७
भीमें स्मरोनी श्रीकृष्णचरण।म्हणे "होवोनि मागधहनन,
सिद्धी पावो राजसूययज्ञ । आर्त पुरो पांडूची. " १८

किरीट काढोनि हस्तकीं । केश आंवळिले मस्तकीं,
चंड गर्जना करिती मुखीं । काल कांपे चळचळां. १९
धावोनि भीमाची वीरमुंठी । मागधें कवळोनियां मुष्टी,
दक्षिणहस्त सूदला कंठीं । काळपाशा-सारिखा. २०
दांत खाऊनी करकराटी । गुडघा स्थापिला हृदयपुटीं,
'सावध !' म्हणे कृष्ण-जगजेठी। 'बापा! भीमा! बळिष्टा!' २१
भीमें भैरवाकार दृष्टी । हृदयीं ओपिली वज्रमुष्टी,
सोडवूनि मगरमिठी । झिंजाडोनि लोटिला. २२
तेणें मागुती उठोनि विकळ।पडिला जैसा विशाळ ताळ,
पुढती उठोनि उतावीळ । भीम मध्यें कवळिला. २३
मस्तकें फुटोनियां धरणीं । रक्तप्रवाह भरती वदनीं,
मागध म्हणे," देहमरणीं । अमृतपान होतसे. " २४
हस्त वोढिती तोडावया । पाय कवळिती मोडावया,
डोळे टोंचिती फोडावया । पाडावया दशनांतें. २५
करप्रहार, लत्ताप्रहार । मुष्टिप्रहार, मस्तकप्रहार,
मोजोनि मारिती शतसहस्र । 'उसणें घे, घे!' म्हणोनी २६
बाहु गदा, बाहु मुसळें । बाहु मुद्गल, कर त्रिशूळें,
एकमेकांचीं मर्मस्थळें । पाहोनियां, मारिती. २७
व्याघ्रां-ऐसे क्रोधानळीं । झोंबों पाहती कंठनाळीं,
गजां-ऐसे कुंभस्थळीं । भेदूं म्हणती मस्तकें. २८
सर्पां-ऐसे फुस्कारती । सिंहां ऐसे हुंकारती,
वृषभां-ऐसे फुंपाटती । उफाळती इसाळें. २९
नरनारी नागरिक लोक । पाहती दोघांचें कौतुक,
विमानयानीं वृंदारक । जय इच्छिती भीमातें. ३०
मुष्टिघातांचिया ध्वनि । थरथराटें थरके धरणी,
वोथरोनि पाताळफणी । मार्ग पाहे पळावया. ३१

निराहार, निरुदक । विसावा न घेतां पळ एक,
तेरा दिवसपर्यंत देख । युद्ध झालें दोघांशीं. ३२
चतुर्दशीचिया रातीं । मुर्छा पावला मागध नृपती,
ते वेळीं संकेत दावी हातीं । पांडवातें माधव. ३३
"पाय कवळोनियां करतळीं। चिरोनि करावीं दोन्ही फळीं,
जरेनें सांधिला तो उखळीं । सांधा वेगीं बळिष्टा. ३४
या वेगळा उपाय आन । करितां, मागध न पावे मरण,
आतांचि होऊनि सावधान । युद्ध करील मागुती." ३५
भीमें रगडोनियां दाढा । मध्यभागीं कर्षिला गाढा,
माथां वाहोनियां भवंडा । चक्राकार दाविला. ३६
तेथोनि टाकिला भूतळीं । लात वोपिली वक्षस्थळीं,
वज्रें ताडोनियां मौळी । शक्र भंगी पर्वता. ३७
भीमसेनें आपुले हस्तीं । करोनि शकलें टाकिलीं क्षितीं,
जरासंधा दिधली मुक्ती । कुंती-कुमरें यापरी. ३८

मुक्तेश्वर.

---

## १९ कालियामर्दन.

गोकुळाजवळ यमुनेच्या डोहांत एक कालिया नांवाचा भयंकर विषारी सर्प राहात असे; त्यामुळें तेथल्या भोंवतालच्या प्रदेशास फार त्रास झाला होता, म्हणून श्रीकृष्णानें त्या डोहांत शिरून कालियास शिक्षा लाविली व त्यास तेथून काढून दुसरीकडे लावून दिलें, ही कथा यांत आहे.

### श्लोक

प्रचंड डावा भुजदंड भारी । सव्यें करें वाजवि कैटभारी;
गर्जोनि वृक्षाचवरी, तटाकीं। उडी विषाच्या सलिलांत टाकी
कढे आधीं पाणी रथचरण-पाणी वरुनियां,
उडी टाकी हाकेसरसि उदकीं सांवरुनियां;
भुजंगाचा डोहो गहनहि, अहो, तो खळबळी.
वसे जेथें सर्प स्वगृह करुनीयां खळ, बळी. २

पाणी धनुःशत उचंबळलें ऱ्हदाचें,
त्यामाजि तें विष चि तुंबळ दुर्हृदाचें,
कल्होळ लोकभवकारक ये तटाका,
आश्चर्य हें जरि गमेल मनांत, टाका ! ३
कीं अनंत बळ त्या प्रबळाचें। काय हो नवल याच बळाचें?
हें चरित्र सुर-मानव तारी। वर्णिजे म्हणुनियां अवतारीं.४
उडी ऱ्हदीं टाकुनियां निघाला।
आला खळाच्या सदनासि घाला;
विलास येथूनि दुजा हरी तो।
करी, खळाचा मद जो हरीतो. ५
खेळे जळीं त्या खळ-दंड-पाणी,
विदारितो श्रीभुजदंड पाणीः
जळांत हस्ती करि विक्रमातें,
दावि तसा श्रीहरि या क्रमातें. ६
आफळी ऱ्हदजळीं भुजदंड। त्रास तो करि खळास उदंड;
घोष तो परम दुःसह मानी। कालिया विषमदें अभिमानी७
कर्णहीन नयनें ध्वनि घेतो। क्रुद्ध होउनि भुजंग निघे तो;
देखिला डहुळि जो स्वजळाला।देखतांचि हृदयांत जळाला.
देखिलें नयनिं नंदकुमारा। श्यामसुंदर-वरा, सुकुमारा;
मंदहास्य अतिरम्य मुखाचें।दाखवी स्वमुख नित्य सुखाचें९
हरी तेज सौंदर्य पद्मोदराचें,
असें श्रीपदद्वंद्व दामोदराचें;
न रूपास ज्या साम्य वेदीं पुराणीं,
पहातां पुरेना जयाची शिराणी. १०
खेळे जळीं त्या खळगर्वहंता,
हरावया जी फणिची अहंता;
त्याविण कोणी स्वमदा न वारी,
तो देखिला येरिति दानवारी. ११
देखूनियां क्रुद्ध फणींद्र झाला;

धांवूनियां, श्रीगरुडध्वजाला—
वर्मस्थळीं दंश करूनि दातें,
दावी बळें विक्रम-संपदांतें. १२
तैं सर्पदेहें मग कृष्णजीची—
श्रीमूर्ति, सत्कीर्ति पवित्र जीची,
अनंत कल्याणगुणावतारी,
आच्छादिली, जे भुवनासि तारी. १३
लोकरीति जगदीश्वर दावी,
जे अपूर्व म्हणऊनि वदावी;
हें न जाणति जन व्रजवासी,
दुःखशोक करितील जिवासी. १४
त्यामाजि जे सन्निध गोप जाती,
गाई, गुरें, दुःखपथासि जाती;
तीरीं समस्तांसहि दुःख, आधी,
झाली वदे श्रीशुक तेंचि आधीं. १५
भुजंगें हरी वेष्टिला सर्व देहीं,
न हाले, न चाले, न कांहीं वदे हीः
असें जाणुनी सर्व मूर्च्छेस जाती,
महाशोक-दुःखें, भयें गोपजाती. १६
ज्यां लाभ हा, तो प्रिय पूर्णकामः
ज्याच्या पदीं देह, कलत्र, काम—
समर्पिला, ये रिति त्या अजाला—
देखूनि त्यांतें बहु शोक झाला. १७
मूर्च्छा विमानीं गगनीं सुरांला,
आकांत गाईव्रजवासुरांला;
आक्रंदती, मांडिति रोदनातें,
देखोनि ऐसें मधुसूदनातें. १८
कृष्णाकडे अर्पुनि लोचनांतें । भयें पहाती व्रजमोचनातें;
स्वशोक त्यांला बहु तीव्र जाला। दावी महोत्पात अति व्रजाला।

नभीं उल्कापात, क्षितिवरिहि उत्पात दिसती;
'हरी कोठें आहे?' म्हणुनि जन अन्योन्य पुसती;
हरी गेला राना त्यजुनि बळरामासि सदनीं,
असें हें जाणोनि वदति अतिदुःशब्द वदनीं. २०

हरी चित्त, वित्त, प्रियप्राण ज्यांचा,
न सोसे वियोगाग्नि पादांबुजाचा
न उल्लंघवे दुःखशोकार्णवातें,
उडे धैर्य, जैशीं तृणें जीर्ण वातें. २१

धरुनी मनीं सर्व या काळजीला,
निघाले पहायासि गोपाळजीला;
सर्वे चालिली बाळवृद्धादि-सेना,
हरीवीण जीवित्व कोणा दिसेना. २२

परम वृद्ध बहु लवले कटीं,
धरुनि काठि करें, अतिसंकटीं—
त्वरित चालति, बाळहि रांगती,
हरिच ज्या सुपथीं सकळां गती! २३

वामन.

---

## २० उद्यान.

( चाल—भूपती खरें तें— )

दिवस तो स्मरे मज पूर्णपणें गे ताई।
उद्यानिं फिराया एके दिवशीं जाई॥ धृ०॥

तुज शोभा सांगूं तेथिल कवण्या बोलें।
आनंदें वाटे बाग सर्व कीं डोले॥
शोभती वृक्ष चहुं बाजू, साजिरे।
कारंजें खुललें तेथें, गोजिरें।
चुंबिती लताकुंजांना, मोगरे।
साम्राज्य प्रीतिचें चाले वाटे ताई।
उद्यानिं फिराया एके दिवशीं जाई ॥ १ ॥

हीं सुंदर कुसुमें हास्यमुखानें बघती ।
ह्या लता तरूंना आलिंगुनयां धरिती ॥
वृक्षावरि पक्षिकुलें तीं, येउनी ।
आनंदित करिति जनांला, गाउनी ॥
तीं त्यांचीं मंजुळ गीतें, ऐकुनी ।
साम्राज्य प्रीतिचें चाले वाटे ताई ।
उद्यानिं फिराया एके दिवशीं जाई ॥ २ ॥
हा गुलाब फुलला सुंदरता बागेंत ।
बहु मोद आम्हांला मधुर सुगंधें देत ॥
हे मधुकर काळे तेथें येउनी ।
पुष्पांतिल मधुर रसातें प्राशुनी ।
बागडती स्वैर-पणें तें पाहुनी ।
साम्राज्य प्रीतिचें चाले वाटे ताई ।
उद्यानिं फिराया एके दिवशीं जाई ॥ ३ ॥

कै० सौ० लक्ष्मीबाई बेहेरे.

## २१ जगामधीं या तुला कशाला परमेशें धाडिलें ?]

ईश्वरानें आपणांस दिलेला जन्म व अनुकूलता हीं केवळ आपल्या स्वतांःच्या चैनीसाठीं नसून यांचा उपयोग आपल्या बांधवांसाठीं श्रम करण्यांत व त्यांना धैर्य व कर्तव्यतत्परतेचा धडा दाखवून देण्यांत च झाला पाहिजे असें कवी सांगत आहे.

[ चाल—विरा भ्रमरा० ]

जगामधीं या तुला कशाला परमेशें धाडिलें ?—
कराया श्रम तुजला योजिलें.
मधुर माधवीकुंज आपुले विस्तृत करणें कधीं-
दरूं नको सोडुनि गा तूं मधीं;
घाम उन्हाचा फार येइल बा तुला,
पण धीर धरीं, अस्तसमय पातला,

जों कालाच्या मंजुळ घण्टाटंकारें सुचिवलें—
 चला रे काम अतां संपलें.
देवें उद्गणीं तुला चर्चिलीं काय म्हणुनि सांग कीं ?—
 झगडण्या, नच पडण्या मंचकीं !
 स्फटिक ते धवल जेंवी शोभले,
अश्रु जे तेंवि तुवां ढाळिले—
 तुझ्या धाकल्या उद्यमबन्धूंकरितां, देवें भले
भुजालंकरणीं ते गोविले. २
 धैर्य आणि ती कार्यनिरतता दावुनि तूं आपुली,
बांधवीं स्फूर्ति पसर चांगली;
 तुझें बघुनि ते हृदयिं धीरता घेतिल मग लागलीं,
करीं ही धरितिल कृत्यें भलीं;
 मग-काय सांगणें !— द्वारें तुझिया तयां
देइल सुफलें ईश्वर हरिखूनियां.
 अल्प पुष्पही बिंदु हिमाचे आपुल्या पेल्यांतले
वांटितें भावंडीं आपले ! ३

केशवसुत.

---

## २२ अभिमन्युपराक्रम.

द्रोण धर्मास धरण्याचे उद्देशानें सैन्याची चक्रव्यूहाकार रचना करून युद्धास उभा राहिला. तेव्हां अर्जुन दुसरीकडे युद्धास गुंतला होता, आणि चक्रव्यूहांत शिरण्याची युक्ति तर त्याच्यावांचून कोणास माहित नव्हती; यामुळें पांडव संकटांत पडले असतां अर्जुनाचा पुत्र अभिमन्यु हा पुढें होऊन व्यूहांत शिरण्यास तयार झाला. याचें वय त्या वेळीं केवळ सोळा वर्षांचें असूनही तो मोठा पराक्रमी होता. त्यानें युद्धांत सर्व कौरवांचा पराभव केला; परंतु शेवटीं त्यास सर्वांनीं मिळून मारिलें. या उताऱ्यांत फक्त त्याच्या पराक्रमाचें वर्णन आहे.

### आर्या.

सौभद्र म्हणे, 'शिरतों व्यूहीं, डोहीं जसा मतंगज, घा—
हरि-पोत दंति-युथीं, कीं दहनीं करुनियां पतंग जवा.' १

ज्येष्ठपित्याला देऊनि अभय, म्हणे तो सुवीर सूतातें,
' हूं हांक रथ, म्हणावी माय सुभद्रा सुवीरसू तातें ! ' २
भीमादि सबळ सर्वहि ते उठले व्यूह-कोट फोडाया,
इकडुनि कौरवकटकहि होय पुढें शत्रु-सैन्य मोडाया, ३
रथ थडकले, भडकले हय, शस्त्रजवन्हि धडकले वरते,
अन्योन्य व्यंगुलही राहों देती न धड कलेवर ते. ४
पावत असतां दोन्ही करुनि सुतुमुलाहवास वध सेना,
व्यूहीं शिरे गुरुपुढें, चित्तेंहि जयांत वासव धसे ना. ५
व्यूहीं गमे सुभद्रा-सुत, गज-यूथांत जेंवि बालहरी;
त्यावरि पडल्या सेना, त्या मंथाद्रिवरि जेंवि वा लहरी. ६
बहुतांशीं एकाकी सौभद्र कलह करी समुत्साहें,
असकृत् सूतासि म्हणे,'सुयशस्कर समर हो,समुत् साहें.' ७
तेव्हां स्वत्पुत्रांचीं वदनें झालीं रणांत शुष्करसें,
शोभे विजयोत्साहें अभिमन्यु-मुख प्रफुल्ल पुष्करसें, ८
दुर्योधन स्वयें मग सौभद्र-वधार्थ धांवला कोपें,
कलभ-मथन हरिसि, तसें त्याला तें कर्म वाटलें सोपें. ९
प्रभुचा मर्मीं हाणी सर्वांसहि तीन तीन शर भाचा,
वाटे, बहु सिंहांशीं समर करी कुपित पोत शरभाचा. १०
द्रोण-द्रौणि-कृपादि प्रबल बहु भटांसही न तो आटे;
फाटे तद्दृष्टिपुढें बल, जलदीं मूर्तवातसा वाटे. ११
भेदुनि शरें उरःस्थळ, चळचळ बल-जलधि कर्ण कंपविला;
मुर्च्छित करूनि मद्रप सौभद्रें तत्प्रताप संपविला. १२
एकें सुषेण वधिला, बाणें एकेंचि दीर्घ-लोचन हो,
एकेंचि कुंड भेदी, गमले ते थूक, तो विरोचन हो ! १३
मानी वीर पळाले गुरुनेंहि निवारितां तडक, राया,
स्यंदन शीघ्रहि पिटितां सांगति सूतांसि तांतड कराया.१४
सप्रेम पार्थ-पुत्राप्रति पाहुनि तत्पराक्रमें डोले,
कुरुपति परिसत असतां द्रोण कृपाशीं कृपाभरें बोले. १५
' हर्षवितो मज पुत्राहूनि, नव्हे हा कुमार सामान्य;

धन्या सती सुभद्रा, नंदन जीचा कुमारसा मान्य !' १६

मोरोपंत.

---

## २३ संशयरत्नमाला.

परमेश्वर आपणास अद्यापि कां पावत नाहीं, अशी शंका मनांत आणून कवी अनेक प्रकारचे संशय घेत आहे, व त्यांची आपलीं आपणच उत्तरें देत आहे.

### आर्या.

उठतां बहुत्वरेनें 'कोठें जातां ?' असें तुम्हां देवी—
पुसती झाली जाणों; पुसतां ज्ञाता पुढें न पद ठेवी. १
किंवा नारद आला आलापीत स्वकीय सच्चरितें,
प्रेमळ गीत तुम्हांला, हरि, हरिणापरिस बहुत वश करितें. २
कीं माझें दुर्दैव प्रभुच्या मार्गांत आडवें पडलें,
शरणागत-भय-शमना ! यास्तव येणें तुझें नसे घडलें. ३
किंवा मजहुनि दुसरा कोणी बहु दीन दास आढळला,
तच्छुभ-दैव समीरें त्यावरि करुणा-घन प्रभू वळला. ४
प्रायः सुमुहूर्ताचा शोध करायासि लागला वेळ,
होय महत्कार्य, परि प्रभुचा तों नित्य सहज हा खेळ. ५
किंवा तुज एकाकी पाहुनि, खळ दैत्य आडवे आले,
फुटतां सागर सिकतासेतूचें काय त्यापुढें चाले ? ६
किंवा तुज गुंतविलें भजकीं, परि ते दयार्द्र या रंकीं;
उद्धारित्यासि न सज्जन गुंतविती गाय कष्टतां पंकीं. ७
किंवा चुकतें कांहीं स्तवनीं तेणेंचि मागुता बससी,
तरि हें मन्मूर्खत्व; प्रभु तूं दोषज्ञ ही तसा नससी. ८
कीं भीतो भ्रांत वृथा, मृग-जल-मग्नासि काय तारावें ?
म्हणतां असें कसें ? शिशुभय जाया बागुलासि मारावें! ९
कीं पावावें समयीं सदय मनांतूनि योजिलें जरि तें,
तरि जेंवि रुक्मिणीचें चित्त, माझें अधीर मन करितें. १०
किंवा पुराणपुरुषा, संप्रति बहु भागलासि या कामीं,

तुज नीज लागली, तों सजलों मारावयासि ह्याका मी. ११
किंवा बरी परीक्षा केल्यावांचूनि न प्रसाद करा,
तरि वरि तसाचि आंतहि उगाळितां कोळसा प्रयास करा!
कीं वैकुंठीं पुष्कळ भक्त, तिळ स्थळ नसे, नसावेंची;
वसवा पुरें, पुरे कां म्हणतां धनवंत कण कसा वेंची ? १३
कीं याचकांसि देतां सरले चारीहि मुक्ति-धन-राशी,
भक्तिच मज द्या; द्यावें देवाला अमृत योग्य, न नराशी.१४
कीं भेटि बहु दिसां, भय भेटाया दीनबंधुला वाटे;
तरि भेटावें विधिनें गेले जाताति साधु ज्या वाटे. १५
कीं भीशी, मज एका उद्धरितां लागतील फार झटे,
तरि कोणाहि न कळतां न्यावा झांकोनि दास पीत पटें!१६
कीं लक्ष-भोजनापरि केला संकल्प, संपला, देवा,
तरि दाते क्षुद्रिकळा मग न म्हणति काय, 'या वसा, जेवा.'
कीं एक मी च उरलों पापी, हें बीज ठेविलें जतन;
यतन स्वकीय मज कां करितें त्वन्नाम मंगलायतन ? १८
कीं कार्यबहुत्वें तुज फावेना यावया, जगत्पाळा,
तरि द्या रूप दुजें, तीं विद्या कंठीं वसे जशी माळा ! १९
कीं मागें गुप्त उभा असिसि प्रेमें उभारुनी बाहे,
तरि काय बाळकाचे तूं सादर बोल ऐकशी बा. हे ! २०

मोरोपंत.

---

## २४ कविवंदन.

ह्या उतारा रामदासस्वामींच्या दासबोधांतला आहे. यांत कवीनें पूर्वींच्या कवींना वंदन केलें आहे. व यांत साधारणत: कवींच्या गुणांचें-ही वर्णन आहे. येथें कवी म्हणजे फक्त कविता रचणारे असा अर्थ घ्यावयाचा नाहीं, तर कवी म्हणजे विद्वान्, पंडित, ग्रंथकर्ते, असें समजावयाचें.

### ओंव्या.

आतां वंदूं कवीश्वर । जे शब्दसृष्टीचे ईश्वर,

ना तरी हे परमेश्वर । वंदावे ते. १
कीं, हे सरस्वतीचें स्थान । कीं हें नाना-कळांचें जीवन,
नाना सद्विद्यांचें भवन । यथार्थ होय. २
कीं हे पुरुषार्थाचें वैभव । कीं हे जगदीश्वराचें महत्व,
नाना लाघवें सत्कीर्तिस्तव । निर्माण कवी. ३
कीं हे शब्दरत्नांचे सागर ! कीं हे मुक्त-सरोवर,
नाना विद्यांचे वैरागार । निर्माण झाले. ४
कवी मुमुक्षूचें अंजन । कवी साधकाचें साधन,
कवी सिद्धाचें समाधान । निश्चयात्मक. ५
कवी स्वधर्माचा आश्रयो । कवी मना मनोजयो,
कवी धार्मिकाचा विजयो । विजयकर्ते. ६
कवी वैराग्याचें संरक्षण । कवी भक्ताचें भक्ति-लक्षण,
नाना स्वधर्म-संरक्षण । ते हे कवी. ७
कवी प्रेमळांची प्रेमळ स्थिती। कवी ध्यानस्थांची ध्यानमूर्ती,
कवी उपासकांची वाढ-कीर्ति । विस्तारली. ८
नाना साधनांचें मूळ । कवी नाना प्रयत्नांचें फळ,
नाना कार्यसिद्धि केवळ । कवींचेनि प्रसादें. ९
आधीं कवींचा वाग्विलास।तरी मग श्रवणीं तुंबळे रस,
कवींचेनि प्रतिप्रकास । कवित्वासी होय. १०
कवी व्युत्पन्नाची योग्यता । कवी सामर्थ्यवंताची सत्ता,
कवी विचक्षणाची कुशलता । नाना प्रकारीं. ११
कवी कवित्वाचा प्रबंध । कवी नाना-धाटी-मुद्रा छंद,
कवी गद्य-पद्य भेदाभेद । पद-प्रकार- कर्ते. १२
कवी सृष्टीचा अळंकार । कवी लक्ष्मीचा शृंगार,
सकळ सिद्धींचा निर्धार । ते हे कवी. १३
कवी सभेचें मंडण । कवी भाग्याचें भूषण,
नाना सुखाचें संरक्षण । ते हे कवी. १४
कवी देवांचे रूप कर्ते । कवी ऋषींचें महत्व वर्णिते,
नाना-शास्त्रांचें सामर्थ्य ते । कवी वाखाणिती. १५

नसता कवींचा व्यापार । तरी कैंचा जगदुद्धार,
म्हणोनि कवी हे आधार । सकळ सृष्टीसी. १६
नाना-विद्या-दातृत्व कांहीं । कवीश्वरांवीण तों नाहीं,
कवींपासून सर्व कांहीं । सर्वज्ञता. १७
मागें वाल्मीकि व्यासादिक । झाले कवीश्वर अनेक,
तयांपासूनि विवेक । सकळ जनांसी. १८
पूर्वीं काव्यें होतीं केलीं । तरीच व्युत्पत्ती प्राप्त झाली,
तेणें पंडितता अंगीं बाणली । परम योग्यता. १९
ऐसे पूर्वीं थोर थोर । झाले कवीश्वर अपार,
आतां आहेति, पुढें होणार । नमन माझें त्यांसि पैं. २०
नाना-चातुर्यांच्या मूर्ती । कीं हे साक्षात् बृहस्पती,
वेद-श्रुती बोलों म्हणती । ज्यांच्या मुखें. २१
परोपकाराकारणें । नाना-निश्चय अनुवादणें,
शेखीं बोलिजे पूर्णपणें । संशयातीत. २२
कीं हे अमृताचे मेघ वोळले । कीं हे रसांचे ओघ लोटले,
नाना-सुखांचे उचंबळले । सरोवर हे. २३
कीं हे विवेक-निधीचीं भांडारें । प्रकट झालीं मनुष्याकारें,
नाना वस्तूंचेनि विचारें । कोंदाटले हे. २४
कीं हे आदिशक्तीचें ठेवणें । नाना-शक्तींशीं आणी उणें,
लाधलें पूर्वसंचिताच्या गुणें । विश्वजनासी. २५
कीं हीं सुखाचीं तारुवें लोटलीं । अक्षयी आनंदें उतरलीं,
विश्वजनासी उपेगा आलीं । नाना प्रयोगांकारणें. २६
कीं हे ईश्वराचा पवाड । पाहतां गगनाहुनि वाड,
ब्रह्मांडरचनेहुनि जाड । कवि प्रबंध-रचना. २७
आतां असो हा विस्तार । जगासि आधार कवीश्वर,
तयांसि माझा नमस्कार । सांष्टांगभावें. २८

रामदास.

-----

## २५ दिव्य उद्यान.

### साक्या.

स्फटिक मण्याचे रस्ते होते बांधिव सुंदर मोठे.
स्वच्छ जलाचे पाट वाहती झुळझुळ कोठें कोठें. १
मोठे मोठे वृक्ष शोभती अशोक-पुन्नागांचे,
इच्छित फल देणारे पिंपळ औदुंबर ही साचे. २
बोरि-जांभळी, तुती, आंवळी, बकुळी ठायीं ठायीं
दोन बाजुंनीं वेतकमानी, त्यांवरि पिंपाळि जाई. ३
चंद्रविकासी, सूर्यविकासी जलांत सुंदर कमळें,
मधुर सुवासें गुंग होउनी भ्रमर तयांवरि खेळे ! ४
सारस, तित्तिर, चक्रवाकही, गरीब लावे असती,
मयूर, पोपट, मैना, कोकिळ स्वच्छंदें किलबिलती. ५
स्वभाव चंचल टाकुनि होती मधूमक्षिका स्वस्थ,
भ्रमरांचा गुंजारव परिसुनि विहंग होति तटस्थ. ६
सुगंध शीतल मंद वायुनें होई सौख्य मनासी,
पापी, निंदक, देवद्रोही न दिसे स्थान तयांसी. ७
स्वच्छ जलाचे तलाव मोठे; तयांत कारंजांचे—
उडति फवारे जणुं मोत्यांचे तुरे उभाविले साचे ! ८
कांहिं कांसवें, मीन पोहती कासारांत सुखानें
वरूनि कांहीं पदार्थ पडतां झेलुनि घेति मुखानें. ९

श्रीमती राधाबाई केळकर.

---

## २६ सर्व धर्म एकच आहेत.

आपण सर्व एकाच परमेश्वराचीं लेकरें आहों; तेव्हां आपण आपसांत कां भांडावें ? जेथें जेथें कांहीं अधर्म अगर अन्याय होतो तेथें तो सर्वशास्ता परमेश्वर अवतारी पुरुष उत्पन्न करितो. बुद्ध, शंकराचार्य, मुसा (मोझिस), जरदुस्त, महमद वगैरे सर्व त्यानें मुद्दाम पाठविलेले

प्रोत्पित्तन होत. तेव्हां धर्ममतांचे भिन्नभाव विसरून सर्वांनी एका त परमे-श्वरास भजावें, अशी कवि सर्वांस विनंती करीत आहे.

पद.--चाल, ‘ उद्धवा, शांतवन कर जा० ’

वंधु हो, त्यजुनि अभिमाना, प्रभुसि भजा एका भावें ॥ध्रु॥
नाथ एक सकलजगाचा, माय-बाप सकलां तो चि:
तो पाळी, पोसी तो ची, अखिल जगीं सत्ता त्याची;
नर-नारी नाना देशीं, बालकें तयाचीं साचीं:
(चाल) तुम्हि विसरुनि अपुलें नातें, कां करा उगि च कलहातें?
सकलांच्या परमेशातें, एकचित्त होउनि ध्यावें. १ वंधु हो०
जेथ जेथ ज्या ज्या काळीं, उग्र होय धर्मग्लानी,
ज्ञान, सत्य, लोपुनि सारें, जन होती बहु अज्ञानी:
नयनीती टाकुनि अवघे, रत होती असदाचरणीं:
(चाल) तेथ तेथ विभु जनशास्ता, भक्तराज, वंद्य समस्तां,
निर्मितो धर्मनयनेता,-कीं, जना सुपथि लावावें. २ वंधु हो०
तो पाठवि आर्यावर्तीं, बुद्ध-जिनां, शंकर-व्यासां:
तो सिरियादेशीं प्रेषी, भक्तवर्य मूशा-ईशां:
पारसिकीं आरबदेशीं, जरदुस्त--महंमददासां:
(चाल) एकचि तो पूज्य समस्तां, तो सकलधर्ममतिदाता,
कां धरितां नाना-पंथां, वंधुत्वें त्यासि भजावें. ३ वंधु हो०

वा. आ. मोडक.

---

## २७ अन्योक्ति.

‘ लेकी बोले सुने लागे, ’ अशी मराठींत म्हण आहे: त्याप्रमाणें एकास बोलून दुसऱ्यास लागेल असा ज्यांत अर्थ असतो, अशा बोलण्यास ‘ अन्योक्ति ’ असें म्हणतात. अन्योक्तींत एकास बोलून दुसऱ्यास लागेल असें, किंवा पशु, पक्षी, झाड, फळ वगैरे कोणास तरी ‘ अन्यास ’ उद्देशून बोलून त्यांत मनुष्यास लागेल असा गर्भित अर्थ असतो: व अशा रितीनें पर्यायेकरून लोकांस बोध केला असतो.

### कोकिलान्योक्ति.

येथें समस्त बहिरे वसतात लोक,

कां भाषणें मधुर तूं करिशी अनेक ?
हे मूर्ख, ज्यांस किमपी हि नसे विवेक,
रंगावरूनि तुजला गणतील काक. १

काका, मौन धरूनि बैससि जरी या आम्रवृक्षावरी,
तूतें कोकिळ मानितील जन हे सारे स्वचित्तीं तरी;
होती स्थानगुणेंचि थोर बहुधा वस्तू : नृपाच्या शिरीं—
पंका कोण न मानिती मनिं, 'असे कीं कस्तुरी ही खरी !' २

या माळावरि वृक्ष एकहि नसे बारे खुळया कोकिला,
येथें मंजुळ शब्द काढुनि गळा कां शोषिसी आपुला ?
जेथें बोल अमोल वाटति तुझे, तो देश बा वेगळा,
तेथें आम्र फुलोनि, गंध विखरे चोहींकडे आगळा ! ३

वसंतसमयीं फुले, परिमळें दिशा व्यापि जो,
जयास अवलोकुनी सुरतरूहि चित्तीं थिजो;
तया सतत सेविती विहग आम्रवृक्षा किती ?
परी पिकचि एकला मधुर वाणि लाधे कृती. ४

## चातकान्योक्ति.

नको धावुं, बा चातका, मेघ नाहीं,
धुराचा असे लोट हा नीट पाहीं:
न या सेवितां तूज पाणी मिळेल,
तुझ्या मात्र डोळयांतुनी तें गळेल ! ५
ते अन्य मेघ, तव जे हरिती तृषेतें,
कां व्यर्थ आरडुनि शोषविशी जिभेतें ?
हे, चातका, घन रिते शिशिरांत येती,
जे गर्जती, परि न वारिकणा हि देती. ६
नवीं पद्में जेथें विकसुनि सुगंधा विखरती—
तळीं ऐशीं तोयें सतत भरलीं फार असती,
तरी पर्जन्याचे जलकण चि कां चातक पितो ?
गमे मातें, मानी शिर नमविण्या लाज धरितो ! ७

## मयूरान्योक्ति.

झाडें पेटुनि वाजती कडकडां, त्यांचा ध्वनी होतसे,
ज्वाळा राहुनि राहुनी उठति या विद्युल्लता ही नसे;
काळा धूर नभीं बहु पसरला, हा मेघ नोहे खरा.
वर्षाकाळ न हा, दवानल असे, मोरा पळें रे घरा ! ८

मयूरा तुला भूषवी हा पिसारा,
तुझा यामुळें जाण लौकीक सारा:
तया सांडतां हानि तूझी घडेल,
नृपाच्या किरीटावरी तो चढेल ! ९

## शुकान्योक्ति.

फळें मधुर खावया असति, नित्य मेवे तसे,
हिरेजडित सुंदरीं कनकपंजरीं ही वसे—
अहर्निश; तथापि तो शुक मनांत दुःखें झुरे,
स्वतंत्र वनवृत्तिच्या घडिघडी सुखातें स्मरे ! १०

वसुनि उपवनीं या जोंवरी कावळा हा—
करित कटकटीनें लोककर्णांस दाहा,
बस निमुट, शुका तूं. तोंवरी स्वस्थ कोठें;
कमिपण गुणवंता काय मौनांत मोठें ? ११

## बकान्योक्ति.

उभा राहे एके चरणिं धरणीतें धरुनियां,
तपश्चर्या वाटे करित जणुं डोळे मिटुनियां;
बका, ऐशा ढोंगें तव अमति मासे च ठकती,
परि ज्ञाते तूझें कपट लवलाहीं उमजती ! १२

## सिंहान्योक्ति.

मी रोड एकटा मी, आणी मज पाठबळ नसे कांहीं—
ही शंका स्वप्नीं ही सिंहा ! तुझिया मनीं वसत नाहीं. १३
सांप्रत पुनः पुन्हा कां हे हत्ती मत्त गर्जती फार ?
गेला सिंह वनांतरिं वाटे, ज्याचा पराक्रम अपार. १४

मेघांच्या गर्जनेनें खवळुनि वरती सिंह पाहे स्वभावें,
काका, त्वां भीति सारी त्यजुनि तरुवरी मांसखंडास खावें:
जो उन्मत्ता गजाच्या खरतरनखरीं फोडुनी मस्तकातें—
धाला रक्ता पिऊनी, न च मृतपशुच्या इच्छितो तो कणातें.

कुतीचीं आयाळें जडवुनि, गळा पुष्ट करुनी,
बसे श्वा सिंहाच्या पदिं बहुत आवेश धरुनी:
तरी, जो ऐकोनी भिउनि पळती मत्त हि करी,
कसा त्या नादातें क्षणभरि हि तो पामर करी? १६

पद्यरत्नावली.

# भाग दुसरा



## ईश्वराचें प्रातःस्तोत्र.

कवि प्रातःकाळीं आपण स्वतां परमेश्वरस्तवन करीत आहे व पर्वत, नद्या, रवि, चंद्र, वगैरे यांसही आपल्याबरोबर प्रभुस्तुति करण्यास सांगत आहे.

### श्लोक.

चमत्कृतिनिधान ही कृति तुझी, जगाच्या पते !
तुझें च जगदंड, जें अखिल चित्त आकर्षितें;
सुरम्य इतुकी जरी कृति तुझी, तरी तूं किती—
सुरम्य अससी प्रभो ! खुटतसे मतीची गति. १
निवास तव कोणता कळतसे न हें निश्चयें,
स्वरूप न च ही तुझें दिसुनि चर्मचक्षूंस ये;
तरी तव मनोहर कृति जरी हि साधारणा,
दया प्रगट दाविते, अतुल शक्ति, अस्मन्मना. २
नेत्रांहीं देखितोहे परिजनगण जो किन्नराख्य प्रभूतें,
गातो काव्येंकरूनी निशिदिनिं विभुची कीर्ति वाद्यांवरी ते,
त्यासी पृच्छा करीं मी, "करुनि मजवरि प्रीति,सांग मला तें
आहे कोठें प्रभूची वसति? सतत जी मोद देते च तूतें." ३
जे हिंडती पशु समस्त धरातळाला,
जे मीन सेविति पयोनिधिच्या जळाला,
व्योमीं विहार करिती खग जे, तयांसी
याचीं अहर्निश, 'भजाच तुम्ही प्रभूसी.' ४
दिसे शुक्र हा पूर्वभागीं प्रभातीं,
जना सूचवी दूत सूर्यप्रभा ती,
जयाची प्रभा द्योतवीते नभातें,
'करीं' त्या म्हणें मी 'प्रभूच्या स्तवातें.' ५
असे चक्षु जो सूर्य सर्वा जगाचा,

असे अंतरात्मा समग्रां जिवांचा,
तया मी म्हणें-'थोर ईशास मानीं,
प्रभातीं, दुपारीं स्तवीं अस्तमानीं ६
कधीं चांद्र येतो रवीच्या घराला;
करूनी कधीं तारकांचाच मेळा--
विराजे विधू पूर्ण आकाशगामी,
' स्तवीं रे परेशास ' याचीं तया मी. ७
ग्रह, जे रविची प्रदक्षिणा
करिती एकमतें, तयांस मी—
करितों अतिलीन याचना,
' प्रभुचें गीत मुखें वदा तुम्ही. ८
जीं द्रव्यें पंच केलीं अनल, जल, धरा, वायु, आकाश,ईशें
यत्संयोगेंच सारें नयनविषय हें सृष्ट विश्व प्रकाशे,
ज्यांच्या योगेंच होती सुखद षड्तु हे त्यास मी प्रार्थितों हें,
'सर्व स्थित्यंतरीं हो प्रभुकवन करा,विस्मरा त्या न मोहें!'९
तापे सूर्य नदादिकांवरीं, करीं उष्णा जला शोषवी,
पावे नीर नवीन रूप घनसें त्यातें रवी रंगवी;
ऐसा जो घन अंबरीं झळकतो, निःशब्द वा वर्षतो,
' ईशा मोदभरें स्तवीं सतत तूं '-ऐसें तया याचितों. १०
चारी दिशांकडुनि मारुत वाहती जे,
त्यांहीं प्रभुस्तवन सप्तसुरांत कीजे;
ऐकूनि हें श्रवणरंध्रविहार गीत,
प्रेमोत्कटें रसिक पादप ते डुलोत. ११
घेती नद्या जनन ज्या गिरिगव्हरांत,
गाओत त्या प्रभुवरा रमणीय गीत;
सत्पक्ष कोकिल, वसंतसखे, वनांत—
मोदें प्रभुस्तव करोत निजस्वनांत १२
" नमस्ते जगत्कारणा ! आदिशक्ते !
नमस्ते प्रभो ! क्षेमदात्रे नमस्ते !

जसें ध्वांत सूर्यागमीं नाश पावे;
तसे त्वत्करीं पाप माझें पळावें ! ”

महाजनी.

---

## २ प्रभात.

प्रभातकाळीं सर्वत्र कसा आनंद पसरलेला दिसत आहे याचें वर्णन करून कवी अशा मंगल वेळीं परमेश्वराला वंदन करण्यास सांगत आहे.

[ ‘ घनश्यामसुंदरा, ’ या भूपाळीच्या चालीवर ]

प्रभात झाला, रवी उदेला, ऊठ, उशिर झाला:
प्रेमळभावें सरळमनानें वंदिं जगत्पाला. १
दहिंवर पडलें, मौक्तिकवृष्टी जणुं भूवर झाली,
प्रेमरंगरंगित ही स्मितमुखि पूर्वदिशा खुलली. २
मंद मंद मधुगंध समीरण येती भेटाया,
आलिंगुनि सांगती,-‘काळ हा दवडुं नको वायां !’ ३
हास्यवदन ही सुमनमंडळी उठुनि उषःकालीं--
दहिंवरतोयें जणुं का प्रातःस्नान करित बसली. ४
प्रसन्नवदना वनलक्ष्मी ही शुचिर्भूत दिसते.
नानाविध नवपल्लव वाहुनि देवपुजा करिते. ५
तरुवर उठले, प्रफुल्ल झाले, आनंदें डुलती,
तन्मय होउनि मानसपूजा जणुं का हे करिती. ६
विहंग उठले, गाउं लागले तरुवरि केव्हांचे,
मंजुळ वाणी ऐक, जणूं हे गायक स्वर्गींचे. ७
गगनविहारी खग वैतालिक वायूवरि बसुनी-
प्रभुगुण गाती उंच अंबरीं तल्लिन होऊनी. ८
खळखळ वाहत, लगबग येती तटिनी गिरिवरुनी,
देवदर्शना जणूं चालल्या भाविक या तरुणी. ९
तरुवसनावृत तुंग पुरातन पर्वत हे दिसती,
वल्कलधारी आद्य ऋषी जणुं ध्यान धरुनि बसती. १०

जिकडे तिकडे मंगलमय हें भूमंडळ दिसतें,
ऊठ, मानवा, आळविं प्रभुला, जाईं शरण त्यातें! ११

दत्तकवी

---

## ३ नीतिबोध.

### आर्या.

भज सन्मार्गांत तूं, देवज्ञांची करूं नको गर्हा,
स्वप्नींहि देवहेलन न करावें, रीति हे तुला अर्हा. १
बा! कोप, लोभ, शठता, असदाग्रह, पिशुनता, कुटिलभाव,
उद्वेग, दंभ यत्नें सोडीं, जोडीं महाजनीं भाव. २
नसतां विवेक कांहीं, बा, घडतो आत्मघात ही कुपिता,
सुपिताहि क्रोधाच्या आवेशेंकरुनि होतसे कु-पिता. ३
सुखसंपन्नीं मैत्री, नित्य दया दुःखितीं जनींहि करीं,
संतोष पुण्यवंतीं, बा! औदासीन्य, दुर्मतींत धरीं. ४
अतिगर्व, अतिक्रोध, श्रम, निद्राहार, भाषण, क्रीडा,
हे षट्पदार्थ वर्जीं, होईल यांतें न वर्जितां पीडा. ५
विद्योत्साह, श्रद्धा, स्मृति, पुण्य, ख्याति, धैर्य हे आधीं-
अनघा मन घालुनियां अतिपूर्वक षट्पदार्थ तूं साधीं. ६
सक्रोध हो अरिजनीं, स्वपरिजनीं हो दयार्द्र तूं बापा;
सकृप, सलोभहि चित्तीं हो स्वजनांच्या हरावया तापा. ७
हो द्वेषी पाखंडीं साधुजनीं हो सराग तूं बा गा;
दुर्मतीं केवळ जड, पिशुनोक्तींबधिर हो, महाभागा! ८
नास्तिक, धूर्त, पतित, शठ, षंढ, कितव, चपल, खल, जड, क्रूर,
निजकल्याणाकरितां सुज्ञा! सोडूनि यांसि दे दूर. ९
जननी, जनक, सतिस्त्री, गुरु, सज्जन यांचिया वचां, साधो!
विश्वास सदाहि धरीं, न अविश्वासें तुला व्यथा बाधो! १०
सावध सदा असावें संसारीं, स्वहितकृत्य लक्षावें;
पुरुषार्थाचें साधन बा, धनसें हें शरीर रक्षावें. ११

निर्दोष जे तयांची चित्तांत कधीं धरूं नको शंका;
प्राण हि वेंचुनि रक्षीं वृद्धा, बाळा, सुदुर्बळा, रंका. १२
सोसिति अपकारांतें, उपकारांतें न साधु आठविती;
कीं सोसितां न सा विति होय वपु,न सोसितां न आठ विती!
मृत्यु हरितसे समयीं अमरांस हि, कोण मृत्युला चुकवी,
ऐसें जाणुनि तत्त्व, व्यसनांत न मोह पावती सुकवी. १४
व्यसनीं सहाय होउनि आप्ताला होय जो परासु कृती,
शक्रादिलोकपालांमध्यें बहुमान्य तो बरा सुकृती. १५
नांदे सुखें सदोदित संसारीं तो चि, जो अनय न करी,
न निघे इतर जन,बुडे व्यसनीं, पंकीं जसा अ-नयन करी.१६
यत्नें कीर्ति च जोडीं, बा ! होय पदार्थ हा चि बहु धन्य !
राजे पंडित यांचें भूषण नाहीं च कीर्तिहुनि अन्य. १७
खळ निंदिति म्हणुनि बुधें टाकावी काय हरिगुणासक्ती ?
दीर-नणंदा-जांचें साध्वी न त्यागिती सुपतिभक्ती. १८
दुर्लभवस्तु न वांच्छी, न करी जो नष्टवस्तुचा शोक,
आपत्तींत न मोहे, त्या पंडित म्हणति जाणते लोक. १९
कामें क्रोधें, लोभें नागविले अमित, यांस जे भुलले,
यांच्या कुदृष्टिपातें तेजस्वी पुरुषहीर ही उलले. २०

मोरोपंत.

---

## ४ सेतुबंधावर उत्प्रेक्षा.

लंकेस जाण्याकरितां रामानें सेतु बांधविला. हा सेतु नसून दुसरेंच कांहीं आहे, अशा एकेक कल्पना कवी लढवितो. ‘ अमूक वस्तू जणूं काय अमूकच आहे, ’ असें कवी जेव्हां वर्णन करितो, तेव्हां तेथें उत्प्रेक्षा असें म्हणतात. उदाहरण, ‘ हें तोंड जणूं काय चंद्र च आहे, ’ ही उत्प्रेक्षा झाली.

### आर्या.

शतयोजन आयत, दश-योजन विस्तीर्ण सेतु शंकेतें--

दे, गेला बुडवाया कोपाकुल भूमिबाहु लंकेतें. १
किंवा तो कपिकटकोत्तरसिंधूद्गत बुभुक्षु कालाऽही--
दूर पसरला खाया रात्रिचरां क्षुद्र-बेडकांला ही. २
सेतु न तो, यत्पतिनें स्वसुता नेली, जशी वृकें पणी,
त्या लंकेची श्रीभू-देवीनें ओढिली असे वेणी. ३
राम-जयश्री-लक्ष्मीं लंका घाली सुनील पाटावें--
सेना-वऱ्हाडिणीला पायघडी, कां असें न वाटावें? ४
बहुधा तुच्छ जलधितृण चाटायाचा धरूनियां वीट--
गेला प्रभुप्रतापासित-पथ रक्षोटवीकडे नीट. ५
कीं पतितपति त्यागुनि विश्वशरण्याकडे रडत वाटे,
आली जी लंका-श्री, तीचा तो सांजनाश्रुपथ वाटे ! ६
कीं रचिलें स्वापयशें शोकानल-दग्ध-सागरोर चि तें !
सूचविले तर्क असे त्या सेतुवर महा-सुधी रचितें. ७

मोरोपंत.

---

## ५ झरा !

झरा स्वतः आपलें वर्णन करीत आहे असें कल्पून कवी झरा व त्याचे कांठचा प्रदेश वगैरेचें वर्णन करीत आहे.

( वृत्त—द्रुत-विलंबित. )

घन पिता मम, जो नटवी धरा,
मम असे जननी गिरिकंदरा;
जननिचे शरिरीं बहु नाचतों
खदखदां हंसतों अणि खेळतों ! १
जलनिधी मम थोर पितामह
सतत त्या सरिता भगिनींसह
त्वरित भेटुं म्हणोनिच धांवतों
तरि वनस्पतिला तटिं पोसतों ! २
गगनचुंबित हे तरु लागती
मम सुतावलि तीरिं मदीय ती !

पुजुनियां निज कोमल पल्लवें
मजवरी तरुराजि शिरें लवे ! ३
हरित घालुनि वस्त्र तटीं स्वतां
प्रणयरूपवती युवती लता
हरित पल्लव शालुस लेउनी
नटुनियां दंव-मौक्तिक-भूषणीं ४
विविधवर्णि अलंकृत होउनी
तरुपतींस अती कवटाळुनी
सु-तनु त्या हंसती सुमनें किती
मम तटीं रमती पतिशीं अती ! ५
प्रणय त्यांवरिही मम निश्चित;
मम जलांतरिं होउनि बिंबित,
जरि विलोल तरी हृदयीं पहा
वसति त्या मम संततही अहा ! ६
कनकगोल रवी उदयाचलीं
सहज नाशित येइ तमावली,
तरुतुनी कर घालुनि तो बळी
बहु सुवर्णसुमें उधळी जळीं ! ७
पवन वंशनिकुंजि शिरोनियां
श्रुतिमनोहर गान करोनियां
उठवितो द्विज, वृक्ष-लतादिकां
म्हणतसे ' प्रभुगान करां न कां ? ' ८
खळखळाट तयीं मम ऐकुनी
जळहि निर्मळ हें मम पाहुनी
पिक, मयूर उडोन हि नाचुन
करिति रम्य विभुस्तवगायन ! ९
सळसळां तरती बदकें जिथें
अचळ हो जळ दर्पणतुल्य तें;
उसळती जळिं चंचळ मासळ्या

टपति त्यां बक, धीवर पंक्ति या ! १०
तरुंतुनी नृपतीसम बाहुनी
चमकतें हि कुठें कुरणांतुनी !
कृषक लावित या तटिं शेत तो
मधुनि मी विभवें स्थिर वाहतों ! ११
जिथजिथे वसतों मज पाहतां
प्रमुदिता दिसते वनदेवता !
सुमफलांसह सज्ज सदैव ती
सुखविण्यास समा सकलां सती ! १२
थकुनि, भागुनि पांथ कधीं जरी
दुरुनि येइ तृषातु  या तिरीं
निववि तद्वान मी अ  लया जळें
निववितातहि भूक तरू फळें ! १३
रविकरें गिरि कानन तापती
कर भयें परि या जळिं कांपती
रवि कसा मग तापद हो तया ?
पथिक जो कुणि ये मम आश्रया ! १४
मम तटीं पसरे घन सावली
कधि न वास करी कलि या स्थलीं.
झुळुझुळू स्वन मंजुळ गाउनी
निजवितो पथिकां मन मोहुनी ! १५
मग कसा तरि होइ न तुष्ट तो ?
स्वसदनीं सुत-पत्निस सांगतो—
किति रम्य असे तरि निर्झर !
अमित धन्य जगांत खरोखर !' १६
उटज बांधुनियां तटिं तापसी
सु-तप आचरती सुखि मानसीं
सतत चिंतन ते करिती इथे
कितिक सेविति ते सुख-शांतितें १७

जळ मृगेंद्र तसे मृगही पिती;
द्विज तसे अतिशूद्र पिती किती !
लघु व थोर असा मुळिं भाव तो
मम मनांत कधीं हि न राहतो ! १८

किति युगें असती तरि लोटलीं
नृपकुलें किति मीं तरि पाहिलीं
विकृति जाहलि या जगतीं किती
पलटली मनुजा तव ही स्थिति ! १९

दिवस वा रजनी; सुख-दुःख हीं;
जनन-मृत्यु घडो जगिं कांहिं ही;
सतत वाहतसें स्फटिकासम
खळखळाट न हो स्थिर हा मम ! २०

मम पिता मज ये जधिं भेटण्या
बहुत गर्वभरें करि गर्जना !
परि गढूळ बहू जळ पाहुन
मम तिरस्कृति तें करिती जन ! २१

भास्कर रामचंद्र तांबे.

---

## ६ कर्णाचा अभिमान.

कर्ण जन्मास आला तेव्हांच त्याच्या शरीरावर कवचकुंडलें होतीं, यामुळें त्याचें शरीर अभेद्य होतें. अर्जुनाला कर्णास मारावयास ही अडचण होती, ती दूर व्हावी म्हणून इंद्रानें ब्राह्मण-रूपानें कर्णाकडे तीं कवचकुंडलें मागावयास जाण्याचा बेत केला. कर्ण मोठा उदार होता, तेव्हां तो तीं खास देईल, व मग त्याचा घात होईल, म्हणून कर्णाचा बाप सूर्य यानें त्यास स्वप्नांत येऊन कवचकुंडलें न देण्याविषयीं बोध केला. परंतु अभिमानी कर्णानें तो ऐकला नाहीं, व पुढें इंद्र मागावयास आला असतां त्यास तीं कवच-कुंडलें दिलीं, अशी कथा यांत आहे.

## आर्या

स्वप्नीं द्विजरूपी दिन-कर कर्णाला म्हणे, ' अगा राया,
कांहीं विहित-हित तुला आलों सांगावया अगारा या. १
तूं ब्रह्मण्य, वदान्यश्रेष्ठ, असें विश्व सुमहिमा गातें,
म्हणतें त्वन्मुख, 'न क्षम जें द्याया स्वद्रुसुमाहि, मागा तें.' २
देयार्थें पात्रेच्छापूर्ति, बुध म्हणेल बा कशास न हो,'
परि वंचाया विप्रच्छद्में येणार पाकशासन हो ! ३
अमृतोद्भव कुण्डल-युग,सहज कवच हें तया न ओपावें,
तदितर सर्वस्वार्थी जो विप्र, तया म्हणोनि 'ओ' पावें.' ४
कर्ण म्हणे, 'कोण तुम्ही?' विप्र म्हणे, 'मी तुझा पिता सविता
तळमळतो वाराया अहिता, साधावया हितास विता. ' ५
कर जोडुनि कर्ण म्हणे, 'करिति न गुरुवर्य कूपदेशाला;
नेतो न मानसींच्या निजशिशुतें हंस कूप-देशाला. ६
हानि नसो उपदेशें तुमच्या, बहु वृद्धि मद्यशाला हो,
सत्कीर्ति अमृत-शाला, गुरुजी, अपकीर्ति मद्य-शाला हो! ७
शोभा यशें चि, न अशी लोकीं धृत-दिव्य-कुण्डलें कानें,
जोडुनि अयश न व्हावें पितृहृदयीं अग्निकुंड लेकानें.' ८
भास्कर म्हणे,-'बुडावें त्वच्छोकविषार्णवांत पुत्रा म्यां,
हें वाटेल उचित, तरि दे कुण्डल-कवच-दान सुत्राम्या.' ९
कर्ण म्हणे, 'जो अयशा, गुरु शोकद, तोचि मन्द नर मेला
विष्णु हि म्हणेल व्हावा सुयशा शोकद हि नंदन रमेला.' १०
सूर्य म्हणे, 'मागावी बा, दिव्याऽमोघशक्ति हरिकरगा
घत्सा, स्ववधेच्छुधनंजय-दघसाहित्य हें चि तरि कर गा' ११
'हें करिन, हरिन अरि-नर-देवप्राण हि,विचिन्त तूं जा गा;'
ऐसा स्वप्न विलोकुनि तो श्रीमान् कर्ण जाहला जागा. १२
द्विज-काम-पूर्ति-पर्वीं मन्त्रजपाच्या जपोनि अवसानीं,
ये द्विज-तनु हरि, दुर्लभ ज्याचें दर्शन जनासि नवसांनीं. १३
शक्र म्हणे, 'तुजचि पुढें 'दे' हें उच्चारितां न भी कवि भो—
साधो,म्हणउनि आलों कांहीं मागावयास भीक विभो!' १४

कर्ण म्हणे, 'कर जोडुनि पुसतो हा विप्रदास, कळवा जी,
काय तुम्हां द्यावें म्यां, धन, कन्या, ग्राम, वा सकळ वाजी.'
ब्राह्मण म्हणे, 'अदेय स्वप्राण हि बा बुधा न दात्यातें;
जें सत्कवियश, कैचें जीवनदा ही सुधा नदा त्यातें. १६
निज कवच-कुंडलें मज दे, दात्या, याविणें नको कांहीं,
तापदहि मानिजेतो, ताप-हर हि न कोकांहीं.' १७
कर्ण स्मित करुनि म्हणे, ' ऐसें द्यावें तुम्हीं च वरदांनीं,
अजि देवेश्वर हो, मज कां योजितसां अशक्य-वर-दानीं? १८
द्यावें कसें स्वजीवनहेतु सरोदान मीनयादानें,
द्यावें हि कसें जलदें, देवा वांचेन मी न या दानें. १९
होईन वध्य मी, तूं उपहास्य असें करूं नको, पावें!
प्रभुनें काय न्याय-व्रत-वर्तिच्छल करून कोपावें? २०
घ्या कवच-कुण्डलें ग्रहणाग्रह जरि, परि असें तरि करा, जी,
द्या शक्ति ती अरिवधीं, बहुमान्य अरिधरा हरि-करा जी.'
शक्र म्हणे, 'घे, देतों, मागें कोणासही न दिधलीला
कृत्या-व्यालयशनीच्या दावितसे शक्ति नैकविध लीला. २२
सोडावी हे प्राणव्यसनीं एकीं, करील कृत्याशी
नाहीं तरि परतोनि स्वत्प्राणांतें हरील कृत्याशी २३
एक रिपु वधुनि येइल मद्धस्ता, श्री जशी स्वकरवीरा;
स्मरण असों दे, इच्या मोक्षीं बरवा विचार कर वीरा.' २४
कर्ण म्हणे, 'मी समयीं इतें एकीं नरींच सोडीन,
मग हे जाऊ, मज न त्यागी ऐशी सुकीर्ति जोडीन.' २५
कापूनि कर्ण दे जें वज्रसम अभेद्य सहज कवच रणीं,
ऐसेंचि सत्त्व-शीळ श्रीवर वाहे स्वनेत्र भव-चरणीं. २६
त्या शुचि-सत्त्व-समुद्रा, दात्यांच्या नायका, पिता काय,
धन्य म्हणे हरि हि मनीं तो जेव्हां हाय कापिता काय. २७

---

## ७ भरतभाव.

दशरथानें रामास युवराज करण्याचा बेत केला. तेव्हां रामाची

सावत्र आई कैकेयी हिनें राम दूर जावा व आपला मुलगा भरत यास राज्य मिळावें म्हणून, तिला दशरथानें मागें कबूल केलेला वर मागितला, कीं रामानें चौदा वर्षे वनास जावें व भरतानें युवराज व्हावें. तेव्हां दशरथास फार वाईट वाटून तो शोकानें विव्हळ होऊन पडला. राम पितृवचन खरें करण्याकरितां सीता व लक्ष्मण यांसह वनास गेला. इकडे दशरथ शोकानें मरण पावला. इतक्या गोष्टी होत तों भरत घरीं नव्हता. तो आला तेव्हां त्यास हें मुळींच आवडलें नाहीं; म्हणून तो रामास परत नेण्यासाठीं आपल्या आया, वसिष्ठगुरु व पुष्कळ प्रजाजन यांसह अरण्यांत रामाकडे आला. त्या वेळची ही कथा आहे.

## श्लोक

वाम-अंकगत भूमि-कुमारी । वामबाहु-सुरता सुकुमारी;
वल्कलांबर-जटा-अभिरामा। देखतो भरत त्या अभिरामा १
दूर्वा-दल-श्यामल दीप्ति देहीं। सेवी पदें लक्ष्मण तो विदेही
गंगातटीं सेवित मंदवातें । देखे अशा श्रीरघुपुंगवातें २
देखोनि ऐसें रघुनंदनातें । धांवे त्वरेनें पदवंदनातें;
अलभ्य जो हर्ष सुरादि कांहीं। तो होय,त्यामाजि च शोक कांहीं
रडे फुंदफुंदे, शिरीं पादपद्मा—
धरी, सद्म मानी जया नित्य पद्मा;
बळें क्षेम दे त्यास वोढूनि राम,
स्वभक्तप्रिय स्वामि विश्वाभिराम. ४
मांडियेउपरि बैसविला हो, अश्रुनीर पुसि, दे सुखलाहो;
'वासरा न रड,सांग सुवार्ता;' शब्द हा निववि दुःखदवार्ता ५
तों देखिला गुरु वसिष्ठ, तयास वंदी,
ब्रह्मण्यदेव जडला चरणारविंदीं;
तों माउल्या तिघि हि सत्वर पावल्या हो,
भेटोनियां तिघि हि सत्वर सेविल्या हो, ६
पिता सुखी कीं?' म्हणतांचि, रामा—
रडोनि त्या सांगति मूपरामा;

रडे अहो राम हि लोकरीती,
  स्त्रिया पुन्हा शोक महा करीती ! ७
सपिंडी-क्रिया राम गंगातटाकीं,
  करी आणि ते पिंड गंगेंत टाकी;
रडे लोकदृष्टीस शोकश्रमातें—
  प्रभू दाउनी, ये पुन्हा आश्रमातें. ८
तों वदे भरत गोष्ट मनाची, प्रार्थना बहुत आगमनाची—
मांडिली परि न राघव मानी, देखतां सुरवरांस विमानीं. ९
  ह्मणि फिरे स्वपुरिप्रति राम हा,
    म्हणुनि आधि मनीं अमरां महा;
  भरतशब्द तदर्थ न ये मना,
    पुरविणें प्रभुला सुरकामना. १०
  ' आज्ञा पित्याची मज मोडवे ना,
    वत्सा, तुझी गोष्ट हि तोडवे ना;
  घालूं नको बा मज संकटांत,
    नको पडूं या सहसा हटांत ! ' ११
  अशी आयके जेधवां रामवाणी,
    मुखश्री करी बंधु तो दीनवाणी;
  म्हणे, ' तात आज्ञा, मृगांकानना रे,
    मला सांग, जाईन मी कानना रे ! ' १२
  ' बापा, ऐसें वर्ततां तों विशेषें—
    आज्ञा भंग प्राप्त दोघां अशेषें;
  एवं राज्यातें तुवां रे भजावें,
    ताताज्ञेनें कानना म्यां च जावें. ' १३
  ये ना अंत भरत देखुनि रामराया;
    गंगातटीं रचुनि दर्भ, बसे मराया
  पाहे वसिष्ठमुनि-वक्त्र-सरोरुहातें—
    श्रीराम. आणि खुण दाखवि हो स्वहातें. १४
  ' कीं सांग गुह्य अवतार-चरित्र याला,

जे तारितें चहुंयुगांत जगत्त्रयाला.'
बोले वसिष्ठ मग सन्निध जाउनीयां,
'कां प्राण टाकिसि?' म्हणे समजावुनीयां. १५
'हा राम मारील दशाननासी,
यालागिं जातो प्रभु काननासी;
नको निवारूं भरता, तयाला—
ब्रह्मादिकांच्या पद-दातयाला. १६
येणार मागुति चतुर्दश-वत्सरान्तीं,
राहो वनांत तितुके दिन आणि रातीं;
आत्मा च तो, तुज वियोग तयासि नाहीं,
येऊनियां करिल जे तव कामना ही.' १७
हें आयकोनि जरि शोक हि दूर केला,
प्रत्यक्ष-दर्शन सुखास बहु भुकेला;
तेव्हां उठोनि भरतें पदवंदनातें—
केलें दुरूनि, म्हणतो रघुनंदनातें. १८
देखोनियां गमननिग्रह राघवाचा—
बोले उभा भरत, निश्चयरूप वाचा;—
"वर्षें चतुर्दशवरी च धरीन देहा,
त्यानंतरें त्याजिन यास, निरोप दे हा. १९
वर्षें द्विसप्तभरि काल समाप्त झाला,
त्यानंतरें आजि, तुझ्या चरणांबुजाला—
स्पर्शें शिरें न जरि, देह तया च वारीं
यातें त्यजीन चि, विरिंचि जरी निवारी. २०
वर्षें चतुर्दश हि रक्षिन, शासनातें—
अंगीकरीन, न बसेन नृपासनातें;
सिंहासनावरि तुझ्या पदपादुका मी
पूजीन जो तवपदांबुज-लाभ-कामी." २१
पादुका जडित आणुनि हातें,
रामचंद्रचरणांबुरुहातें-

लावुनी, निजशिरीं भरतानें
वंदिल्या, रघुवरांघ्रि रतानें. २२

वामन.

---

## ८ यमधर्म व सावित्री.

मद्रदेशाचा राजा अश्वपति म्हणून होता, त्याची सावित्री नामक एकुलती एक कन्या होती. तिनें शाल्वदेशाचा राजा द्युमत्सेन याचा पुत्र सत्यवान् याला वरिलें. हा सत्यवान् मोठा गुणी होता, तरी अल्पायुषी होता; व सावित्रीच्या सासऱ्याचें राज्य शत्रूंनीं हरण केल्यामुळें तो अरण्यांत राहात असे; आणि तो अंध, वृद्ध, व अशक्त होता. तरी सावित्रीनें दृढनिश्चयानें सत्यवानालाच वरिलें; व पुढें एक वर्षभर अरण्यामध्यें श्वशुरगृहीं अशा रीतीनें व्रतनेम करून राहिली, कीं त्या पुण्याच्या योगानें तिनें आपल्या पतीचा प्राण यमापासून परत घेतला. पुढील कवितांत अशी कथा आहे कीं, यमधर्म सत्यवानाचा प्राण घेऊन चालला आहे, व सावित्री त्यापासून एकेक वर मागून घेत आहे. अखेरीस तिनें आपल्या पतीचा प्राण मागून घेतला आहे.

### आर्या

**त्यातें बांधुनि घेउनि यमधर्म-प्रभु निघे अवाचीतें**
**भ्याला सतीस, बहुधा जें ब्रह्मलिखित बरें न वाची तें. १**
**त्यामागें ती हि निघे, धर्म म्हणे ' भागलीस, जा परत,**
**स्नेहऋण फेडिलें त्वां, करुनि स्वपतिक्रिया रहा स्मरत.'२**
**साध्वी म्हणे,'प्रभो पति जिकडे,जावी च मूर्ति हे तिकडे;**
**स्वगुरुव्रतप्रसादें मद्गतिस न रोधितील हेति-कडे. ३**
**संत म्हणति, सप्तपदें सहवासें सख्य साधुशीं घडतें;**
**सन्मित्राचि न व्यसनीं अन्याखिलमित्र संकटीं पडतें. ४**
**तुज संत म्हणति पितृपति, समवर्ती, धर्मराज, बापा हें–**
**सत्य यश, म्हणुनि या हि कन्येसि दया करोनि बा पाहें?'५**
**ऐसें सती वदे, तो बोल शशी, देव तो हि सागरसा—**
**प्रेमें उचंबळे हो, धरि कारुण्यें द्रवासि साग रसा. ६**

धर्म म्हणे, 'साध्वी, बहु श्रमलीस, स्वाश्रमासि जा मार्गें.
जो मागशील तो वर देतों, घे इष्ट तें मला मागें.' ७
'देवा, व्हावे चक्षुस्तेजःसंपन्न आश्रमामाजी-
मामाजी ऐसें द्या; मति साहेना चि त्या श्रमां माजी.' ८
'दिधलें!' धर्म म्हणे, परि जात चि होती तशी च मागून;
देव म्हणे पुनरपि, 'जा वत्से, घे वर दुजा हि मागून.' ९
ती सुमति म्हणे, 'राज्यभ्रंशें बहु खिन्न सासुरा होतो,
पावुनि भवत्प्रसादें निजपद, बहुकाळ सासु राहो तो.' १०
'होइल, जा,' धर्म म्हणे, परि करि अनुगमन सबहुमान सती,
कीं जी हंसी, हंसावांचुनि मानील काय मानस ती? ११
धर्म म्हणे, 'गे बाई, करिशी कां व्यर्थ या श्रमांस तिजा-
वर घे नको चि भागों, आलीस सुदूर, आश्रमा सति जा.' १२
त्यासि म्हणे सावित्री 'संपन्न असो पिता सुतनयशतें;'
हा लक्ष्मीसुत कवि किति लिहिल सतीचें उमासुत न यश तें
ऐसें शिरोनि चित्तीं, घेउनि भारी हि तीन वर देवा—
सोडी ना सोडविल्यावांचुनियां ती सती नवरदेवा. १४
देव म्हणे, 'तूं स्वच्छा स्वच्छायाशी च मागुती, सति घे-
वर घेउनि जा चवथा, देतों मागून मागतीस हि घे.' १५
'व्हा सुप्रसन्न,' 'वत्से तुज हो सुतशत,' असें वदा, न्या हो-
सुयशोराशि स्वर्गीं, लज्जाप्रद सुरनगा वदान्या हो.' १६
भुलला धर्म द्युतिला, धृतिला, मतिला, तसा तिच्या स्तुतिला
न करुनि विचार, जावी मागें म्हणवुनि म्हणे 'तथास्तु!' तिला.
हळु च म्हणे सावित्री, 'पावेन वरेंकरून संततिला;
तुमचा प्रसाद, म्हणुनी प्रेमें गातील सर्व संत तिला, १८
तरि मत्पति मज द्या कीं, तुमची पावेल मान सत्या गी;
यश रक्षाया प्राण हि सत्यगुणासक्तमानस त्यागी.' १९
रोमांचित धर्म म्हणे, 'बाई, गातिल तुझा प्रभाव सती,
पतिशीं अविनाभावें वसशिल, रविशीं जशी प्रभा वसती. २०
राज्य चतुःशतवत्सर करिल तुझा कांत, सोडिला, जा गे!

हा त्वन्महिमा जागो, सीतेनें जेविं जोडिला जागे.' २१

---

## ९ भामाप्रकोप.

एकदां नारदानें कृष्णाला पारिजातपुष्प दिलें. त्यानें तें रुक्मिणीस दिलें, यामुळें सत्यभामा रागावली. ही कथा यांत आहे.

### श्लोक

' कृष्णासि कृष्ण-पद-भक्ति-विशारदानें—
जें स्वर्ग-पुष्प दिधलें मुनि-नारदानें,
तें रुक्मिणीप्रति दिलें त्रिजगन्निवासें,
जें द्वारका करि भरोनि सुगंधि वासें.' १
अशी गोष्ट दासीजनीं बायकांनीं—
विचारूनियां सांगतां जाय कानीं;
तई सत्यभामा महाक्रोध दावी,
वुझावी हरी, ते चि लीला वदावी. २
गडबडां धरणीवरि लोळते। वदवती न कवीस हि लोळ ते;
रडत,मूर्छित होय घडीघडी। पवन निश्चळ, नेत्र न ऊघडी.३
रडत रडत मूर्छेमाजि वृत्ती बुडाल्या,
परम विकल, मी-तूं या स्मृतीही उडाल्या;
उचलुनि सखियांहीं मंचकीं दिव्य सेजे—
निजविली, मृततुल्या सत्यभामा दिसे जे. ४
ये अशांत सदनांत हरी तो। जो अनादि भवशोक हरीतो;
किंकरी नमुनियां चरणांतें। सांगती सकळ आचरणातें.५
म्हणे, ' शोक कां प्राप्त झाला महा हा,
अशी कष्टली कां शुभांगी? अहाहा!
न बोले चि कां आमुशीं आज राणी,
जिच्या बोलण्याची च आम्हां शिराणी!' ६
जयीं श्रीवत्सांक प्रभु करि निजांक-स्थित शिरा,
शिरा, नाडी, प्राण प्रकटवि न लावूनि उशिरा;
शिराणी शब्दाची पुरवि, तरि डोळे न उघडी,

घडी जों मानाची बिघडलि असे तोंवरि घडी. ७
बजागी ते जागी स्वमनिं, परि डोळे न उघडी,
घडी एक क्रोधीं मन बुडवि मानें अवघडीं;
घडी पूर्व-प्रेमस्थितिस बसतां तीस विघडी,
घडी स्त्रीजातीची घडविली असे ख्याति सुघडी. ८
वदे भामा, कोपें अतिविकल, चावूनि अधरा,
" धरा-पृष्ठीं नाहीं ठक तुज-असा, अंबुजधरा;
धरावें या अंकीं शिर आजि तिचें पक्षिगमना,
मना आलें देणें कुसुम जिस तें, कंस-दमना ! " ९
जों नख मोडुनि वदे, ढकलूनि मांडी,
भ्रू-मंडळीं भ्रमण, अंगुलिभंग मांडी.
तों कृष्णजी करुनि हास्य म्हणे, " अहाहा !
वेडे, अनर्थ इतुक्यास्तव का महा हा ? १०
अर्पितां मुनिवरें सुमनातें । वाटलें प्रथम हेंचि मनातें—
कीं, 'असा तरु पुरींत असावा।त्यांतही स्वसदनीं च वसावा.'
फूल देउनि तिला उतराई । होइं मी, समज हे चतुराई;
देतसें तरु चि तो तुजला गे । खेद हा न करणें तुज लागे.
तुतें वृक्ष देणें चि, यालागिं आधीं,
फुलें नाशिला जो तिला होय आधी;
न जाणोनि केलें तुवां कष्ट भारी ! "
समाधान ऐसें करी कैटभारी. १३
अशी ते बुझावूनि रंभोरु, हातें—
तिच्या धूतसे हो मुखांभोरुहातें;
उटी लावुनी वांटल्या केशरा जी,
स्वहस्तांबुजीं विंचरी केशराजी. १४
हरिकरिं यमुना हो मूद गंगावनाची;
मिरवि धवलपुष्पीं दीप्ति गंगा-वनाची;
सित असित नद्यांच्या संगमीं श्रीत्रिवेणी,
तशि च यदुपतीनें घातली चित्र वेणी. १५

———

वामन.

## १० भीष्मार्जुन-युद्ध.

पहिल्या भागांतील उतारा चौदावा, यांतील कथा व ही कथा एक त्र आहे. तो उतारा वामनकृत आहे, व हा मोरोपंताचा आहे.

### आर्या

भीष्म ग्रीष्म-तरणिसा, अर्जुन हेमंत-तरणिसा गमला;
देव म्हणे, "बहु आला वृद्धाहुनि जिष्णुचाचि राग मला १
हा शूर 'दूर, ओसर,' म्हणणार महा-प्रभावहा रविला;
हार विलासिजनेंसा येणें कैसा प्रभाव हारविला! २
झाला धीर परि परि-म्लान सखा जाति-पुष्प-गुच्छकसा.
तुच्छ कसा हा प्रवया, चिरडिल भलता अहींद्रपुच्छ कसा? ३
हा पांडवांसि भस्म चि करिल, उपेक्षा करूं नये याची,
पद्रासि अकीर्ति श्रित-सुहृदनवन-पथकरून येयाची!" ४
आणुनि मनीं असें, ज्या धन्य म्हणति सर्व विप्र तो दास-
भीष्म वधाया धांवे हरि, हस्तें कवळुनि प्रतोदास. ५
देव रथातें सोडुनि धांवे देवापगा-विलापार्थ,
कीं दुस्तरारि-सागरिं न बुडो कासेसि लाविला पार्थ! ६
पार्थाप्रति प्रयत्नें तो बल-कारुण्य-सिंधु राखाया,
क्रोधें गर्जत धांवे, सिंह जसा मत्तसिंधुरा खाया. ७
"एह्येहि देवदेव! श्रीकृष्ण! नमोस्तु ते!" असें बोले;
ओले गल्ल प्राज्य-प्रेमाश्रुभरें करूनियां डोले. ८
भीष्म म्हणे, "त्वद्धस्तें व्हाया समरांत शांत नवसा जो-
होता करीत, तो हा जेंवि हरिहतेभ शांतनव साजो! ९
जरि मारशील, मज गतिलाभ, तुज हि कीर्ति-लाभ गुरु-तर तो
विश्वगुरो! प्राकृत ही तारुनि शरणागतासि गुरु तरतो. १०
तूं हरिसा हरि, साची हरिणी सुरसिंधु मी हि पाडस-सा;
पाड, ससाध्वस हो अरि, हरिचा पावेल काय पाड ससा? ११
ब्रह्मांड भस्म व्हावें ज्याच्या दर-रक्त-चक्षुच्या पातें,
तो तूं आंगें मारूं पाहसि मज, दावुनि प्रतापातें! १२
झालों धन्य त्रिजगीं! भास पळ प्राकृतांस मारकसा;

त्या प्रभुनें तो केला भस्म स्वातिक्रमेच्छु मार कसा ?' १३
धांवुनि धरी धनंजय मागुनि त्या माधवासि बाहूंनीं,
मग दृढ चरणीं च मिठी घाली, पहिली च रीति पाहूनी. १४
दूर उसळला होता कोपावेशें मुकुंद कंदुकसा;
राहे उभा प्रभु, गमे इभसा; धृतचरण-भक्त अंदुकसा. १५
पार्थ म्हणे, "अधर्मा वरि धरितिल जे असिप्रति ज्ञाती—
मरतील; त्यजसी कां 'आयुध न धरिन,' असि प्रतिज्ञा ती?
मारिन भीष्मातें मी, इतरांतें ही, भवद्दयाधारें;
बा ! त्वत्प्रसाद ज्यावरि, केवळ मेवेग्र ही तया धारें ! १७
लोक तुज मृषावादी ऐसें न म्हणोत, सत्य-संध-पते !
मरतिल तव-दृक्पातें भीष्मद्रोणादि सर्व अंधप ते." १८
कुरु-कुंजरासि गेला होता यदु सिंह तो खरा खाया,
परते पर तेथूनि, प्राण-प्रिय-मित्र-तोख राखाया. १९

मोरोपंत.

---

## ११ गुराख्याचें गाणें.

चैन, विनाकारण नाजूकपणा व कृत्रिमता यांनीं परावलंबी बनलेल्या श्रीमंती आयुष्यापेक्षां अत्यंत साधी अशी रानावनांतील गुराख्याची राहणी किती चांगली, हें कवी या कवितेंत दर्शवीत आहे.

( चाल—भला जन्म हा० )

कुरणावरतीं वडाखालतीं गाई वळत बैसतों-
मजेनें गाई वळत बैसतों ।
स्फटिकापरि निर्मळ हा खळखळ झरा जवळ वाहतो ॥धृ०॥
पांवा फुंकुनि मंजुळ नादें रान भरुनि टाकितों—
हिरवें रान भरुनि टाकितों !
आनंदानें डोळे भरतां प्रभुजीला प्रार्थितों !
गाई-मागें रानोमाळीं शीळ भरत हिंडतों—
कधिं कधीं शीळ भरत हिंडतों —
दऱ्याखोऱ्या-राई-ओहळावरी मौज मारितों !

उन्हाची भीती कवणाला ?
पाउस काय करिल तो मजला ?
भीतों कोठें मी थंडीला ?
श्रीमंतापरि गरिबा कोठें वारा तो दुखवितो ?--
गरिबा वारा नच दुखवितो !
देवाजीवरि सदा हवाला टाकुनि मी राहतों ! १
तृषा लागतां नीर झऱ्याचें ओंजळिनें मी पितों —
निर्मळ, ओंजळिनें मी पितों !
क्षुधा लागतां कांदा-भाकर यथेच्छ मी जेवितों !
फिरतां फिरतां करवंदें हीं तोडुनि मी भक्षितों-
रानीं तोडुनि मी भक्षितों !
काठीनें मी कांटे दाबुनी बोरें हीं तोडितों
धनिका ताट रुप्याचें जरी
पांचही पक्वान्नें त्यावरी
नाहीं गोडि सुखाला परी !
गाई-संगें हिंडुनि रानीं थकुनि सुखें जेवितों-
जाडेंभरडें खाउनि धनिकाहूनि अधिक तोषतों ! २
पुच्छ उभारुनि थवा गाईचा ज्या वेळीं नाचतो—
मजेनें ज्या वेळीं नाचतो,
मोर-मुकुट बन्सीवाल्यापरि मौज उभा पाहतों !
ओहळावरतीं थवा तयांचा पाणी जेव्हां पितो-
निर्मळ पाणी जेव्हां पितो
उभा राहुनी प्रेमें त्यांना शीळ अहा घालितों !
कशाला मंदिल मज भरजरी ?
घोंगडी अवडे काळी शिरीं !
दंड करिं गाइ राखण्या परी !
कुवासना घालिति धिंगा तो महाल मी टाकितों-
नृपाचा महाल मी टाकितों !
गाईसंगें हवेंत ताज्या नित्य चि मी राहतों । ३

क्रोध, काम, मद, मत्सर यांहीं गांव सदा गर्जतो—
        भांडणें गांव सदा गर्जतो !
दूर टाकुनी त्यास शांतिनें सुखें दिवस लोटितों !
समाधान हा परिस अहा मज रानांत चि लाभतो-
        अहा मज रानांत चि लाभतो
दुःखाच्या लोहास लावितां सुख-सोनें बनवितो !
        चढल्या पडावयाची भिती
        गरिबा अहंकृति काय ती ?
        काय करि त्याचें खोटी स्तुती ?
परवशतेच्या बिड्या रुप्याच्या पायांत न बांधितों-
        मृदुळ तरि पायांत न घालितों
निज हृदयाचा धनी धरणिचें धनित्व अवमानितों ! ४

भास्कर रामचंद्र तांबे.

## १२ धर्म युद्धांतून पळत आहे, व कर्ण त्याचा उपहास करितो.

### आर्या.

हांसत हांसत तो वृष बोले, "जन्मोनि शुद्ध संतांनीं,
कोण पळेल क्षत्रिय-धर्मीं शिक्षित असोनि संतांनीं ? १
कां पळशी मरण-भयें, होतां हांसें कशास वांचावें ?
सांचावें लज्जेचें ओझें माथां सदैव कांचावें. २
युद्धीं परमार्थ मिळे, निश्चित मिळणें पलायनें तोटा,
हें जाणोनि पळे तो मातेच्या रोग पातला पोटा. ३
न क्षत्र-धर्म-कुशल, ब्राह्मण धर्म-प्रवीण तूं सौम्य !
वाटे पढवी उचित स्वाध्याय-मखक्रिया च तो धौम्य. ४
कुंतीसुता, इतःपर युद्ध करायासि गांठि वीरांशीं—
घालूं नको नकोची, स्पर्धा हि करूं नको च धीरांशीं ! ५
आम्हां वीरांप्रति तूं यावरि अप्रिय वदों नको लेश,
वनकोल-यूथ-नाथें जिंकावा केविं यक्षकोलेश ? ६

जा, गा महानगुणा, दिधलें तुज जीवदान, जा जा गा;
जागा दाटुनि केल्या हरि वांचाया नसे गजा जागा." ७

मोरोपंत.

---

## १३ हिरण्यकशिपु—वध.

हिरण्यकशिपु नामक दैत्य होता. यास ब्रह्मदेवाचा असा वर होता कीं, त्याला मनुष्याकडून, किंवा इतर कोणत्या ही प्राण्याकडून मृत्यु येणार नाहीं; शस्त्रानें मृत्यु येणार नाहीं; अथवा भूमीवर, आकाशांत, दिवसा, रात्रीं, घरांत, बाहेर, कोठें च मृत्यु नाहीं. असा वर असल्या-मुळें विष्णूनें अर्धा मनुष्य, अर्धा सिंह असें रूप धारण करून संध्येच्या वेळीं, नखांनीं घराचे उंबऱ्यावर बसून त्यास मारिलें. या विष्णूच्या रूपास नरसिंह-अवतार असें म्हणतात. या हिरण्यकशिपूचा मुलगा प्रल्हाद हा मोठा विष्णुभक्त होता.

### श्लोक

पसरट मुख मोठें, आंत दाढा कराळा,
परम चपळ जिव्हा, खड्ग जैसा निराळा;
नयन-युगुळ जाणों तापलें हेम-पाणी,
बहु-भुज नख-शस्त्रें, देखिला चक्र-पाणी. १
सिंहावरी त्या मग दैत्य-हस्ती,
धांवे गदा घेउनि थोर हस्तीं;
पतंग अग्नीवरी जेंवि जातो,
हाणी गदा थोर अधोक्षजा तो. २
विधिवर-प्रतिपालक जो हरी,
न दिवसांत, निशींत हि, संहरी;
म्हणुनि युद्ध निशा-मुखिं तो करी,
मग वधी बुडतां रवि, लोकरी. ३
अमर तो मरता अतिलोकरी,
चपळ तो पळता धरितां करीं;
उसळला खळ लाघव-लक्षणी,

विलपती लपती सुर त्या क्षणीं. ४
आश्चर्य हें नृहरि मानुनियां महास्यें,
सक्रोध हास्य करि उत्कट अट्टहास्यें;
तों झांकलें नयन, भीति मनीं निघाली,
मांडीवरी हरि अशास धरूनि घाली. ५
न धरणीवरि मृत्यु न वा नभीं;
वर असा म्हणवूनिच तो न भी;
निज-तनूवर त्या खळशेखरा--
चिरि धरूनि, करी वर तो खरा. ६
न गेहीं न बाहेरि, यालागि दारीं,
बसे उंबरा, पोट त्याचें विदारी;
स-जीवें, अ-जीवें मरेना तसाची,
चिरूनी नखें तो करी गोष्टि साची. ७
चुळबुळे, निसटे, करि तांतडी--
असुर; तों हरि काढुनि आंतडीं,
उदर फाडुनि घालितसे गळां,
करि सु-मंगळ देव अ-मंगळा. ८
पदतळें, कितिएक नखें, करें,
तुडविले दनुजेंद्र भयंकरें;
असुरनाथ-नृपासन, त्यावरी
हरि बसे, परि कोप न सांवरी. ९
स्तविति देव, ' अजी कनकांबरा,
असुर मारियला,' म्हणती ' बरा ! '
परि न आंवरि कोप रमापती,
सभय लोक चतुर्दश कांपती ! १०
मग प्रल्हादातें म्हणति अवघे, ' भक्त-परमा ! '
रमा, ब्रह्मा, खिन्न स्वकृत-विभु-कोपाभ्युपरमा;--
' रमाकांता ये ना तुजविण कृपा-दैत्य-दमना,
मनाच्या विश्रामा त्वरित करिं गा कोप-शमना.' ११

ज्याला भिती देव, विरंचि, पद्मा,
प्रल्हाद त्याच्या धरि पाद-पद्मा;
आणी जया वंदिति सर्व भूतें,
करी तया दंडवत प्रभूतें. १२
बाळकें स्वचरणांबुरुहातें—
वंदितां, प्रभु जगद्गुरु हातें-
उचलुनी, अवलोकुनि, ठेवी;
मस्तकीं अभय-हस्तक ठेवी. १३
करस्पर्शें झालें परम-सुख त्या दैत्य तनया,
न या संसाराचें स्मरण उरलें त्या सुविनया,
नद्या नेत्रीं दोहीं स्रवति, न निघे शब्द सगळा
गळा दाटे प्रेमें, त्वरित हरि घे मोहुनि गळां ! १४

वामन.

---

## १४ श्रीकृष्णाचा धृतराष्ट्रास उपदेश.

कौरवपांडवांचा सल्ला व्हावा म्हणून कृष्ण कौरवांकडे वकिली करण्याकरितां गेला. त्या वेळीं त्यानें कौरवांस अनेक तऱ्हेनें बोध करून शेवटीं धृतराष्ट्रास हा पुढील उपदेश केला.

### आर्या

देव म्हणे " धृतराष्ट्रा, राया, मोठी जगीं तुझी पदवी,
पद विद्यांचें तूं, परि परिस, मज बळेंचि आप्तता वदवी.१
जें मेळविलें चंदन-सम झिजवुनि परसुखार्थ आंगातें,
केवळ कृपाळु-पूर्वज-सद्यश मळविशि वळेंचि कां गा,तें?२
दुःख परासि न द्यावें सत्य वदावें, क्षमा न सोडावी,
जोडावी कीर्ति, अशी कुलरीति तुम्हीं कधीं न मोडावी.३
केले गुप्त-प्रकट व्यवहार अनर्थ-हेतु तनयानें ?
ते कां न वारिले त्वां ? कैसें होईल कुशल अनयानें ? ४
मुख्य-स्वबंधु पांडव, तन्नाशातेंचि हे अकवि टपती,
विश्वस्तां मीनांतें [ खायाला बक जसे सदा जपती ] ५

त्वन्नंदन-दुर्मति हे क्षिति बुडवायासि, तापदा आली--
काळाच्या क्रोडेंत्री तुझिया व्यसनांत आपदा आली. ६
या व्यसनातें चिंतुनि, मन कुदशेला भिऊनि हळहळतें,
शमवावें त्वां, प्रभुनें जेविं शमविलें पिऊनि हळहळ तें. ७
स्वसुतांसि शमीव, नृपा स्वसख्यासह शमविजेल
भीमहि म्यां,
पुत्रा अजातरिपुच्या, तूं साक्षाद्गुरु हि, तरि
हि भी माहिम्या. ८
तूं प्रभु, सुयोधनादिक हे पुत्र तुझ्या करीं असावे च.
अभ्यरणीं प्राणांचा योग्य, परि न योग्य हा असा वेंच. ९
वाढिव धर्म प्रेमें, वाढवि मज जेविं नंद नवनीतें,
सत्पुत्रांनीं भवनीं, सुरतरुनीं न सुख नंदनवनीं तें. १०
पांडव सहाय असतां तुज होतिल सर्व लोक वश्य, पहा;
त्वद्भाग्योत्कर्षातें श्रवण करुनियां म्हणेल कश्यप, हा! ११
म्हणतो युधिष्ठिर, ' नको पायें लोटूं मला अवननातें; '
वचनकराऽपत्याचें न करावें काय हो अवन तातें ? १२
कामिले तसे चि कथिले होते त्वां त्यांसि अब्द तेरा जे,
धन्य म्हणत होते जे लावितिल तुला चि शब्द ते राजे. १३
बहु सत्य, बहु प्रिय, बहु हित, बहु मत,
बहु दुराप, बहु रुचिर;
शुचि, रम्य, क्षीराधिजानन-चंद्र-चकोर
बोलिला सुचिर. १४

मोरोपंत.

---

## १५ केरोपंत नाना.

केरोपंत नाना वारल्यावर ही कविता दोनचार ठिकाणीं प्रसिद्ध झाली होती, व ५।६ वर्षेपर्यंत ती विद्यार्थि-वर्गाचे तोंडीं होती. यांतील केरोपंतनानांचें वर्णन, त्यांजविषयीं इतर लोकांचा असलेला आदर व विद्यार्थि-वर्गाचा भक्तिभाव चांगले प्रकारें व्यक्त करीत आहे.

(चाल–' कांते फार तुला मजलागीं० ')

केला काय अम्हीं दीनांनीं दोष तुझा देवा ।
तो तूं आमुचा नानागुणगणमंडित
नाना ओढुनि न्यावा ॥ ध्रु० ॥
लवहि नसे अभिमान जयाला ।
विद्याधनदानीं जो रमला ।
छत्र अनाथां, मित्रां प्राणचि ।
गुणि लोकांचा पूर्ण विसांवा ॥ १
कोण असा गुरु हो शिष्यांसी ।
कोण धुरंधर मान्य जनांसी ।
बाळां संगें बाळचि केवळ ।
थोरांमाजी थोर दिसावा । २
सत्या वाणि सदा शुचि मानस ।
शोधकर्तासि नसे सरि ज्याच्या ।
आर्यांबेच्या पोटीं दीपक ।
गोविंदानें कुठवरि गावा ? ३

गो. वा. कानिटकर.

---

## १६ कर्णाप्रत श्रीकृष्णाचें भाषण.

कर्णाचें व अर्जुनाचें युद्ध चाललें असतां, कर्णास शाप होता त्याप्रमाणें त्याच्या रथाचें चाक भूमीनें गिळिलें व त्यास शस्त्रास्त्रें आठवतनाशीं झालीं. मग तो रथाखालीं उतरून पृथ्वीनें गिळलेलें चाक उपटीत असतां अर्जुन त्यावर बाण सोडूं लागला. तेव्हां कर्ण कृष्णार्जुनांस म्हणतो, मी विरथ असतां तुम्ही माझ्यावर शस्त्रवृष्टि करितां हें योग्य नाहीं. हें धर्मयुद्ध नव्हे. यावर कृष्ण त्यास पुढील उत्तर देतो: –

### आर्या

**कृष्ण म्हणे, 'राधेया, भला बरा स्मरासि आजि धर्मातें;**

नीच व्यसनीं बुडतां निंदिति देवासि, न स्वकर्मातें ! १
जेव्हां तूं, दुर्योधन, दुःशासन, शकुनि एकमति झालां,
कैसें कपटद्यूतीं चित्तीं हि न धर्म लंघितां भ्यालां ? २
जेव्हां सभेसि नेली पांचाली, मानिलें मनीं शर्म,
तेव्हां गेला होता कोठें राधासुता तुझा धर्म ? ३
राज्य न देशी, करवुनि वनवासाज्ञातवास ही जेव्हां;
गेला होता कोठें धर्म तुझा सूतनंदना, तेव्हां ? ४
चारुनि विषान्न भीमा सर्प डसविले नृपें असें खोटें-
कर्म करवितां कर्णा, होता तव धर्म तेधवां कोठें ? ५
फेडी वस्त्र सतीचें जेव्हां उघडें करावया आंग,
गेला होता कोठें धर्म तुझा तेधवां ? वृषा सांग. ६
खर-दुर्वाक्य-शर-शतें भेदित होतासि जेधवां मर्म,
तेव्हां गेला होता कोठें राधासुता तुझा धर्म ? ७
अभिमन्यु-बाळ बहुतीं वधितां त्वां वारिलें न तें कर्म,
तेव्हां गेला होता कोठें राधासुता तुझा धर्म ? ८
पूर्वीं धर्म न रुचला, त्यजिला निपटूनि तो जसा कुचला,
आतांचि बरा सुचला ! धर्मगृहा सर्व व्हा परासु चला! ९
मागेंच तुम्ही भजतां धर्माला तरि तुम्हांस वांचविता;
आतां मरा; न वांचे दीप्तगृहीं, जो न तोय सांचविता !१०
रक्षावा धर्म असा करिशी उपदेश, तरि असे मान्य;
रक्षितसों धर्मातें, आम्हांला धर्म ठाउका नान्य ! ११
हा धर्म मूर्तधर्म प्रभु, यातें भजतसों; असा मान्य-
लोकांत कोण दुसरा ? सामान्य नव्हे चि हा, असामान्य!'

मोरोपंत.

---

## १७ मार्कंडेयाख्यान.

### श्लोक

पूर्वीं एक मृकंडु नामक मुनी सत्कर्म-धर्मार्थिला,
कांतेनें प्रियकांत तो प्रियपणें पुत्रार्थ जो प्रार्थिला;-

' संतानाविण हें जिणें जड जगीं, संसार निःसारसा–
भासे, यास्तव हो स्तवा पशुपती, मागा कुळोद्धारसा.' १

जाणोन हृद्गत तिचें मुनिराज-राजें,
हे मी सुखी करिन फार सुतातुरा जे; '
आरंभिलें गिरिदरींत महातपातें,
सोसूनियां कठिण-वात हिमातपातें. २

ध्यानीं बसे मुनि उदार सदाशिवाचे,
पंचाक्षरी-प्रमुख मंत्र जपोनि वाचे;
ऐसें पुरश्चरणसंचित फार झालें,
शेखीं तयासि निजपुण्य फळासि आलें. ३

झाला प्रसन्न मुनिमान्य पिनाकपाणी,
' बा रे अभीष्ट वर माग ! ' म्हणे सुवाणी.
' मी तों विरक्त, विभवादि नको, परंतू–
संतान एक मज दे कुळ-हेतु-तंतू. ' ४

त्यानंतरें शिव सनातन-कर्मसाक्षी,
बोले सखोल, तनुअर्ध जया मृगाक्षी;
' देईन दान परि एक विधान भासे,
तूं एक माग मग, लाग विवेक-कासे. ५

साधू, सुंदर शाहणा सुत, तया सोळाच वर्षें मिती,
जो कां मूढ कुरूप, तो शतवरी वर्षें असे स्वस्थिती;
या दोहींत कसा मनांत रुचला तो त्यां तुतें दीधला. '
झाला थोर तटस्थ ऐकुनि मुनी दोहींकडे वेधला ! ६

मग म्हणे मुनिराज,कृपानिधी।घरिं विचारुन येइन आवधी;
निजवधूसि कसा सुत मानला।पुसुन येइन,सांब-शिवा,भला

त्वरितगति निघाला, शीघ्र सद्मासि आला,
प्रियवधुसि वराला सांगता सांग झाला;
मग सति पद माथां वंदुनी प्राणनाथा,
कथि न सुरस गाथा, सर्व संसारचाथा. ८

सारासार विचार-पंडित, महाचातुर्य-चिंतामणी,

विद्या-वेद-विनोद-वाद-बुधता, वेदांत-बोधाग्रणी,
रूपें सुंदर, देह दिव्य धरिला थोड्या वयाचा जरी,
वंशोत्तंस, अभंग, मंगळनिधी, कल्याणकारी तरी. ९

धीमंत तो करि सुकर्म निजस्वभावें;
कर्मीं स्वधर्म उजळेल गुण-स्वभावें;
धर्मीं च मर्म समजेल, तदा भवारी,
तुष्टेल इष्ट सदाशिव; कष्ट वारी.' १०

आकर्णोनि सुपर्णसा पुनरपी पूर्वस्थळा पातला,
साष्टांगें प्रणिपात त्या मुनिवरें पादांबुजीं घातला;
'दे देवा, मज पुत्र सुंदर, भला, ज्ञाता, सुहृत्तापहा!'
गौरीनाथ 'तथास्तु' बोलुनि निजस्थानासि गेला पहा! ११

आश्रमीं मग मुनि प्रमदेशीं । नांदतां गिरिगुहान्तर-देशीं;
गर्भचिन्ह धरिलें,पति पाहातो म्हणे मुनि,'महेश-कृपा हे.' १२

'मार्कंडेय' अशी मृकंडुमुनिनें नामाभिधा ठेविली;
वाटे बालक बोबडें जंव वदे, ते वाक्सुधा सेविली;
झाले वत्सर पांच, योग्य म्हणुनी केला द्विजाता भला,
झाला धर्म-निधान तो, गुरुकुळीं विद्या भली लाधला. १३

तर्कव्याकरणादि-नाटक-कलालंकारशास्त्रांतरीं—
ज्याचा खेळ, अशी विशाळ झळके प्रज्ञा-प्रभा अंतरीं;
लीलाप्राय समस्त प्राकृत-कथा-वेदांत-सिद्धांत ते,
हातीं आमलका समान डुलती, सांगों किती काय तें,

वर्षावरी स्वसुख वर्षत वर्ष जातां,
चिंता तशी तशि उठे बहुहर्षजाता;
माता पिता उभयतां भय-ताप-संगें,
संतप्त गुप्त रुदती बहुता-प्रसंगें. १५

'हा संकटा! कटकटा! विकटा! कपाळा!
कां दीधला सुत मला, सुरलोकपाळा!
होतों सुखी न गणतां चि अशा भयातें;
दैवा! फुटे हृदय, आठवितां वयातें!' १६

मार्कंडेयाकारणें मांय-बापें। झालीं दीनें, शोषलीं शोकतापें;
'वर्षें गेलीं पंधरा आजि याला। एका वर्षें केविं देखों तयाला!

धरिल धाक मनीं वदतां तया।
बहुत मानिल हा रुदतां भया;
म्हणुनि ना रुदती, वदती भिती।
उभयतां सहज-स्थिति दाविती. १८

परंतु तें दुःख मनीं न झांके। सर्वेंद्रियां शोक-समुद्र फांके;
येती बळें लोचनिं बाष्पधारा। या इंगितें जाणविलें कुमारा.
जोडुनि हात वदे मृदु मात, 'कशास मनांत विखेद करां?
काय उणें पडलें मजपासुनि?' पाय नमी विनवी पितरां;
कंठ सगद्गद बोलति ते 'शितिकंठ-वरें दिधलासि बरा,
संकट घालुनि शंकर दे वर, शंकितसों सकळंक वरा.'२०
रुदित होति त्याप्रति निरोपितां। वदति यापरी माउली, पिता;
शिवशिवा! असा खेद कासया। करितसां तुम्ही? नाहिं नाश या
शिव दयाळु जो दे सुसंतती। भजति, त्यांचिया रक्षितो तती.
आजि तया उणीं काय संपदा। विनटतां पदां वारि आपदा.'२२

पूजानुरक्त, बहुभक्त, विरक्त झाला,
चित्तीं जपे सतत सांब-पदांबुजाला;
'मृत्युंजयाविण जगीं भय कोण नाशी?'
निर्धार हा समजुनी नियमी मनाशी. २३
जपत जपत, ऐसा तो करी तीर्थयात्रा,
धवल शुभ विभूती लावुनी सर्व गात्रा;
स्फटिक-मणि-गणाच्या रम्य रुद्राक्षमाळा,
करिं, शिरिं, निजकंठीं, नित्य घाली सुढाळा. २४

हृत्पद्मीं शिवपादपद्म धरुनी पद्मासनीं बैसला,
जैसा पद्मज पद्मपाणि-युगलीं प्रार्थी, तसा भासला;
त्या काळीं विकराळ सेवक यथाकाळीं मुनींद्रावरी—
काळें पाठविले बळें क्षितिवरी, त्या कोण वा आंवरी? २५
आले गर्जत खड्ग-खेटक-गदा-पाणी, दणाणी धरा!

हातीं झेलित वागुरा निगदती 'ओढा, विदारा, धरा !'
धांवा घेत उफाळती द्विजवरातें लक्षिती लोचनीं,
तों ध्याले शिवमूर्ति देखुनि दिठीं ध्यानीं जनीं मोहिनी !२६

भ्याले असें समजुनी शिवपूजनातें,
लेखी च ना मुनि मनांत रिपू-यमातें !
वाचेसि नाम जपतां शिवशंकराचें,
सामर्थ्य लेश न चले यम-किंकराचें !

क्रोधें काळ उफाळला, भुजबळें जाळें झुगारी गळां,
तों झांकोनि दिठी, शिवाप्रति मिठी मारी मुनी आगळा;
लिंगा ही समवेत पाश पडतां हांकारिलें ब्राह्मणें,
'शंभो, शंकर, धूर्जटे, पुरहरा ! आतां उपेक्षीं' म्हणे. २८

निरखुनि यम डोळां मारिली लात देवें,
क्षण न लगत भूमीं पाडिला वामदेवें;
सुरवर सुमनांचे वर्षती भार भारी;
मुनि नमुनि उभा तो धीट जैसा इभारी. २९

मृकंडूच्या बाळा धरि हृदयिं काळांतक करें;
म्हणे, 'बा रे वत्सा, भजन-जळ मत्स्या न विसरें;
जनांमध्यें कांहीं भय लव कदा ही तुज नसो,
चिरंजीवी होईं, हृदयिं विष-बाधा तुज नसो !' ३०

आनंदतनय.

---

## १८ किरात-अर्जुनयुद्ध.

शंकरापासून पाशुपतास्त्र मिळावें म्हणून अर्जुन तपश्चर्या करीत होता. त्याची परीक्षा पाहावी म्हणून शंकर किरातरूपानें अरण्यांत आले. त्या वेळची ही कथा आहे.

### आर्या

जिष्णूव्रतपें भ्याले सर्व तपःश्रीविलास-सदन मुनी,
कैलासाप्रति जाउनि कथिती श्रीशंकरासि पद नमुनी. १
भगवान् म्हणे, न भ्यावें त्याचा संकल्प शुद्ध मी जाणें,

स्वस्थ-मनें स्वस्थाना-प्रति टाकुनि भीतिला तुम्ही जाणें.' २
मुनि जातां चि किरातत्वाच्छादन मूर्ति सम्पदेवरि घे;
जेथें पार्थ तप करी त्याचि वनीं साऽनुकम्प देव रिघे. ३
आला किरातरूपी शिव जिष्णुसमीप, तों चि हननाश—
दानव वराहरूपी मूक हि, करि जो तपस्वि-जन-नाश. ४
दुष्टासि एकदां चि प्रेक्षिति ते वीर पार्थ-भव दोघे,
म्हणती; 'शर-प्रहारा, तापस-जन हाय हाय न वदो, घे.' ५
खरतर नर-हर-शर पर-जीवन एकक्षणीं च संहरिती,
सम देव-भक्त ऐसें जाणों कळवावया असें करिती. ६
अर्जुन म्हणे ' किराता, त्वां मृगया-धर्म लंघिला दर्पें,
स्वांतार्थ मजपुढें अघ केलें, खग-पति पुढें जसें सर्पें. ७
हा प्रथम मत्परिग्रह असतां त्वां ताडिलें कसें किरितें ?
पाथरवटें स्वटंकें भेदावें वज्र-पाणिसह गिरितें ? ' ८
त्यासि किरात म्हणे,'रे मद्धन हें, प्रथम म्यां चि हा पिटिला,
म्यां वधिला असतां तूं कोण शरें हाणणार या किटिला?९
खद्योतत्व सम असो, रवि कीं तिमिरासि काजवा खाणी?
नवल, रविपुढें कीट स्वकृत तमोनाश-काज वाखाणी! १०
मिरविसि सुज्ञत्व वृथा अन्याला स्वकृत ताप लावूनी,
काय न दगड तपस्वी ? भिजला वृष्टींत, तापला ऊनीं!११
जोडुनि पुण्य-वनीं तप, बुडसी त्याच्या भरेंचि गर्व तमीं,
तूं मजपुढें किती रे ? कोण हरिपुढें म्हणेल पर्वत मी ? १२
हो सिद्ध जरि असेल स्व-तपोबल-गर्व सज्ज चाप करीं,
होशील विमद, पडला गरुडाच्या जेंवि मत्त साप करीं.'
तें वाक्य अर्जुनाला, गरळ जसें यामुनाऱ्हदा, कढवी,
पढवी जो चापश्रुति रामासि, तयावरी स्वधनु चढवी १४
शर ते जाणों वाहे एक निमेषांत एक लाखोली,
प्रभुची जाणेल कसा बाहुबळें तो चि एकला खोली ? १५
स्वरवें गिळों न देते कवल हि सिंहा विदारितेभा, ते—
सरले शर, दोन्हीही झाले सहसा तदा रिते भाते ! १६

भ्याला, परि धैर्य धरुनि ताडी त्या ईश्वरासि कोदण्डें,
देता विश्वकवाळित्या उग्रा काळासि कम्प जो दण्डें. १७
जें युद्धांत म्हणे, 'हा भास्करजो, न करजाल विकिरा, तें-
गांडीव धनु हि हरिलें कामाधारि-मद-तमो-रवि किरातें. १८
ज्याचा पाद म्हणे, ' रे भक्तभवा स्वकुदशा न कर, वाळ,
त्यावरि धनंजयाचा भंग, पावे यशा न करवाळ. १९
प्रभुला जिंकूं पाहे भुजयुद्धीं, जोंव काजवा सवित्या,
परि तोषवी स्वधर्म आराधुनि भक्त राज वासवि त्या. २०
'मृत्युभयासि नराया न जडसुधेचें धरा चिबुक,' लीला-
ज्याच्या असें सुरास हि म्हणती, तो प्रभु वरा चि बुकलीला
शोणित वमला, श्रमला. भ्रमला गमला नुठेलसा पडतां,
परि उठला, मोह कसा राहेल दयाकटाक्ष सांपडतां? २२
न पहाते झाले हो पूर्वीं कौतुक कदापि नाकी, तें;
विजयार्थ शरण गेला नर नत-कामद-पदा पिनाकीतें. २३
वाहे पार्थिवलिंगीं भावें जें माल्य तो प्रतापार्थ,
पाहे तें चि पुरस्थ स्व-मदघ्न किरात-मस्तकीं पार्थ. २४
पाय धरुनि पार्थ म्हणे, 'ब्रह्मांडीं अघ न माय, बा पाहें,
तूं चि हरीं पंक, हरिल अमृताचा न घन मायबापा, हें! २५
प्रभुजी, क्षमा करा जी. मागतसें पसरुनि स्वपदरा मी,
या दासीं हि करो हें पदयुग, जैसें करी स्वपद रामीं.' २६
नमुनि 'क्षमस्व,' म्हणतां प्रकट करुनि रूप, बाहुनीं कवळी,
अधराप्रति स्मितानें, स्वयशानें त्रिभुवनासही धवळी. २७
' सर्वत्र रणीं विजयी तूं नारायणसखा नरा, हो रे!
स्वप्नीं हि अशत्य तुझिया अवलंबुनि, पदनखा न राहो रे.' २८

मोरोपंत.

## १९ रुक्मिणीविवाह–कथा.

पांडवस्त्रिया व श्रीकृष्णस्त्रिया एकमेकांस आपापल्या लग्नाच्या कथा सांगत आहेत. त्यांत पाहिल्यानें रुक्मिणी आपल्या विवाहाची कथा सांगत आहे:—

### आर्या

प्रथम म्हणे वैदर्भी, " बाई होतें लहान मी कन्या,
धन्या कृष्णकथा मज तेव्हां चि रुचे, न आवडे अन्या. १
ज्या दिवशीं हरिचरित-श्रवण नसे,त्यांत मज दहा दुखणीं!
दुखणी काय, नवखणी माडी नलगे, धरा नखंदु खणीं. २
श्रीकृष्णाला द्यावी, श्रीरामा जानकी तशी, दुहिता–
ऐशी गुरुबुद्धींनीं केली, बाई, विचारणा सुहिता. ३
रुक्मी माझा दादा, जो आम्हां साजणांमधें मोठा,
खोटा नव्हे चि,परि हरिचरितरसीं तो भिजे न मणिमोठा!४
त्या स्वगुरुविचारातें निंदुनियां मोहरागवेद्यातें,
मजला देऊं केलें दादानें हट्ट धरुनि चैद्यातें. ५
केला लग्नाचा हा निश्चय चैद्यास धाडिलें मूळ;
गूळ क्ष्वेड चि वाटे मज, तातविचार होय पांगूळ. ६
एक ब्राह्मण केवळ साधु, दयामूर्ति, तत्पदीं नमन—
केलें, पाय धरुनि म्यां एकांतीं विनाविला सुदीनमनें. ७
कां तो द्रवता माझा असता जरि भाव पाहिला खोटा ?
जेणें अभय वर दिला, त्या गुरुहस्तांत म्यां हि लाखोटा. ८
स्वकरें वसंततिलकावृत्तें पत्रांत सात योजूनी—
लिहिलीं होतीं, तीं हि लिहितां लिहितां क्षणांत योजूनी९
गेला धांवत घेउनि मत्पत्र द्वारकेस साद्विप्र,
त्या प्रणतवत्सलाला आणाया आण घालुनि क्षिप्र. १०
तों आला शाल्व-मगध-पति-सख तो चैद्य, मांडलें लग्न,
झालें पुर तत्बळ-जळ-निर्घोत, आधींत मन्मन हि मग्न. ११
तांताडि बहु दादाची, कैंचा अवकाश, लागली हळद,
खळदर्पघ्न दिसेना, जो नतचातक-दया-सुधा-जळद. १२

चिंताज्वरांत रात्रौ माझा नाहीं च लागला डोळा,
जायासाठीं कंठीं शतवार प्राण जाहले गोळा ! १३
तों चि समूलाधि-ज्वर-हर मात्रा आणुनी उषःकाळीं—
आला द्विज-धन्वंतरि, सदय पिता ही तसा नसे बाळीं १४
आधीं विप्रमुखश्री कळवी येतां चि माधवागमन,
मग मुनि सांगे मज, तों ऊठ म्हणे गुरुपदास लाग, मन.
विप्रें कथिलें मज कीं, 'वत्से, लिहिलेस उत्तम श्लोक,
ज्यांच्या अर्थ-श्रवणें आला धांवोनि उत्तमश्लोक.' १६
अंबेच्या नमनाला न्यावी, जीचा विवाह, नवरी ती,
धरि हरिशंका दादा, देवीयात्रा कुळीं, न नवरीती. १७
मग बाई, दादाचे मागधशाल्वादिकां हि मेल्यांचे—
सैनिक मज रक्षाया आले, धाकें विरोनि गेल्यांचे. १८
पूजुनि पाय विनविली, कन्यांतें प्रसवतात ज्या माता—
त्या लटिक्या, तूं चि खरी; तुज कृष्ण चि योग्य होय जामाता
देवीप्रासादांतुनि निघतां, घ्याया करास आलीला—
आलीला धरुनि करीं दाखविली त्या गर्तांत आ लीला.२०
त्या मेल्यास कशासी पाहूं मी प्रियतमास अवलोकीं,
कीं आला कीं नाहीं, होय तडित्स्फुरण काय तंव लोकीं !
पत्रीं लिहिलें होतें, 'देवीयात्रेंत मज पदें दावा;
दावा बहुतांशीं, हा भाव कळों दुर्जनासि नेदावा.' २२
प्रभुसि पहाया पूर्वींपासुनि मन्नेत्रपद्म बहु लोल,
तो लग्न-समय, तो उपवास हि, लावील कोण सखि बोल ?
माझा मूर्त मनोरथ, तो रथ आला प्रियास घेऊन,
दर्शन नयनें घेती, जैसें शिशिरीं दरिद्र घे ऊन. २४
माळा उंचवितां, प्रिय आपण हि रथावरूनियां लवला,
लव लागेना तों घे अंकीं, करुणासमुद्र कालवला. २५
हरि-नील-निभ-वरांकीं बसलें, न श्री घनीं तशी चपळे;
गेला घेउनि हरि निजभाग सुखें, त्यासि म्हणति नीच पळे २६
हंसें मुक्ता नेली, मग केला कलकलाट काकांनीं,

हाकांनीं नभ भरिलें, जाय सुरांच्या हि नाद हा कानीं. २७
पुष्कळ बळ खळ घेउनि हरिवरि आले नृपाळ ते कुतरे,
उतरे एक हि न कशीं कनकासीं कोटि भांडतां धुतरे. २८
मग आला गे बाई दादा मज सोडवावया कोपें,
तो पेंव वृश्चिकांचें लोकां, परि या खगध्वजा सोपें. २९
स-मनोरथ-रथ-शस्त्र प्रभुनें केला पळांत तो भग्न,
नग्नस्वखड्गहि वधा तों मन्मन होय शोकविनिमग्न. ३०
अभय-प्रद-पदपद्मीं म्यां तेव्हां घातली मिठी घट्ट,
घट्ट क्षणभरि झाल्यें, केली स्वाभाविका त्रपा गट्ट ! ३१
केला न वध, तदधिक श्यालाची दुर्दशा सये केली,
केली हरि जरि करि तरि करिमदशोभा दिगंतरा केली ३२
द्रौपदि, अशी कथा हे लग्नाची, फार मी वदों काय,
पाय प्रभुचे संतत पूजावे, तरि च सफळ हा काय." ३३

मोरोपंत.

## २० सुखाची कल्पना.

या मनुष्यजन्मापेक्षां आपणाला ताऱ्याचा, फुलाचा, झऱ्याचा, झाडाचा, कोकील अगर इतर एकाद्या पक्ष्याचा किंवा भुंग्याचा असा कोणाचा तरी जन्म आला असता तर बरें झालें असतें, असें कल्पून व त्या त्या जीवितांतील विशेष आकर्षक व आनंदकर अशा गोष्टी कोणच्या यांचें वर्णन करून कवयित्री या षड्विकारमय मनुष्य-जन्मांतून आपणास सोडविण्याविषयीं ईश्वरास विनवीत आहे.

चाल—आनंदी आनंद गडे०

जन्म कशाला हो मजला
 ईशें न कळे हा दिधला;
तारा जरि मी नभिं होतें
 जग तेथुनियां तरि बघतें;
चम् चम् करुनी नभःपटीं
 स्थिर मनुजांच्या मनःपटीं
जन्म सुखाचा,-तो गमतीचा,-त्या ताऱ्यांचा,

येता जरि, तें मला किती
   होतें सुख त्या नसे मिती ! १

जन्म सुमांचा जरि येता
   सुख होतें उद्यांनीं फुलतां;
स्थान प्रीतिचें मनुजांच्या
   होतें मग मी सुजनांच्या;
प्रभुचरणांवरि मी जातें
   रमणीकचपाशीं वसतें;
चिन्ह प्रीतिचें -मी गमतीचें,-युवयुवतीचें,
होउनि वसतें या भुवनीं
   मौज सुमांची किती जनीं. २

निर्झर जरि झालें असतें,
   म्हटलीं असतीं मधुगीतें;
धांवत हांसत गाऊनी
   उड्या किती तरि घेऊनी
जन-नयनाला सुखवीतें
   काव्यीं गुंफुनि मी वसतें
झुळु झुळु तो,-वाहत जातो,-जनां सुखवितो
निर्झर जगतीं सुखी असे
   उपमा त्यातें कुठे नसे. ३

तरू जरी झालें असतें
   आश्रय कितिकांना होतें;
छाया श्रांत जनांस तरी
   होती माझी किती बरी;
फळां-फुलांनीं मोद-भरें
   स्वागत त्यांचें करितें रे !
विहंगमांनीं,-आनंदांनीं,-म्हटलीं गाणीं,
तरूवरी त्या बैसुनियां
   सार्थक होतें जगुनीयां. ४

मधुर नाम किति कोकिल तें
 मिळतें तरि सुखी मी होतें;
फुललेल्या अम्रावरतें
 गात पंचमीं मी बसतें;
वसंत-सुख मी होउनियां
 तत्संगानें राहुनीयां
ताना घेतें,-सुंदर गीतें,-किति तरि गातें,
परि आतां तें सौख्य नसे
 हुर-हुर रात्रंदिन भासे. ५
विहंग-जन्मा मी घेतें
 सौख्य किती मज तयिं होतें;
प्रातःसमयीं सूर्याचें
 स्वागत करितें मौजेचें;
वृक्षकोटरीं मी वसतें
 उंच भराऱ्या नभिं घेतें;
बहु उंच मी-जाउनि व्योमीं,-विश्वस्वामी,
कोण असे तो कुठे वसे
 बघण्या जातें मोदरसें! ६
जन्म भ्रमरा! तव नामी
 येता तरि सुखि होतें मी;
कुसुमीं वसतें मौजेनें
 गुङ् गुङ् गातें लीलेनें;
गंधयुक्त तो मकरंद
 सेवुनि गणतें आनंद
त्या उद्यानीं, सुमरसपानीं, गुंग होउनी
बाह्य जगाला विसरुनियां
 सुखि होतें मी याहुनियां! ७
त्रास असे या जगिं भारी,
 सोडुनि जावें गमे दुरी!

क्रोध लोभ हे खरोखर
राज्य करिती निरंतर;
ईर्षा मत्सर ही माज
यांचा डंका जगिं गाजे;
सोड येथुनी, त्वत्पदसेवनिं, सुख मी मानीं,
केशव हरि नारायण रे!
विनती माझी एक त्वरें! ८

वेणुबाई दाणी.

---

## २१ कृष्णानें कौरवांस व पांडवांस दिलेलें साहाय्य.

भारतीय युद्धापूर्वी कृष्ण व यादव यांचें आपणास साह्य मिळावें, म्हणून अर्जुन व दुर्योधन दोघे ही कृष्णाकडे आले. कृष्ण म्हणाले, तुम्ही दोघे ही आप्त, म्हणून तुमच्या युद्धांत मी शस्त्र धरणार नाहीं. तेव्हां तुम्हांला निःशस्त्र असा मी पाहिजे, अथवा यादवसैन्य पाहिजे? दुर्योधनानें यादवसैन्य पत्करिलें. अर्जुनानें एकटा, निःशस्त्र, असा कृष्ण पत्करिला.

### आर्या

**जाय प्रथम कुरुप, तों निजला होता प्रभु स्वपर्यंकीं,**
**ज्यासि स्मरुनि निजावें स्वस्थ, स्थापूनि शीर्ष अर्यंकीं. १**
**प्रभुच्या शिराकडे तो स्वमहत्वास्तव बसे अकावि, मानी,**
**होईल काय हंस ब्रह्मयाच्या बैसला बक विमानीं? २**
**मागुनि गेला अर्जुन, बसला पायांकडे चि पाहत, कीं—**
**या विनतीं श्रीगुरुची बहु, त्या लेश हि नसे कृपा हतकीं. ३**
**कैसा असेल अन्य प्रभुच्या दृष्टीसमोर सामान्य,**
**उठतां चि तीस अर्जुन झाला दृष्टीस मोरसा मान्य. ४**
**पार्थ म्हणे, 'प्रार्थाया आलों, प्रभुजी, तुला साहायास;'**
**कौरव म्हणे, 'बहाया प्रथम चि जो पातला पहा, यास.' ५**
**तुजशीं यांचें माझें सम सख्य जसें तसें च सम नातें;**
**संत म्हणति पूर्वागत-साह्य-शिवपदीं सदा वस मनातें.' ६**

देव म्हणे, ' सत्य चि हें, तरि पार्थ प्रथम पाहिला आहे,
सर्व हि संतन्यायें भेद, न आगमनिं, दर्शनीं पाहे. ७

पूर्वागत तूं जसा, तसा मज पूर्वदृष्ट हा मान्य,
दोघांचें हि करावें म्यां साह्य, प्रिय तुम्ही, न सामान्य. ८

तुजहुनि कनिष्ठ अर्जुन बाळकसा, हें मनीं पहा नातें;
रीति दहांची हे कीं पहिलें समजाविती लहानातें. ९

आहेत एक अर्बुद नारायणनाम गोप मजसम जे,
सर्व हि अनंत-बल ते, समजे न परा, परंतु मज समजे. १०
ते, कीं न्यस्तायुध मी, यांत तुम्हां मान्य काय दोघांस ?'
ऐसें प्रभूत्तम पुसे त्या दैवादैव-संपदोघांस. ११
पार्थ म्हणे, ' गोविंदा, न्यस्तायुध तूं चि पाहिजेस मज; '
मागे सैन्य सुयोधन; वर हि वरावयासि पाहिजे समज! १२
मग साह्यार्थ विनवितां राम म्हणे, ' ऐक, भारता राया,
सिद्ध चि मी स्वजनांतें उतरुनियां आधि-भार ताराया. १३
वदलों विराटनगरीं त्वद्विषयक किमपि जें विहित सुचलें,
परि परिस, त्या हरिस त्या समयीं न सभेंत तें वचन रुचलें.
दुष्कर कृष्णत्याग, स्व-प्राण-त्याग ही न दुष्करसा.
कृष्णाविणें क्षिति मला नलिनी मधुपासि जेविं शुष्करसा. १५
यास्तव सहाय संप्रति हा बल न तुझा, न पांडुतनयांचा.
निश्चल निश्चय जाणा, आजि तुम्हां सर्व आप्त-जन याचा. १६
जा, आहेसि क्षत्रिय, भांड, न अभिमन सांड गा, साच-
स्वर्ग असे, काळमुखीं व्हायाचा काय सांडगासाच.' १७
ऐसें वदोनि रायें आलिंगुनि तो खलेंद्र बोळविला.
रविनें विधुसा, प्रभुनें स्वगृहागत मलिन ही न पोळविला.
अक्षौहिणी कटक, कृतवर्मा दे त्यासि, कीं न येना च-
कुलजा नकार, जैसा मेल्या ही पंगुला न ये नाच. १९
बहु मेळवूनि बल्लव अक्ष पळत जाय, कृष्ण सोडून,
अधन शिशु जसा टाकुनि चिंतामणि, बहु कपर्द जोडून.
चित्तांत म्हणे, 'कैसा केला अरि-मीन-ह्रद अगाध रिता!'

भ्रांत, श्रुत स्मरेना, कीं हा प्रभु जाहला अगा धरिता. २१
कृष्ण म्हणे, 'पार्था, त्वां अर्बुद बल हातिचें दिलें अरिला
जो म्हणतो, 'भांडें ना,शस्त्र धरीं ना,'असा कसा वरिला?
पार्थ म्हणे, 'तूं मुनिनीं चित्तीं षडरिक्षयार्थ धरिलास,
हरिला समस्त ही त्रित-ताप तुवां म्हणुनि म्यां हि वरिलास.
न धरावें शस्त्र अशी प्रभुजी, आहे जरि प्रतिज्ञा, ते—
राहो; त्वत्स्मरणें चि ध्वंसिति कामाद्यरिप्रति ज्ञाते. २४
तूं या धनंजयाचा सारथि, करुणानदा, समीरण हो;
वाढेल तेज माझें प्रचुर, मग करीन दास मी रण हो!'२५
स्वजनामरद्रुम प्रभु हांसोनि म्हणे, 'अवश्य तुजला जो-
अर्थ अपेक्षित तो हो;मातलिसारथि महेंद्र तुज लाजो!'२६

मोरोपंत.

---

## २२ बोधपर अभंग.

### ( १ ) तुकारामाचे:—

कां रे नाठवीसी कृपाळु देवासी,
रक्षितो जगासी एकला चि;
फुटे तरुवर उष्णकाळमासीं,
जीवन तयासी कोण घाली ?
कोणीं केली बाळा दुग्धाची उत्पत्ति?
वाढवी श्रीपति सवें दोन्ही;
तुका म्हणे, त्याचें नांव विश्वंभर,
करा निरंतर ध्यान त्याचें. १
न लगे मायेसी बाळ निरवावें.
आपुल्या स्वभावें वोढे त्यासी;
मज कां लागला करणें विचार,
ज्याचा कारभार त्याचे माथां;
गोड-धड त्यासी ठेवी न मागतां,
समाधान खातां नेदी मना,

खेळतां गुंतलें उमगोनी आणी,
बैसोनियां स्तनीं लावी बळें;
त्याचे दुःखें पीडे आपण, खापरीं-
लाही तळीं वरी होय जैसी,
तुका म्हणे, देह विसरे आपुला,
आघात तो त्याला लागों नेदी. २

नीचपण बरवें देवा । मुंगी साखरेचा रवा,
महापुरें झाडें जाती । तेथें लोहाळे राहती,
येती सिंधूच्या लहरी । नम्र होतां जाती वरी,
तुका म्हणे हें चि फळ । पाय धरिल्या न चले बळ. ३

खरें बोले तरी । फुकासाठीं जोडे हरी,
ऐसे फुकाचे उपाय । सोडुनीयां वायां जाय,
परउपकार । एका वचनाचा फार,
तुका म्हणे मळ । मनें सांडीतां शीतळ. ४

काय वानूं आतां न पुरे हे वाणी,
मस्तक चरणीं ठेवीतसें
थोरीव सांडीली आपुली परीसें,
नेणे शिवों कैसें लोखंडासी;
जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती,
देह कष्टवीती उपकारें;
भूतांची दया हें भांडवल संतां,
आपुल्या ममता नाहीं देहीं;
तुका म्हणे सुख पराचिया सुखें,
अमृत हें मुखें स्रवतसे. ५

मोलें घातलें रडाया । नाहीं असूं आणि माया;
तैसा भक्तिवाद काय । रंग-बेगडीचा न्याय;
वेठी धरिल्या दावी भाव । मांगें पळावया पाव।
काजव्याच्या ज्योती । तुका म्हणे न लगे वाती। ६

दुर्बुद्धी ते मना । कदा नुपजो, नारायणा।

आतां मज ऐसें करीं । तुझे पाय चित्तीं धरीं;
उपजला भावो । तुझ्या कृपे सिद्धी जावो;
तुका म्हणे, आतां । लाभ नाहीं यापरता. ७

साखरेच्या गोण्या बैलाचिये पाठी,
तयासि शेवटीं करबाडें;
मालाचे पैं पेटे वाहताती उंटें,
तयालागीं कांटे भक्षावया;
वाउगा हा धंदा आशा वाढवीती
बांधोनियां घेती यमा-हातीं;
ज्यासी असे लाभ तो ची जाणे गोडी,
येर तीं बापुडीं शिणलीं वायां;
तुका म्हणे शाहाणा होईं रे गव्हारा,
चौऱ्यायशींचा फेरा फिरूं नको. ८

लोह परिसा रूसलें । सोनेपणासीं मूकलें;
येथें कोणाचें काय गेलें । ज्याचें त्यानें अहित केलें;
गंगा आली आळशावरी । आळशी देखुनि पळे दुरी;
गांवाखालील ओहोळ । रागें गंगेसि न मिळे;
तुका म्हणे, होउनि दास । गुरुसि न भजती शिष्य. ९

हेंचि दान देगा देवा । तुझा विसर न व्हावा;
गुण गाईन आवडी । हीच माझी सर्व जोडी;
नलगे मुक्ति, धन-संपदा । संत संग दे गा सदा;
तुका म्हणे, गर्भवासीं । सुखें घालावें आम्हासी. १०

## ( २ ) रामदासाचेः—

बाळक जाणेना मातेसी । तिचें चित्त बाळापाशीं;
तैसा देव हा कृपाळ । करी भक्तांचा सांभाळ;
धेनु वत्साचेनिलागें । धांवे त्याच्या मागें मागें;
पक्षी घेतसे गगन । पिलांपाशीं त्याचें मन;
मत्स्य आठवीतां पाळी । कूर्म दृष्टीनें सांभाळी;
रामी रामदास म्हणे । मायाजाळाचीं हीं लक्षणें; ११

ऐसें कैसें रे सोंवळें । शिवतां होतसे ओंवळें;
स्नान, संध्या, टिळे माळा । पोटिं क्रोधाचा उमाळा;
नित्य दंडीतोसि देह । परि फिटेना संदेह;
बाह्य केली झळफळ । देहबुद्धीचा विटाळ;
दास म्हणे, दृढ भाव । तयावीण सर्व वाव. १२
वाजे पाऊल आपुलें । म्हणे, 'मागें कोण आलें?'
कोण धांवतसे आड । पाहों जातां झालें झाड;
भावीतसे अभ्यंतरीं । कोण चाले बरोबरी,
शब्द-पडसाद ऊठला । म्हणे, 'कोणरे बोलला?'
रामदास सांगे खूण । संशयाचीं हीं लक्षणें. १३
छाया देखून आपुली । शंका अंतरीं वाटली;
ऐसें भ्रमाचें लक्षण । भुले आपणा आपण;
मुखें बोलला उत्तर । तेथें झालें प्रत्युत्तर;
डोळां घालितां आंगोळी । एकाचीं तीं दोन झालीं;
पोटीं आपण कल्पिलें । तेंचि आलेंसें वाटलें;
दास म्हणे, हे उपाधी । शंका धरितां अधिक बाधी. १४

---

## २३ अन्योक्ति.

### गजान्योक्ति.

### श्लोक

न ताप निवला, तृषा न शमली, रजें माखलें-
शरीर, अजुनी नसे कमल एक ही चाखलें.
न सोंड उचलूनियां कमलिनी गजें स्पर्शिली,
हकाक मधुपीं पहा अधिं च काय आरंभिली! १
माझी शक्ति अपूर्व, बाग अवघा म्यां मोडुनी टाकिला,
ऐसें मानुनि हर्ष फार तुजला चित्तीं खरा वाटला;
ग्रीष्मीं तीव्र रवी तपोनि करितां आंगीं तुझ्या काहली,
ती पीडा टळण्यास कोणति तुवां युक्ती गजा योजिली? २

कंठीं मोठा बळकट असे पाश, पायांत बेडी,
बैसोनीयां शिरिं नर तुझ्या अंकुशें गंड फोडी,
जीपेक्षां कीं मरण बरवें भासतें, त्या दशेतें-
पावोनीयां अजुनि हि गजा दाविशी कां मदातें ? २

## हरिणान्योक्ति.

### दिंड्या

मस्त असती जे धनाच्या मदानें—
न दाविशी त्यां तोंड दीनवाणें;
अजवाचीं भाषणें मधुर, खोटीं,
करुनि तोषविशी न त्यां कधीं पोटीं. ४
गर्ववचनें ही परिसशी न त्यांचीं,
धरुनि आशा त्यांचिया प्रसादाची,
घरा त्यांचीया करुनि येरझारा,
न घालविशी तूं स्वीय काळ सारा. ५
भूक लागलिया कोमला तृणातें,
भक्षुनीयां तूं पावसी सुखातें;
स्वस्थ निद्रेसी घेशि झोंप येतां,
चित्तिं नाहीं तव काडिमात्र चिंता; ६
अशी सौख्याची स्थिती प्राप्त व्हाया-
योजियेलें त्वां कोणत्या उपाया ?
काय कोठें त्वां तपश्चरण केलें ?
मृगा ! योगें त्या भाग्य हें उदेलें, ७
नवें कोमळ उगवलें गवत दाट,
स्वच्छ सुंदर वाहतो त्यांत पाट;
अशा पाहुनियां उत्तम स्थलातें-
भूल पडली तैं मृगाच्या मनातें;
व्याध चापीं योजुनी बाण राहे-
आड जाळीच्या, न तो त्यास पाहे ! ८
वनीं हिंडोनी शीण फार झाला,

घाम अंगाला तुझ्या दाट आला;
बैस येउनियां स्वस्थ आश्रमांत,
करीं रोमंथा, नीज वा निवांत. ९
दुष्ट भिल्लांचा इथे वास नाहीं,
मुनी वसले हे शांत, यांस पाहीं !
भूतमात्रीं हे दयेतें करीती,
मृगा, मनिंची वा सोड सर्व भीति ! १०

## वृक्षान्योक्ति.

### आर्या

दाटी वाटसरांची, तीव्र उन्हाळा असा असे फार;
मार्गी एक च तरु हा कितिकांचा ताप तो करिल दूर? ११

### श्लोक

दावाग्नी खवळोनियां तरुवरां जाळावया जैं वळे,
जाती सर्व पळोनि कोकिल, शिखी, रावे, तसे कावळे,
भक्षायास इथे चहोंकडुनियां एकत्र जे जाहले;
येतां संकटकाळ होय जवळी ऐसा न कोणी मिळे ! १२

## चंदनान्योक्ति.

आहे एक सुगंध मात्र जवळी, तो त्यास राखावया
ऐसे घोर भुजंग पाळिशि, जना जे धांवती खावया;
येतीं गोड फळें, फुलें हि बरवीं दैवें तुला चंदना,
त्यांच्या, बा, करिताल काय न कळे संरक्षणा योजना? १३
वनीं विलसती बहु विविध वृक्ष चोहींकडे,
तयांत मम चंदनासम न एक हो सांपडे;
जयास न दिलीं फळें न कुसुमें हि दैवें जरी,
शरीर झिजवूनि जो तरि परोपकारा करी ! १४

## केतकीविषयीं.

दलीं सर्वां कांटे असति, मधुचा लेश हि नसे,
उडोनी नेत्रांतें रज बहुत पीडा करितसे;
तुझ्या पुष्पीं ऐसे अवगुण असोनी, भ्रमर हा—
कसा एक्या गंधें भुलुनि पडला केतकि पहा ! १५

## वटान्योक्ति.

ऐसा थोर खरा नसेच दुसरा त्वत्तुल्य साऱ्या वनीं,
वार्ता आयकिली, तुला कथितसें, कोपा न आणीं मनीं;
कोणी क्षुद्र लता मळ्यांत असते, तुंबी जितें बोलती,
येती थोर फळें जिला बहुत, ती गर्वें तुला हांसती ! १६

## निवडुंगान्योक्ति.

साकी

भुजंग वेष्टिति चंदनतरुतें, कंटक केतकिलाही,
सुगंध अंगीं आहे, म्हणुनी भीति तयांतें कांहीं; १७
रे निवडुंगा, नीचा, इतके धरिशि कशाला कांटे !
रक्षणयोग्य असें तुजपाशीं काय असे तुज वाटे ? १८

## सूर्यान्योक्ति.

श्लोक

होता जोंवरि अंबरीं तपत तो चंडांशु तेजें निजें,
झाला निष्प्रभ तारकाधिपति ही, बोला कशाला दुजें ?
राहूच्या वदनीं अजी गवसतां तो भानु दैवें, अहा,
कैसे क्षुद्र हि काजवे चमकती त्याच्यापुढें, हे पहा ! १९

## चंद्रान्योक्ति.

श्लोक

आकाशांत शशांक पूर्ण उदया आला, तया पाहुनी,
झालें तुष्ट चकोरमंडळ, सुधापाना कराया मनीं;

ताप-क्लेश उणा जनास नुकता होऊं असे लागला,
तों दैवें इतक्यांत मेघ अणुनी कैसा मधें घातला! २०

## हंसान्योक्ति.

### श्लोक

उडत उडत जातां हंस तो मानसींचा,
मरुजनपद मार्गी लागला त्यास साचा;
सरस कमलतंतू राहिले दूर भारी,
श्रम करुनि मिळे ना बापुड्या कूपवारी! २१

पद्यरत्नावलि.



# भाग तिसरा.

## १ हिमालयावर बसून केलेलें ईश्वराचें प्रातःस्तवन.

### श्लोक

बर्फानें असती पहा धवल जीं, मेघांस जीं भेदिती,
आरोहूनि तयां शिरांवरि बसे हा शुक्र शुभ्रद्युती;
वाटे, स्नेह असे, हिमालय! तुझा अत्यंत त्याच्यावरी,
आहे योग्य तुम्हां; समानगुण जे त्यांचीच मैत्री खरी. १
तुझ्या तनुवरी जरी अमित ओघ हे नाचती,
उड्या बहुत मारिती, बहुत खेळती, हांसती,
तरी न सखया तुवां निज उदात्तता टाकिली,
कशी मुनिपरी, अहा! सतत शांतता सेविली! २
तुझ्या प्रतितटीं तरू विविध उंच गेले पहा!
प्रभातसमयीं नसे पवन; शांत अत्यंत हा-
दिसे तरुसमूह कीं जलनिधीपरी केवळ;
समीर नसतां जयामधिं उचंबळे ना जळ. ३
समीर गमतो मला परिसरीं अहा धूमसा,
विभेदुनि तया कसा अचल वाढला उंचसा;
विचार करितां पुन्हा, न च विभेदिसी, वाटतें;
सनातन तुझें खरें सहज धाम दे शांतितें. ४
अगा अचलनायका! भय मनांत उत्पादिसी,
न भीति परि केवला, अमित शांति ही मानसीं;
न दृष्टि ढळते जरी तुजवरूनि, मोदाकरा!
तरी न मन हें तुला भजतसे, भजे ईश्वरा, ५
गमे, उदय पावतो रव मनोहर स्वांतरीं,
तशी मम विकासते हृदयिं मूर्ति तूझी खरी;
प्रमोदभर मानसा विसरवी निजा चेतना,

न केवि मग भावना त्रिजगतात्मरूपा मना ? ६
स्मरोनि विभुची कृपा नयन ढाळिती आंसवें,
मना ! तदुपकार तूं स्मरसि नित्य मोदोद्भवें;
प्रमोद, उपकार, रे मधुर शब्दसंधीं वदें,
करीं मजसवें प्रभुस्तवन सानुमंता मुदें ! ७

तमासह तुझें निशीं सतत युद्ध, शैलाग्रणी !
सहाय तुज तारका विखरल्या नभःप्रांगणीं !
तुझें शिखर सेवितो, उदय पावला शुक्र हा,
प्रभातरवि रंजवी तुज सुरम्यवर्णी अहा ! ८

सखा अरुण वा तुझा तुज चि भेट देतो अर्घी;
प्रकाशवृतसानुला तुज विलोकुनीयां सुधी-
म्हणे, ' दिवस पातला; उठुनि नित्य कर्मे करा ! '
नियामक जनां खरा; नगवरा ! स्तवूं ईश्वरा. ९

अदृश्य रविच्छटा करा तव महाश्रयस्तंभ जे,
कुणीं खणुनियां धरा अचल रोविले ?—त्या भजें;
कुणीं विविधरंग हे-विनटतोसि ज्याहीं-दिले !
वदें, तुज दिले कुणीं नद, तुडुंबले जे जलें ? १०
वदाल नद हो तुम्ही, स्ववतसां प्रवृद्धें मदें-
तमोमय दरीतुनी, जनन हें तुम्हां कोण दे ?
कशा कठिण कातळांवरुनि इंद्रवज्राहतां-
प्रसन्नजलनिर्भरें सतत या उड्या मारितां! ११
वदें ' खळ ' असा ध्वनी, धवलफेन भंगावली,
अखंड जल, वेग हा, अतुल शक्ति, कोणीं दिली ?
' इथे जलतरंग हो ! स्थिर तुम्ही असां!' हा कुणीं-
निदेश दिधला तुम्हां? अचल जाहलां त्या क्षणीं. १२
नगा ! तुजवरी किती हिममया नद्या सांचल्या !
मिळूनि नग जाहला अपर तो; नद्या गोठल्या;
तुझ्या शिखरिं आसरा नच तयां मिळाला भला,
म्हणूनि ढळला; परी प्रभुवचें मधें थांबला ! १३

प्रपात ! सरिता ! तुम्हां सतत शांति-देवी वरी,
निशाकरकरीं अहा रजतसानुमानापरी;
तुम्हांस दिधला कुणीं धवलिमा ? तुम्हां भास्करें—
वदा कवण रंग दे !–कवण मोद पुष्पाकरें ? १४
वदा ! 'प्रभु' जलौघ; हे! हिमशिली ! प्रभूतें स्मरा
नद्या ' प्रभु ' वदा, तुम्ही उपल हो ! स्मरा ईश्वरा !
प्रपात ! तव थोर हा रव, वदे प्रभूतें सदा,
भवन्मुख समीर हो सरलवृक्ष, ईशा वदा ! १५
अहो हिमनगोद्भवा कुसुमिता लतांनो, स्मरा !
मुदें विचरतां तुम्ही गवय हो स्मरा ईश्वरा !
स्मरा जलद हो तुम्ही प्रभुवरा मनापासुनी !
सहाय तुमची सखी कनकगौर सौदामिनी. १६
अगा अचलनायका ! प्रभुस पूजण्या साधनें—
समीप असती तुझ्या, भज तया प्रसन्नें मनें !
पवित्र जल घेउनी सुरधुनीनदीपासुनी,
करीं च अभिषेक तूं, अगरु-चंदना चर्चुनी ! १७
स्वयें हरिणनाभिनें प्रभुस कृष्ण लावीं टिळा,
सुगंधकुममालिका ग्रथुनि घालि त्याच्या गळां;
प्रसन्न विभुसी करीं, अगरु धूप तूं लावुनी,
करील मग आरती जलदभाज सौदामिनी ! १७

महाजनी.

---

## २ सदुपदेश.

### आर्या

श्रीरामासि भजावें भक्तें म्यां जेविं, तेविं संतांतें;
राजासि उपासावें, तैसेंचि जनें, प्रधान-पंतातें. १
रंगावें सद्वचनें मतिनें चूर्णें जसें च हळदीनें,
भजन न सोडावें म्यां जेविं कधीं कर्षकें न हळ दीनें. २

सद्व्यसनीं वेंचावें आयू, न पुरे चि भरंवसा याचा;
झालों जीर्ण तरि, मनीं आहे रसिकांत भर वसायाचा. ३
हरि-हर-जनाश्रय बरा, होतें तदितर जनाश्रयें भंड,
लागुनि असमर्थाच्या कांसेला वस्त्र पावतें दंड. ४
कांपावें मन कुजनीं वृद्धपणीं कांपतें जसें शिर तें,
सत्संगींच शिरावें बाळ जनन्यंचळीं जसें शिरतें. ५
सद्भक्तीं च असावा प्रेमा, ग्रीष्मीं जसा असे व्यजनीं,
रम्य हि अभक्त हो मज, मधुपा चंपक जसा असेव्य,जनीं.
वत्स जसा स्तन्यातें सादर पीतो धरोनि आम्यातें,
जें साधुमुखोद्गत यश तैसें प्यावें करूनि आ म्यां तें. ७
प्रेमें नवीं नवीं तीं माझ्या रसनेसि सुकवि कुल-गीतें—
गीतें यावीं, येती माहेरीं जेविं बहुत मुलगीतें. ८
ज्यांत न हरि हर-जन-यश ऐसें जें काय कीर्तनीं गान,
तें अलवण-भोजनसें नच सेवुत आर्त-बाळसे कान. ९
हरिकीर्तनीं शिरावें धनिकगृहीं जपुन जेविं चोरानें;
बहुकार्यें हि नुठावें, बहुभारें जेविं कुचर ढोरानें. १०
म्यां किर्तना टपावें, मार्जारें सर्वदा जसें दुग्धा,
सन्माति विनयादि गुणां वाहो प्रेमें, न ां जशी मुग्धा ११
निजदेह–गेह–भान प्रभुभक्तांच्या कधीं हि मेळांत–
मज कीर्तनीं नसावें, जैसें शिरतां मुलास खेळांत. १२
भव-गज-भय शमवाया वृत्ती हरिकीर्तनीं च राखावी,
पित्तनिवारक जैशी सुलभ बरी शुंठि-शर्करा खावी. १३
नारायणनामानें न च सोडावें कदापि हें वदन,
मेल्या ही लोभ्याच्या चित्तें सोडूं नये जसें सदन. १४
ज्यांचे चित्तीं हरिहर, तत्संगति दे सदा मला, देवा!
दे त्वद्भजनीं बुद्धी, आवड पुरवुनि तुझी च पदसेवा. १५
संसार दों दिसांचा, सत्संग धरी कुलीन, तो चि तरे;
घ्यावें बरें म्हणोनि स्वपरमुखीं हें कुलीनतोचित रे! १६

मोरोपंत.

## ३ भीष्म व परशुराम.

भीष्मानें आपल्या भावासाठीं काशिराजाच्या तीन कन्या हरण करून आणिल्या व दोघींचें भावाशीं लग्न लाविलें. परंतु तिसरी प्रथमतः लग्नास कबूल नव्हती. तिनें सांगितलें कीं, आपण शाल्वनामक राजास मनानें वरिलें आहे. यावरून भीष्मानें तिला शाल्वाकडे जाऊं दिलें; पण दुसऱ्यानें जिंकलेली म्हणून तिला शाल्व वरीना. इकडे तिनें मनानें शाल्वास वरिलें होते, म्हणून भीष्म तिचा स्वीकार करीना. तेव्हां भीष्मानें तिचा स्वतांकरितां किंवा भावाकरितां स्वीकार करावा, असें सांगण्यास त्याचा गुरु परशुराम हा त्याजकडे आला. त्याचें ही तो ऐकेना, तेव्हां दोघांचें युद्ध झालें. ही कथा पुढील आर्यांत वर्णिली आहे.

### आर्या

येऊनि कुरुक्षेत्रीं राहे, सांगोनि पाठवी, राजा!
धांवोनि भेटलों मी, वेद-धनुर्वेद पाठ वीरा ज्या १
सत्कृत पूजन घेउनि राम म्हणे, 'रे सुरापगांगभवा!
भक्त्यार्पित बहु; नाहीं तरि काय असे दुराप गांग भवा?२
गरुडें सुधा तशी त्वां हे अंबा रण करूनि जरि हरिली,
तरि हरि-लीन-मति जनें संसृतिरुचि तेंवि केविं परिहरिली?'
वदलों "सत्य भ्रात्या करितां हरिली बळें, पर 'स्वामी—
वरिला शाल्व' म्हणे हे; घेऊं जाणुनि कसें परस्वा मी?" ४
राम म्हणे "शाल्व न घे, मानी हरि गज परें दिला न वरी,
त्वां जिंकिली यदर्थ त्वद्भ्राता तो करू इला नवरी." ५
मी वदलों, "जें दुष्कर, सुयशस्कर, सांग काज रामा, तें;
होइल अकीर्ति, देतां कां हा उपदेश-काजरा मातें?" ६
राम म्हणे, "त्वद्गुरु मी, माझें सुख-पुण्य-कीर्ति-जनक वच;
गुरुवचनास चि म्हणती सर्व भले पुण्यकीर्तिजन कवच!"७
मी बोलिलों, "असें तों न घडेल कधीं, दयानदा, पावें;
गुरुनें ज्यासि अधर्माचरण न मानें, तया न दापावें!" ८
राम म्हणे, "होय सुखी निजगुरुचें वचन शिष्यजन करिता,

नातरि गुरुकुंभ-भव-क्षोभें छात्रामृतांशु-जनक पिता. ९
मज गुरुपुढें 'असें तों न घडेल कधीं,' असें कसें वदसी ?
असतां समर्थ अघटित-घटना-पटु मत्कुठार, हा सदसी. १०
खचशील कौरवा तूं, कीं बहु चढला तुझा मद, सिगेला,
लंघावया पहासी, गांवाला काय रे मदसि गेला ? ११
वधिले क्षितितलवर्ती क्षत्रिय म्यां एकवीसदां सारे,
माझा प्रताप गातां रुद्रभ्रम दे कवीस, दासा रे." १२
ऐसें भलतें चि वदे, दर्णावा मुख्य जो गुरु गुरूंनीं;
पाहे राम मजकडे जेंवि हरिकडे हरी गुरुगुरूनी! १३
वदलों, "धर्म-न्यायें हा देह तपोवनांत राबावा,
त्यजुनि दुरभिमान धरुनि शांतिसि तारुनि जनांतरा बावा.
ठाव्या आहेत मला, सांगा गोष्टी यथेच्छ अन्या या,
तरि भय भलत्यापासुन होइल जरि मी करीन अन्याया१५
वधिले क्षत्रिय तेव्हां नव्हता हा भीष्म शांतनव, समज;
देवासि मागते ते झाले मरणीं करूनि नवस, मज ! १६
गेलें गुरुत्व तुमचें, कां हो म्हणतां वधीन अनघातें ?
येइल पदरांत कसें यश, धर्म-न्याय-निष्ठ-जन-घातें ? १७
सच्छिष्याला विद्या गुरु झांकायासि काय हो शिकवी ?
पांडित्य पहा माझें, पाहोनि मला म्हणाल, 'होशि कवी.'
हांसुनि राम म्हणे, "रे, हितकर गुरुवचन कां न आइकशी?
साहेल तुझी तुझिया दुःसह शोकानलासि आइ कशी?१९
भीष्मा, मज सिंह गणीं, वेड्या, तूं आपणासि कलभ गणीं!
न रविपुढें मिरवेल चंद्रींहि, कसें असेल बल भ-गणीं?२०
देशिल सत्यवतीतें शोक, बहुत रडविशील गंगेतें;
समज बरें मद्दूषित जें जें तेज क्षणांत भंगे तें ! २१
हो सिद्ध, ये, हरीनें व्यसु आला तो करेणु केला हो,
हो गंगेला शोकद, तोखद हें तोक रेणुकेला हो !" २२
सिंधूंत नग जसा कपि, तैसा पाहोनि गर्वनग रामीं—
बंधुनि, 'येतों!' ऐसें बोलुनि, आलों फिरोन नगरा मी. २३

आम्हां गुरुशिष्यांचा अत्यंताद्भुत पहावया समर,
आले बहु सुरराज-ब्रह्मर्षिसमेत सर्वही अमर. २४
ठेवुनि चाप करींचें, उतरूनि रथावरूनि, पद नमुनी,
'मम जयमाशास्व!' असा प्रार्थियला कीर्ति-केलि-सदन मुनी.
मज राम म्हणे, "न नमन करितां करितों चि हानि शापानें
वंदावा गुरु हर्षद अमलद्विजराज हा निशापानें. २६
भीष्मा, मजला म्हणसी जरि 'जयमाशास्व मे, विभो राम!'
तरि संप्रति जैसा तूं जयकाम, तसा चि हा हि जयकाम."
नमुनि रथीं बैसुनि मी वदलों, "गुरुजी, न हार नत पाहो!
तुमच्या न ब्राह्मण्या, न श्रुतिवृंदा प्रहार, न तपा हो! २८
स्वीकारिला तुम्हीं जो असमुचितक्षात्रधर्म साधूंनीं,
खंडीन त्यासि, होइन सन्मत हें साधुकर्म साधूंनी" २९
गुरु खवळलाचि होता, मीहि बहु तसा कधीं च न खवळलों,
एकांएकांवरि मग साक्षात्कल्पातमेघसम वळलों! ३०
ऐसें तेवीस दिवस झालें युद्ध त्रिलोकमोहन हो,
म्हणतचि होते देवा, 'समयीं समरक्रतूंत मोह न हो!' ३१

मोरोपंत.

---

## ४ सह्याद्री.

विहंगम दृष्टीनें सह्याद्रीपर्वताचे सर्व भागांचे वर्णन करितांना कवीला स्थलानुरोधानें तेथें घडलेल्या ऐतिहासिक गोष्टींचें स्मरण होत आहे. व शिवाजीमहाराजांचे कालीं जें ह्या पर्वताचें थोर वैभव होतें, त्याचा पार अस्त झाला आहे हें मनांत येऊन त्या दुःखाचे उमाळ्यानें कवीला अधिक वर्णन करवत नाहीं.

कोठें दुर्गम उंच उंच शिखरीं भेदोनि तारापथा
विंध्याद्रिव्रत आचरोनि अडवूं पाहे रवीच्या रथा;
कोठें भार्गवराममार्गणभयें जो भीरु मागें पळे
त्याचा भारहि साहुनी पुरवितो प्रेमें मुलींचे लळे; १
कोठें खोल महा भयानक दरी पाहोनियां ज्यांकडे

सूर्याचे करही भयें द्चकुनी माघारती बापुडे;
कोठें घोष करीत पुण्यतटिनी जातां समुद्राकडे
खालीं आदळती धडाधड जणूं पापाचलाचे कडे ! २
कोठें शीतळ वाहती झुळझुळां अच्छोदकाचे झरे
ज्यांच्या केवळ दर्शनेंच सगळी तृष्णा जनाची हरे;
कोठें रम्य सरोवरें, स्फटिकभा शुद्धोदकें ज्यांचिया
केली लज्जित शारदेंदुकिरणा देवोनियां आश्रया; ३
कोठें व्योमपथें महीरुह शिरें उंचावुनी आपलीं
घालाया बघती जणूं निजगळां निःसार मेघावली;
कोठें पालवतां लता रुचिरता साऱ्या प्रदेशास ये
वाटे पांघुरली सुरम्य हिरवा शेला वनश्री स्वयें; ४
कोठें त्र्यंबकराजपुण्यमहिमा वर्णीत गोदावरी
जातां पंचवटीवरून नमन श्रीरामचंद्रा करी;
भीमाशंकर सोडुनी निज सखी घेवोनि नीरा सवें
कोठें नेउनि पंढरीस बसवी भीमा जनांचे थवे; ५
कोठें धौममहाबलेश्वर पदा सोडोनि जातां पथीं
कृष्णेला बहु कोयना-दिक सख्या येवोनियां भेटती;
कोठें जी म्हणती प्रयागमहिमा सारा हिरावोनि घे
हाराया करवीरताप मलही ती पंच-गंगा निघे; ६
ताराया भजकां सदाशिव कुठे ज्योतिःस्वरूपें वसे
कोठें येउनि ही हिमालयसुता ह्या सप्तशृंगीं वसे
कोठें ह्या विवरीं लपोनि बसती बौद्धादिकांच्या कृती
होते कुंठित ज्यांकडे निरखितां कारागिरांची मती ७
कोठें हे उंच माना करुनि गड यशस्तंभ राया शिवाचे
देती आम्हां मराठ्यां स्मरण घडिघडी आमच्या वैभवाचें
गेला! तो काळ गेला निघुनि! विभव ही नष्टतें सर्व झालें!
गेलें तें तेज गेलें ! पुरुषवर हि ते भाग्यशाली निमाले ! ८
नाहीं घोरपडीशिवाय शिवली भिंतीस ज्याच्या शिडी
फेंकाया शकले न दृष्टि रिपुही ज्याच्याकडे वांकडी

तान्हाजीसम वीरसिंह पडला ज्याकारणें संगरीं
त्या ह्या सिंहगडीं निरंतर शिवा स्वाराज्य आतां करी ! ९
ज्याचा मावळुनी प्रतापतरणी केव्हां च गेला तरी
गर्वें मान वरी करोनि बसला जो ह्या गिरीच्या शिरीं
तो हा पाहुनियां प्रतापगड त्या राया शिवाची कृती
त्याच्या वाघनखांसह स्मरुनियां तल्लीन होते मती १०
जेथें ऐकुनि चौघडे धडकतां राज्याभिषेकोत्सवीं
नाचे हर्षभरें विरक्त हि तरी तो जावळीचा कवी;
त्या ह्या राजगडावरोनि भगवा झेंडा पडे खालतीं
ऐसें पाहुनियां गळे सहजची त्या माळव्यांची धृती ११
सह्याद्रे ! तुज पाहुनी प्रथम जो आनंद झाला मला
त्याचा एक हि लेश यावरि नसे चित्तांत ह्या राहिला
आतां राहुनियां इथें असुखची होणार आहे मना
दुःखें यास्तव आज सोडुनि तुला ही चालली कल्पना!१२

गंगाधर रामचंद्र मोगरे.

---

## ५ दुर्योधन स्वसैन्यास धीर देत आहे.

भारतीय युद्धांत द्रोणाचार्य पडल्यावर दुर्योधनानें कर्णास सेनापति केलें. त्या वेळचें हें दुर्योधनाचें भाषण आहे.

### आर्या

"ऐका हो वीर तुम्ही, मीं तुमच्या भुजबलाश्रयें शुद्ध—
यश जोडाया कुंतीपुत्रांसीं मांडिलें महायुद्ध, १
दिसतां विषण्ण सर्व द्रोणवधीं, मरति वीर युद्धांत,
फल जय कीं वध होणें हा निश्चय निश्चल प्रबुद्धांत. २
द्रोण-वधें रिपु मानिति जय,मानूं द्या न चित्त हें; तो हि-
क्षणमात्राचि कीं, पावति न जयातें सर्वथा गुरुद्रोही. ३
युद्ध करील महात्मा कर्ण, पहा ही तुम्ही कुतूहल, तें—
विसरेल दुःख तुमचें मन जें द्रोण स्मरोनि हळहळतें ! ४
राम-प्रसाद-लब्धें दिव्यास्त्रें योजितां चि अंगेना,

पाहों न शकेल चि पर-बल, हरिकुल हरिसमक्ष भंगेना! ५
युद्धीं सदा हि ज्या नर-सिंहाचा पार्थ मृग धरी त्रास,
परिसा त्याच्या रिपुमद-महिष-महा-शक्तिच्या चरित्रास. ६
मानुषयुद्धें चि गजायुतबल खल भीम त्या अवस्थेला—
जेणें सेनापति गुरु असतां समरांगणीं क्षणीं नेला; ७
दिव्यास्त्रज्ञ घटोत्कच अतिशूर, क्रूर-भाव,मायावी,
जेणें वधिला वासव-शक्तीनें, जीस न क्षमा यावी;
त्या या कर्णाचें भुजबल खल-बल-जलधिमाजि देखाल,
मग संक्षुब्धौर्वानल-दर्शन झालें असेंचि रेखाल ! ९
करितां विक्रम कर्ण-द्रौणी दिसतील विष्णु-वासवसे,
यांच्या ठायीं चाप-श्रुति करुनि प्रकट वैभवास वसे. १०
भीष्मद्रोण-वध-जयें झाला मद पांडवांसि तो यांचा—
विक्रम करिल क्षीण, ग्रीष्म जसा लघु तडाग तोयांचा. ११
त्या कुंती-पुत्रांच्या अति-दक्ष तुम्ही असा सखे दमना,
तुमच्या विजयि भुजबळें न गुरुव्यसनीं हि मी सखेद-मना."

मोरोपंत.

---

## ६ नीतिपर श्लोक.

करूं ये समाधान जो मूर्ख त्याचें,
धरूं ये सुखें चित्त पैं जाणत्याचें;
न जाणे न नेणे अशा पामराला,
बुझावूं शकेना विधाना तयाला.
बळानें काढूं ये मणि मकरदाढेंत दडला,
महासिंधू-लाटा-तरण करूं येइ भुजबला;
महासर्पातें ही सुमसम धरूं ये निजशिरीं;
परंतु मूर्खाचें हृदय धरवेना क्षणभरी ! २
जधीं कांहीं कांहीं हरि, कवि, असे शब्द शिकलों,
तधीं 'मी सर्वज्ञ' द्विपसम मदें याच भरलों !
जधीं 'कांहीं नेणें,' म्हणुनि वदले पंडित मला,

तदा माझा गर्व-ज्वर सकळही हा उतरला ! ३
विपत्कालीं धैर्य, प्रभुपणिं सहिष्णुत्व बरवें,
सभे पांडित्याचा प्रसर, समरीं शौर्य मिरवे,
स्वकीर्तीच्या ठायीं प्रचुर रति, विद्याव्यसन जें,
तयांचे हे स्वाभाविक गुण सहा, सत्पुरुष जे. ४

वानोत निंदोत सुनीतिमंत,
नसो असो वा कमला गृहांत;
हो मृत्यु आजीच, घडो युगांतीं,
सन्मार्ग टाकून भले न जाती ! ५
जे कां ज्ञानें लाधले सद्विचारा ।
संपत्तीचा त्यांपुढें काय तोरा ?
पद्माचा जो तंतु तो वारणाला ।
वारायाला पैं म्हणे सिद्ध झाला ! ६

झाला क्षीण बहु क्षुधेस्तव जरी, कीं व्यापिला वार्धकें,
आली कष्टदशा, घडो मरण ही, कीं तेज गेलें निकें,
ऐसा हा मृगराज जीर्ण तृण तो खाईल कीं काय हा—
शौर्ये भेदुनि हस्तिमस्तक, शुभग्रासींच ज्याला स्पृहा ! ७
पेटीमाजि निरोधिला, न सुटका ज्याला भुकेला फणी,
तों केलें बिळ मूषकें अवचितां, तो आंत गेला क्षणीं;
त्यातें भक्षुनि सर्प, तत्कृत-पथें निश्चित गेला पहा !
ऐसें कर्म अतर्क्य ! यास्तव तुम्ही कीं स्वस्थचित्तें रहा. ८

आस्फालितां ही स्वकरें न राहे,
चेंडू जसा तो उसळे च पाहें;
विपत्तियोगें पडले जरी कां,
तें धैर्य नोहे तरि साधुला कां ? ९
चेंडू पडे आणि उठे तसा ची--
दृष्टांत हा सत्पुरुषास साची;
मृत्पिंड जो त्या उठणें च नाहीं,
दृष्टांत हा केवळ दुर्जना ही. १०

जो तोषवी स्वजनकास, सुपुत्र तो च;
जें दे पतीस सुख फार, कलत्र तें च;
जो एकरूप सुखदुःखपणीं, गडी तो;
हा लाभ पूर्वसुकृताविण केविं होतो ? ११
संपत्काळीं कोंवळें सज्जनाचें--
होतें चित्त ज्ञाति पंकेरुहाचें;
आपत्काळीं शैल हो आदळो कां--
धाकेना जें, गाजवी धैर्य-डंका ! १२
विद्यासमन्वित हि दुष्ट परित्यजावा,
त्याशीं बुधें न सहवास कधीं करावा;
ज्याच्या असे विमल ही मणि उत्तमांगीं
तो सर्प काय न डसे खल अंतरंगीं ? १३
योजी हिताप्रति निवारुनि पापकर्में,
वर्णी बरेच गुण, झाकुनियां कुकर्में;
दे आपणास असतां, व्यसनीं त्यजीना,
सन्मित्रलक्षण असें वदताति जाणा. १४
तोयाचें परि नांव ही न उरतें संतप्तलोहांतरीं,
तें भासे नलिनीदलावरि पहा सन्मौक्तिकाचे परी !
तें स्वातीस्तव अब्धिशुक्तिपुटकीं मोतीं घडे नेटकें,
जाणा उत्तममध्यमाधम-दशा संसर्गयोगें टिके. १५
पुष्पापरी दोंपरिचीच साची।हे वृत्ति संभाविन जे तयांची;
लोकांचिये एक शिरीं सजावें।वना च कीं एक सुकोनि जावें!
भाग्याला सुजनत्व भूषण असे कीं मौन शौर्यास तें.
ज्ञानाला शम, त्या शमास विनय, द्रव्यास दातृत्व तें;
अक्रोधत्व तपा. क्षमा प्रभुपणा, धर्मास निर्दंभता,
या सर्वांस हि मुख्य भूषण पहा सच्छील हें तत्वतां. १७
खरें वचन बोलवी, जडपणास कीं मालवी,
महोन्नतिस डोलवी. दुरित मारुनी चालवी;
मनीं सुख अमोल वी, यश जगत्त्रयीं कालवी,

अनेक गुण पालवी, सुजनसंग तो भूलवी. १८

वांच्छा सज्जनसंगमीं, गुरुकुलीं वंदारुता, नम्रता;
निंदेचें भय, तुष्टता परगुणीं, लोकार्जनीं लुब्धता;
विद्याभ्यास, महेशभाक्ति, खलसंसर्गीं अनासक्तता,
चित्ताचा जय, या गुणांस निधि जे त्यां वंदिजे तत्त्वतां.१९

खोटें बरें कार्य असो तयाचा। विचारिजे कीं परिणाम साचा
कर्तव्य कीं जें विबुधें विवेकें। तें अन्यथा शल्य घडे विपाकें२०

अब्धीमाजि बुडो,प्रयत्न करुनी हेमाद्रिशृंगीं चढो,
शत्रूतें रगडो रणीं, क्रयकृषिव्यापारकर्मीं भिडो;
विद्या सर्व पढो, कडे विकडिच्या व्योमास लंघो, उडो,
जें होणार चुके चि ना, विधिबळें, बेटा रडो ना रडो !२१

मरावें कीं होतें सुरपतिस देऊनि झगडा,
प्रहारें वज्राच्या करुनि धरणीं इंगळसडा;
पित्यातें संग्रामीं त्यजुनि भय निःशंक भिडणें;
नव्हे त्या मैनाका उचित जलधीमाजि दडणें २२

कर्मानुसार घडते गति सर्वलोकां;
कर्मा अधीन फल, येथ नसे च शंका;
हें सत्य यद्यपि तरी, असतां विवेकें—
होणार हो मग सुखें निजकर्मपाकें. २३

वनचरांसह शैलवनांतरें, । निजसुखें फिरणें तरि तें बरें;
जरि घडे सहवास चि पामरीं।तरि जळो असणें सुरमंदिरीं

श्रुतें चि कीं श्रोत्र,न कुंडलानें।दानें चि कीं पाणि, न कंकणानें
साजे तसा देह हि हा, न आनें। परोपकारें चि, न चंदनानें.

तें श्वान एक तुकड्यास्तव चार नाना—
दावी धन्यास, जठरार्थ कसें पाहा ना !
दे आळवूनि जरि हस्तिप, बाप ! भाई !
घेतोचि घांस गजराज कशी बढाई ? २६

प्रजा हा च कीं वत्स भूधेनुकेचा;
नृपा तूं करीं फार सांभाळ याचा;

स्ववत्साचिया जाण वात्सल्ययोगें,
अभीष्टार्थ देईल हे भूमि वेगें. २७
कीं तोडिला तरु फुटे अणखी भरानें,
तो क्षीण ही विधु महोन्नति घे क्रमानें;
जाणोनि हें सुजन, ज्या दुबळीक आली,
त्याशीं कदा न करिती सहसा टवाळी. २८
बरें तें या देहीं महिवरि कडेलोट करणें,
महासर्पाच्या कीं वदनिं तरि हा हात धरणें,
उडी कीं वन्हींत त्वरित जरि घालूनि मरणें;
जळो तें कीं लोकीं त्यजुनि निज सच्छील फिरणें.२
विद्या हें पुरुषास रूप बरवें, कीं झांकलें द्रव्य ही,
विद्या भोग-सुकीर्ति-दायक पहा, ते मान्य मान्यांसही;
विद्या बंधु असे विदेशगमनीं, विद्या महादेवता,
विद्या पूज्य नृपास, हा नर पशु तीविगळा तत्त्वतां ! ३०
उपजणें मरणें न चुके नरा,
फिरत नित्य असे भवभोंवरा;
उपजला तरि तो च मला गमे,
कुल समुन्नति ज्यास्तव घे रमे. ३१
वृक्ष फार लवती फलभारें । लोंबती जलद घेउनि नीरें;
थोर गर्व न धरी विभवाचा। हा स्वभाव उपकारपराचा. ३२
जें पात्र कां पुरुषरत्न महागुणांचें,
तें निर्मितो विधि विभूषण भूमिकेचें;
कीं त्यास ही त्वरित मृत्युमुखांत लोटी,
त्याची गमे मज अपंडितता करंटी ! ३३
जसा वर्ततो लोककल्याणकारी,
जगीं वर्तती लोक ही त्या प्रकारीं;
वदे तो सदाचार, शास्त्रार्थ जैसे,
जगीं वर्तती लोक ही सर्व तैसे. ३४
जे मायबाप जन-शासन-दंडधर्ते,

जे साधु सर्वसम, जे नयनीतिकर्ते;
ऐशांस ही विषमता उपजेल जेव्हां,
कोणास हे शरण जातिल लोक तेव्हां ? ३५

वामन.

---

## ७ हिमालयपर्वतावरील सृष्टिशोभा.

### श्लोक

जेथें प्रकल्पितजटेंतुनि शंकराच्या—
ही येतसे प्रथम दृष्टिपथा जनांच्या,
तेथें घडीभर बसून समग्र सृष्टी—
सौंदर्य भोंवतिल देउन सूक्ष्मदृष्टी, १
जातां बघूं मग किती तरि जागजागीं—
चोंहींकडील सुमनोहर भूविभागीं—
शोभा दिसे ! विविध रम्य किती पदार्थ—
देऊन दर्शन तिला करिती कृतार्थ ! २
जैसें वसंतसमयीं मधुमक्षिकेला,
चोंहींकडून फुलल्या सुमवाटिकेला—
दैवें प्रवेश मिळतां, तिजला अपार—
होतो प्रमोद, मनिं उत्सुकता हि फार; ३
तैसें चि मन्मन हि या बघतां नगांत,
आनंद-सिंधु-लहरींत बुडून जातें:
जो या स्थळीं रुचिर वस्तुसमूह थाटे,
तो पाहण्यास मज कौतुक फार वाटे ! ४
त्यानंतरें, मग जसी मधुमक्षिका ते,
सानंद पंख अपुले उडवीत जाते;
एका फुलांतिल पिऊन रसा, दुजातें,
तेथील ही रस पिऊन पुढें तिजातें, ५
त्या रीतिनें च मम दृष्टि हि या स्थळाची—
शोभा विचित्र रमणीय पहावयाची—

इच्छा धरून हृदयांत, यथाक्रमानें--
सारे पदार्थ निरखी परमादरानें. ६
जातां दृष्टी प्रथम चि पहा या गिरीच्या तळातें,
जें रानाचें वलय दिसतें रुंद त्याच्या सभोंतें,
त्या ' तार्यांनी ' म्हणुन वसतें देशभाषेंत नांव,
लोकीं त्याच्यापरि न दुसरा सांपडे घोर ठाव. ७
होती या उद्गम जवळच्या उंचभागीं जयांचे,
त्या साऱ्यांही सलिल जमतें या स्थळीं निर्झरांचें;
त्यायोगानें बहु दलदली थोर या घोर रानीं-
होती, तापे रवि हि वरतीं लंबरूपी करांनीं' ८
त्यानें तेथें विपिन इतकें किर्र माजून जातें,
कीं त्यामध्यें स्थळ न गवसे पाय ही ठेवण्यातें;
कोठें माजे यवस, झुडपें कंटकांचीं हि कोठें,
कोठें जाती सरळ गगनीं वृक्षही मोठमोठे. ९
कोठें होती अविरल वनें वेतसाचीं अफाट,
कोठें साधारण गवत हीं वाढतें उंच दाट.
जागोजागीं पडुनि तरुंचीं जीर्णपर्णें, कुजून-
जातां वाफा विषमय निघूं लागती त्यांमधून; १०
त्यांनीं वातावरण भरतें भोंवतालील साचें,
त्यायोगें या स्थळि न घडतें राहणें मानवाचें.
ऐसें आहे तरि हि, विविध श्वापदें क्रूर, चंड,
रानीं या निर्भय चहुंकडे हिंडती हीं उदंड, ११
कोठें मत्त द्विरद फिरती थोर यूथें करून,
कोठें व्याघ्रप्रवर करिती वास खिंडींमधून;
कोठें कुंजाश्रय करुनियां वन्य गाई रहाती,
कोठें वस्ती वरिति तरुच्या कोटरीं ऋक्षजाती. १२
यांतें स्वप्नामधि हि न असे मानवी शक्ति ठावी,
तेव्हां तीपासुनि मरणभी केविं यांतें असावी?
हे सोडून प्रविततविषोद्गारगंधी अनूप-

जातां कांहीं चढुनि, वरतीं या नगाचें स्वरूप- १३
पूर्वीपक्षां अधिक दिसतें सौम्य; पाहून ज्यातें-
होतें दृष्टीप्रति सुख, महानंद ही मानसातें ?
जातां मार्गी बघत. लवणांतून दोहींकडे तें,
येथें दृष्टी पडति हिरवीं गार विस्तीर्ण शेतें. १४
कोठें त्यांच्यामधुनि दिसती ओघ हे निर्झरांचे,
वाहे शुद्ध, स्फटिकसदृश, स्वच्छ वारी जयांचें;
कोठें कोठें मधुनि दिसती रम्य गांवें: तयांच्या-
भोंतीं ताट्या अविरल पहा लागल्या या फुलांच्या ! १५
चांफा, जाई, गुलतरु, गुलाबादिकांतें विकास-
होतां, त्यांचा मधुर पसरे गंध दाही दिशांस.
कोठें सौगंधिक शतदलीं पद्मखंडें विकास-
कासारांच्या धरिति सलिलीं; त्यांमध्यें राजहंस- १६
आनंदानें प्रियसहचरीयुक्त राहून शांत,
संसारींचीं सकळ हि सुखें पूर्ण हे भोगितात !
जे उत्पत्ती धरिती समशीतोष्ण वा उष्णदेशीं,
ते एकत्र द्रुम सकल ही वाढती या प्रदेशीं; १७
कोठें माळावरि उगवती देवदारू विशाल,
कोठें ओकद्रुम विलसती, उंच कोठें तमाल;
पारंब्या ही सुटुनि धरणीमाजि कोठें वडांच्या,
जीं कां त्यापासुनि उगवती अन्य झाडें, तयांच्या- १८
गुंफा होती निबिड, तरुणादित्य-तापातें ज्यांतें-
कस्तुरीचे मृग निपजती प्रत्यहीं आश्रयातें.
ज्यांतें आलिंगिति मधुलता मुग्ध-शाखा-करांनीं,
ऐसे आम्रद्रुम हि दिसती नम्र भारी फलांनीं. १९
जो या स्थानीं सतत घुमतो कंदरांतून वारा,
त्या मानून स्तनित, अपुला चित्रवर्णी पिसारा-
सारा प्रेमें पसरुनि, गलत्प्रेम-नेत्रांबु-पूर,
वृक्षस्कंधीं रुचिर करिती तांडवातें मयूर ! २०

जी या स्थानीं निबिड जमते शीतकाळीं हिमानी,
ती ग्रीष्मींच्या द्रुत वितळतां भास्कराच्या करांनीं,
मोठीं मोठीं हरित कुरणें वाढती या विभागीं,
त्यांच्यामध्यें चरति पशुंचे संघ ही जागजागीं. २१
कांहीं जागीं हरिण चरती हे निजेच्छानुसारें,
कोठें वन्यच्छगल, इकडे ग्राम्य कोठें खिलारें;
कोठें दृष्टी पडति बकरीं, आत्मजांतुल्य ज्यांसी-
शालीसाठीं जतन करिती लोक काश्मीरवासी. २२
जातां हांहि चढून भाग वरतीं, तेथें दिसूं लागती—
साऱ्या वस्तु उदास, रुक्ष; अवघें ओसाड दृष्टींप्रती;
भासे हें स्थळ पाहतां, मधुरसा चाखून त्याच्यावरी—
खातां तिंतिडिका, घडे तशि अतां मच्चित्तवृत्ती बरी, २३
जातां या स्थलिं खालतीं, वरि, पुढें, मागें, चहूंहीकडे—
सारें बर्फ दिसे; तयाविण दुजें कांहीं न दृष्टी पडे;
वर्षांतून सदैव शीत अपुला आवास येथें करी,
तेणें वृद्धि न उद्भिजा घडतसे या शून्यभागावरी. २४
भूर्जांचे तरु जे क्वचित् खुरटले थंडीमुळें राहती,
त्यांवांचून न कोणते हि दुसरे येथें तरू वाढती;
कस्तूरीमृग वा मदोद्धत करी वा हिंसक श्वापदें,
किंवा पक्षिसमूह ही न करती येथें निवासास्पदें. २५
जातां प्राणिनिवासचिन्ह हि बघूं कोठें नसे तत्वतां,
सारा भाग दिसे भयाण, अवघी भासे उदासीनता;
कोठें उंच कड्यांवरून पडतां वेगें नद्या खालतीं,
त्यांचीं पात-विशीर्ण तूर्ण शतधा धाराजलें वाहती. २६
तीं वेगें खडकांमधून पुढतीं वाहूं जशीं लागती,
त्यांच्या भीमरवें प्रपूरित दऱ्या तैशा हि नादावती;
यायेथून विलोकितां दिसति जीं जातां नभोभ्यंतरीं,
स्वर्गारोहण-हेतु-निर्मित महासोपानमार्गापरी, २७
एकामागुन एक, उंच शिखरें या अद्रिचीं, त्यां शिरीं-

शोभे क्षीर-विपांडु-निर्मळ हिम-प्रावार वस्त्रापरी;
ग्रीष्मींचा प्रखरप्रताप हि जरी भास्वान् सहस्त्रां करीं—
प्रत्यब्दीं हिम येथलें वितळण्यासाठीं प्रयत्नां करी, २८
सारें व्यर्थ तरी हि; बर्फ न कधीं येथील जातें लया;
ज्यातें थोर निजाश्रया वितरती, कांहीं नसे भी तया.
जीं येथून समीप फार दिसती तीं स्वच्छ नेत्रांप्रती;
त्यांमागील लगेच अंधक जरा कांहीं दिसूं लागती; २९
त्यांहीहून विशेष अंधक दुजीं त्यामागचीं यापरी–
ओळीनें शिखरें जशीं चढत हीं जाती नभोभ्यंतरीं,
तैसा आदिमवर्ण पालटुनियां नीलत्व त्यां येतसे,
यायोगें गगनास आणिक तयां वर्णैकता होतसे! ३०

चिंतामणि पेठकर, गंगावर्णना.

---

## ८ शल्यकर्ण-संवाद.

शल्य हा पांडवांचा मामा, तथापि तो भारतीय युद्धांत कौरवांकडे होता. हा सारथ्यकर्मांत फार कुशल होता. अर्जुनाचा सारथी कृष्ण असल्यामुळें अर्जुन कर्णापेक्षां युद्धांत वरचढ होईल, हें मनांत आणून दुर्योधनानें शल्यास विनवून त्याचेकडून कर्णाचें सारथ्य स्वीकारविलें. तो सारथी झाला असतां त्याचें व कर्णाचें जें भाषण झालें तें पुढें वर्णिलें आहे. शल्य हा कर्णाचा मुद्दाम पाणउतारा करून त्याचें मन युद्धांत उदास करीत असे, व निरंतर त्यास टाकून बोलत असे. उताऱ्यांतला कर्णाचा स्वाभिमान लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

### आर्या

कर्ण म्हणे ''शल्या, गति भीष्माची शत्रुंनीं तशी केली,
गुरु हि अधर्मैं वधिला, विजयश्री ओढुनी बळें नेली. १
पार्थप्रताप साहे आहे मजवेगळा असा कोण?
गंगासुत वृद्ध भला, तो ब्राह्मण ही पुरातन द्रोण. २
माझें प्रिय बहु केलें धृतराष्ट्र–सुतें तदर्थ साधीन,

ह्याविषयीं प्रिय-भोगासह जीवित करिन अंतकाधीन." ३
इत्यादि आत्मविक्रम जेव्हां स्वमुखें यथेष्ट कर्ण वदे,
शल्य तया उत्तर दे, उग्र जसें विष हरासि अर्णव दे. ४
"नरवर अर्जुन कोठें, पुरुषाधम सूतपुत्र तूं कोठें ?
वाचाळा, नाचावें सत्स्तवनीं, न स्ववर्णनीं ओठें. ५
तुज नित्य घोष-यात्रा-स्मरण असावें, परंतु हा मद तों-
आहे चि विस्मृतीचें बीज, म्हणुनि लेशमात्र मी वदतों; ६
बद्ध विमुक्त सुयोधन तेव्हां त्वां, कीं धनंजयें केला ?
राधेय अन्य तूं, तो अन्य चि जाणों, पळोनि जो गेला ! ७
त्या गोग्रहप्रसंगीं, भीष्म-द्रोणादि सर्व एकानें—
केले भग्न, दशा ते तुमची क्षण आयकों नये कानें ! ८
तेव्हां त्वां तो अर्जुन, राधेया कां न जिंकिला ? शस्त्रें —
अस्त्रें गेलीं होतीं कोठें ? नेलीं हिरोनि जैं वस्त्रें ? ९
झालें युद्ध उपस्थित; आजि पळेनासि जरि, तुला पार्थ—
मारील निश्चयें, हें कर्म करिशि निजवधू-विलापार्थ." १०
कर्ण म्हणे, "गा शल्या, मागील कथा कशास, जरि आजी-
मज जिंकील तरि खरें तव कत्थन; शीघ्र चालवीं वाजी."
शल्य म्हणे, "बहु बरवें, पार्थाशीं गांठि घालितों तूर्ण,
ईश्वर-वरानुकूलें दैवें होतात कामना पूर्ण !" १२
कर्ण म्हणे, 'सुखवाया भूप-सखा करुनि शत्रुचें निधन,
सांगेल पार्थ मज जो, देइन मागेल जें तयासि धन.' १३
शल्य म्हणे, "राधेया, वांटिशि धन कां कुबेरसा ? अज्ञा,
पार्थ पहाशील सुखें, व्ययवंत्ते वित्त वेंचितीं यज्ञा. १४
कंठीं बांधोनि शिळा, बाहुबळें जेंवि सागरीं तरण,
कीं भृगुपतन, तसें हें, जें तूं करणार त्या अरींत रण ! १५
व्यूह रचोनि, सकळ नृप, बंधु, सुत, सुयोधनादिकांसहित,
पार्थाशीं युद्ध करीं, जरि म्हणसी स्वजय हो, न हो अहित."
कर्ण म्हणे, " शल्या, मी स्वभुजबळें प्रार्थितों रणीं पार्था,
हे प्रभु सहाय असतां साधींना कर्ण कोणत्या स्वार्था? १७

या दृढ-मदभिप्रायापासुनि वारूं शके न शक्र मला—
मर्त्यांची काय कथा? प्राकृतसा काय कर्ण हा गमला?" १८
शल्य म्हणे, " राधेया, जेव्हां तुझिया स्मरोनि कर्मांतें,
अर्जुन तीव्रशरांनीं समरीं भेदील सर्व मर्मांतें, १९
तेव्हां पश्चात्तापा, बापा, तूं पावशील पापानें—
सापानें धरिला प्लव न जगे, बडबडसि तूं जसा पानें! २०
तूं विजयासि वधाया वांच्छिसि, हें कोण जाणता साहे,
अंबांकस्थित शिशु शशिमंडळ कवळावया जसा पाहे! २१
स्वबिलस्थ कृष्णसर्पा काष्ठें टोंचोनि खवळिशी कां गा,
तीव्र त्रिशूळ-यदनें तूं खाजवितोसि आपुल्या आंगा. २२
पार्थ-पयोधर गर्जे, स्पर्धा मंडूक तूं वृथा धरिशी,
त्याच्यापुढें डुरुडुरू, टरांटरां, शब्द हे किती करिशी? २३
श्वान स्वपोषकाच्या सदनाच्या आश्रयें उभा राहे,
जिकडे वनांत गर्जे शार्दूल तया दिशेकडे पाहे! २४
शशमंडळांत कोल्हा म्हणतो, 'मी सिंह!' वल्गना करितो,
जोंवरि न पाहिला गज मुक्ताफल-कवळ-भक्षिता हरि तो."
कर्ण म्हणे, " गुणवद्गुण जाणे गुणवंत, अगुण नेणेची,
प्रसवे तीच अभिज्ञा, शल्या, तैसी न वांझ वेणेची. २६
मी आपणास जाणें, जाणें त्या जिष्णुलाही तत्त्वानें;
तैसें न जाणिजे त्वां इतरें, बा सत्त्वहीन सत्त्वानें. २७
पार्थवधाचें साधन आहे, तें सांगतों तुला, जेणें—
आज द्वैरथयुद्धीं विजयाचे प्राण निश्चयें घेणें! २८
भ्यालासि मूढबुद्धे, बडबडसी, फार वानिसी अरिला,
भाव तुझा मज कळला, धीर तुझा मृत्युच्या भयें हरिला.
ते मारितील मज कीं त्यांला मारीन मी, स्व-बळ जाणें,
कृष्णाला कर्ण न भी, तनु टाकुनि एकदां असे जाणें! ३०
दोघांची काय कथा, जरि कृष्णार्जुन सहस्र येतील,
तरि माझे शर त्यांच्या प्राणधनातें हिरोनि घेतील! ३१
मज युद्धाभिप्रायापासुनि मागें बळेंचि फिरवील,

ऐसें भूत नसेचि त्रिजगीं, जें या यशास मिरवील! ३२
भ्याडासि भेडसावीं, मी भ्याया उपजलों नसें कांहीं,
विक्रमयश साधाया झालोंसें, चाल पथ पुढें पाहीं!" ३३

मोरोपंत.

---

## ९ माझे सृष्टीचे शिक्षक.

सृष्टींतील प्रत्येक वस्तूमधून काय काय शिकतां येण्यासारखें आहे हें कवी यांत दर्शवीत आहे.

चाल—भूपती खरे०—

मम शिक्षक असती जगतिं दयाळु अनेक।
सत्शिक्षण देती तेचि मला बहुतेक॥ १
ही शिला शिकविते-हृदय असूं दे थोर।
जरि प्रहार त्यावरि होय असह्य अपार॥ २
हा पवन शिकवितो-स्वैर फीर कोठेंही।
निष्कलंक राहीं-चित्त न ढळूं दे लवही॥ ३
हा वृक्ष शिकवितो-मुदित मनें नित डोलें।
व्यसनीं न त्यजिं-जरि महान शिरिं कोसळलें॥ ४
हा सागर शिकवी-परोपरीनें सत्य।
कीं निश्चल ठेवीं वृत्ति तुझी तूं नित्य॥ ५
हा पर्वत शिकवी-धैर्य धरीं रे पूर्ण।
मग आहे सुलकर हा भव दुस्तर जाण॥ ६
हा चंद्र शिकवितो-प्रशांत शीतल राहीं।
निज शरीर मत्सम करिं न कलंकित कधिंही॥ ७
तारका शिकविती-धरीं ऐक्यता समता।
त्याविणें न वाटे मौज खरी जगिं चित्ता॥ ८
ही भूमि शिकविते-उदारता हृदिं ठेवीं।
निजकृतिनें कवणा विन्मुखता नच दावीं॥ ९
हा मेघ शिकवितो-मुखें सुधामय धारा।
कीं, वर्षी प्रमुदित होइल जनगण सारा॥ १०

ही निशा शिकविते-कपट न शिवुं दे मतिला ।
करिं धारण मानसिं प्रेमळता ती विमला ॥ ११
ही सरिता शिकवी-लोभ धरीं या भुवनीं ।
सकळिकीं सुष्ट, खल भेद न ऐसा मानीं ॥ १२
हा भानु शिकवितो-प्रकाश निज कीर्तीचा ।
पसरवीं असा कीं, स्पर्श न होय तमाचा ॥ १३
हें गगन शिकवितें-सत्पथ सुखद विशाली ।
या नश्वर जगतीं कुणि न कुणाचा वाली ॥ १४
ही चपला शिकवी-क्षणिक भ्रमाचा भास ।
भुलुं नको तयामधिं हरिपदिं लावीं ध्यास ॥ १५
बुडबुडा जलाचा शिकवी-जीवितकाल ।
क्षणभंगुर, बघ तव वाट बघे हा काल ॥ १६
आणीक असति बहु गणाति न होय तयांची ।
विधिनिर्मित वस्तू नीति शिकविती साची ॥ १७
त्यां शिवार करितों प्रणाम कर जोडोनी ।
तद्बोध वसो दृढ मम या अंतःकरणीं. ॥ १८

आनंद कर्वी.

---

## १० मोरोपंताची केकावलि.

'**केकावलि**' या नांवाचें मोरोपंतांचें एक काव्य आहे. मोर या पक्ष्यास मेघाची आवड फार, तेव्हां मोरोपंत आपल्या नांवावरून आपल्यास मोर व परमेश्वरास मेघ कल्पून कवितेंत तसा संबंध वारंवार आणितो. परमेश्वराच्या दयाळूपणाची व उदारत्वाची कल्पना मेघाच्या उदाहरणावरून व भक्ताची कल्पना मोराचे उदाहरणावरून चांगली होईल. या काव्यांत परमेश्वरानें आपणावर कृपा करावी म्हणून मोरोपंत त्यास हाका मारीत आहे. 'केका' म्हणजे मोराचें ओरडणें व 'केकावलि' म्हणजे केकांची पंक्ती-पुष्कळ केका किंवा मोराच्या पुष्कळ हाका, असा अर्थ समजावा.

तुझ्या बहुत शोधिले अघनिधी पदाच्या रजें,
न तें अनृत, वर्णिती बुधजनीं सदाचार जें;
असें सतत ऐकतें, सतत बोलतें, मी च ते-
प्रमाण न म्हणों जरी, उचित माझिया नीचते. १
तसा च्चि उरलों कसा ? पतित मी नसें काय; कीं-
कृपाच्चि सरली, असें हि न घडे जगन्नायकीं !
नसेन दिसलों कसा ? नयन सर्वसाक्षी रवी;
विषाद धरिला म्हणों, न सुरभी विष, क्षीर वी ! २
सदैव नमितां जरी पद, ललाट केलें किणें,
नसे इतर तारिता मज भवत्पदाब्जाविणें;
नता करुनि मुक्त ही म्हणसि, ' मी बुडालों रिणें ! '
अशा तुज न जो भजे मनुज, धिक् तयाचें जिणें ! ३
धना परिजना घरीं तुमचिया उणें कायसें ?
न लाभ, मणिहेमभूपतिस जोडिल्या आयसें,
परि प्रभु हि संग्रहीं सकल वस्तुला ठेविती,
गुणा, न म्हणतां उणाअधिक, आदरें सेविती. ४
अतर्क्य महिमा तुझा, गुण हि फार, बा हें; विधि—
श्रुतिज्ञ हि म्हणे सदा; स्तविल आमुची केविं धी ?
तरी जन यथामति स्तवुनि जाहले सन्मती;
स्तवार्थ तुझिया तुझ्यासम कवी कधीं जन्मती ? ५
गमो मधुर हें विषस्तवन, सेवितां माजवी;
करी मलिन सद्यशोमुख, हलाहला लाजवी;
हरापरिस तूं बरा प्रभुवरा, सदा जो पिशी;
असा रस समर्पि, त्या अमृत आपुलें ओपिशी ! ६
शिवे न तुझिया पदा अदयताख्य दोष क्षण;
प्रभो, चुकतसों तरी करिशि तूं चि संरक्षण;
नसे चि शरणागती घडलि सत्य अद्यापि ती;
रुचे विषय; ज्यां मिळे अमृत, ते न मद्या पिती. ७
न जें प्रिय, सदोष तें; प्रिय, सदोष ही चांगलें;

स्वतोक पितरां रुचे जरि हि कर्दमीं रांगलें;
तुला चि धरि पोटिशीं कशि तदा यशोदा बरें—
जरी मळविशी रजोमलिन-काय तूं अंबरें ?
पिता जरि विटे, विटो; न जननी कुपुत्रीं विटे,
दयामृत रसार्द्र भी न कुलकज्जलें त्या किटे;
प्रसादपट झांकिती परि परामुरुचे थिटे,
म्हणूनि म्हणती भले, न ऋण जन्मदेचें फिटे. ९
प्रभो, शरण आलियावरि नव्हां कधीं वांकडे,
म्हणोनि इतुकें च हें स्वहितकृत्य जीवांकडे;
प्रसाद करितां नसे पळ विलंब, बापा, खरें;
घनांबु न पडे मुखीं उघडिल्याविना पाखरें; १०
म्हणा मज उतावळा, गुण चि घेतला; घाबरें—
असो मन असेंचि, बा भजक बर्हि-मेघा, बरें;
दिसे क्षणिक सर्व हें भरंवसा घडीचा कसें—
धरील मन, आधिनें बहु परिश्रमे चाकसें ! ११
कृतांत-कटकामल-ध्वज जरा दिसों लागली,
पुरःसरगदांसवें झगडतां तनू भागली;
सहाय दुसरा नसे तुजाविणें बळें आगळा,
न हों जरि उतावळा, स्वरिपु कापितो हा गळा. १२
सुसंगति सदा घडो, सुजनवाक्य कानीं पडो,
कलंक मतिचा झडो, विषय सर्वथा नावडो;
सदंघ्रि-कमळीं दडो, मुरडितां हटानें अडो,
वियोग घडतां रडो मन, भवच्चरित्रीं जडो ! १३
न निश्चय कधीं ढळो, कुजन विघ्न-बाधा टळो,
न चित्त भजनीं चळो, मति सदुक्त-मार्गीं वळो;
स्वतत्त्व हृदया कळो, दुरभिमान सारा गळो,
पुन्हा न मन हें मळो, दुरित आत्मबोधें जळो ! १४
दयामृतघना, अहो हरि, वळा मयूराकडे,
रडे शिशु, तयास घे कळवळोनि माता कडे;

असा अतिथि, धार्मिकस्तुतपदा, कदा सांपडे ?
तुम्हां जड भवार्णवीं उतरितां न दासा पडे. १५

मोरोपंत.

---

## ११ भीम आणि दुर्योधन यांचा गदायुद्धाच्या अगोदरचा संवाद.

भीम आणि दुर्योधन दोघेही शेवटच्या गदायुद्धास आरंभ करण्यापूर्वी एकमेकांचीं मागलीं उणीं काढून एकमेकांस रागानें बोलत आहेत.

### आर्या

भीम म्हणे, " रे अधमा, केलें त्वां आणि जें तुझ्या तातें,
चित्तांत आठवावें, पदरीं फळ घ्यावया, कुजाता, तें. १
विष चारिलें, बुडविलें डोहांत करावयासि वध मातें,
स्मर वारणावतीचें जतु-सद्म-छद्म-कर्म अधमा, तें. २
कपट-द्यूतें हरिलें सर्वस्व पुढें करूनि कितवातें,
नेली सभेंत साध्वी, व्हावें शिवतां जिला चकित वातें. ३
त्वां नागवी करविली सुगुणांची प्रीतिहेतु जी वसती,
छळिली परोपरि, खळा अस्मत्सर्वस्व-कीर्ति-जीव सती. ४
ऐशीं अनेक पापें केलीं त्वां, भरत-कुलकलंका रे,
तूं जेविं दुर्गुणांहीं, न असा दशतुंड ही अलंकारें. ५
भीष्मप्रभु शरतल्पीं पडला, दुष्टा, तुझ्याचि पापानें,
त्वां बहु कुळें बुडविलीं, घननादाच्या अशीं न बापानें. ६
गुरु, कर्ण शल्य वधिले, भगदत्तादिक अनेकशत राजे,
मथिले, त्वदनुज हि,म्हणत होते आम्हां रणांत न तरां जे.
जेणें कपटद्यूतें करुनि दिली हे तुला वश कु निखिळा,
मदुरांत पुन्हा परिभव-तापाचा हेतु लाव शकुनि खिळा! ८
क्षम सज्जनच्छळासि च सर्व तुम्ही पाप, अक्षम रणाला,
पांडव न हेतु, तुमच्या हे फिरले ते चि अक्ष मरणाला. ९
उरलासि एक, सोदर गेले तिकडे तुला हि पाठवितों,

तुज देय फळ दिलें किति किति उरलें हें मनांत आठवितों"
कुरुराज म्हणे, " मंदा मळविलें बहुविकत्थनें काय,
हाय म्हणवितो, युद्ध-श्रद्धेसह भंगितो तुझा काय. ११
न्यायें शत्रु मज गदा-युद्धीं जिंकी असा असे कोण ?
तूं महिष तोचि, जें चि न शोण-गदा-शक्ति-दृष्टिचा कोण.
न्यायें मज जिंकाया न समर्थ गदारणीं सुनासीर,
ये भूमींत, वितिलका व्हाया त्या पांडुच्या सुना, सीर! १३
वदलासि दुर्विचेष्टित माझें जें जें खरेंच भीमा तें;
मंदा, न तदेकप्रति-कृत घडलें म्हणुनि लाज, भी मातें! १४
म्यां करुनि तुम्हां वल्कल-धर, दीन सुचिर वनोवन फिरविलें
अज्ञातवास, दास्य हि करवुनि, निजतेज दुःसह मिरविलें. १५
तुज लाविलें स्वतेजें म्यांच कढी, भात, वरण घाटाया,
वांटाया प्राज्य पुरण, पापड पोळ्या प्रभूत लाटाया. १६
माझे, तुझे ही मेले आप्त बहु क्षय समान दोघांचा -
कालें, जैसा घटजें त्या पूर्वापरसरस्वदोघांचा. १७
भाग्यें घडेल जरि, तरि मज परमश्लाघ्य संगरीं पतन,
जतन क्षत्रिय न करिती, जोडिति नाकीं तनुव्ययें वतन १८
अद्यापि मला कोणी धर्मे जिंकी असा असे न गदी,
छद्में वधितां तुमची होइल अपकीर्ति, विष चि ती अगदीं १९
कौंतेया, त्वां शारद-वारिघनापरि वृथा न गर्जावें,
बळ असल्या दावावें, प्रथम विकत्थन समग्र वर्जावें!" २०

मोरोपंत.

---

## १२. मनुष्य तितका एकच आहे.

स्थलांतरानें गंगेतील पावित्र्य बदलत नाहीं, समुद्राची स्थिती बदलत नाहीं, वायूचें वायूपण बदलत नाहीं अगर जलकणांच्या आर्द्र-गुणांत फरक होत नाहीं, हीं उदाहरणें देऊन, कवी मनुष्याबद्दल सिद्धांत स्थापीत करीत आहे कीं, यांचप्रमाणें मनुष्यें कितीही विभक्त

राहिलीं, भांडलीं-तंडलीं, तरी त्यांच्यांतील मानवधर्माचें मूळ तुटत नाहीं, तें कायमच रहाणार; व त्या दृष्टीनें मनुष्य तितका एकच मानला पाहिजे.

अंजनीगीत

मनुष्य तितका एकच आहे।सत्-चित्-सरिता एकच वाहे॥
राहो नाना देशीं राहे । मूळ कसें सुटतें ? ॥ १ ॥
हिमालयाच्या तुंग शिरावरि । गंगोत्रीच्या हिममय पार्श्वीं
प्रयाग-काशी-या देशान्तरिं । गंगा का बदले ? ॥ २ ॥
अमेरिकेच्या फिरे भोंवतीं । स्थिर ध्रुवाच्या बर्फप्रांतीं ।
अथवा खरतर विषुवावरतीं । समुद्र का बदले ? ॥ ३ ॥
हाणी, जुळवी, विखरुनि टाकी।घन मेघांना क्षणें वितळवी
सळसळ पानांची आयकवी । तो का वायु नव्हे ? ॥ ४ ॥
जलराशींचे तुषार उडवी । तरंग चंचळ नाचूं लावी ।
लाटांचा कल्लोळ उसळवी । तो का वायु नव्हे ? ॥ ५ ॥
वेणूंतुन मंजुल रव उठवी । लतांमधें भ्रमरांस गुंगवी ॥
गिरिकुहरांस घुमाया लावी । तो का वायु नव्हे ? ॥ ६ ॥
नरकंठांतिल तारा नादवि । हशा-रज्यांचे शब्द वाजवी ॥
रागरागिणी गाऊं लावी । तो का वायु नव्हे ॥ ७ ॥
म्हातारीला जगभर फिरवी । पाचोळा गगनांत भिरकवी
तरुवर धरणीवरतीं नमवी । तो का वायु नव्हे ? ॥ ८ ॥
सुसाट अथवा संतत वाहो।स्तिमित शांत वा गुंगत राहो
भरो दुमदुमो गगन-कटाहो । वारा तो वारा ॥ ९ ॥
जाती अथवा धर्म मिळेना । राग-द्वेषीं सख्य जुळेना ॥
परि अंतरिंचा तंतु गळेना । मानवधर्माचा ॥ १० ॥
संसारांतील पंथ जमेना । हिताहितांचा मेळ बसेना ॥
परि हृदयींचा सूर बुजेना । मानवधर्माचा ॥ ११ ॥
वेशांचें वैचित्र्य सुटेना । वर्णांचेंही वैर मिटेना ॥
परि अंतरिंचा रव थांबेना । मानवधर्माचा ॥ १२ ॥
बळाबळाचा झगडा चाले । जयापजय ते कलहीं रमले ॥

परि अंतरिचे वेग न विरले । मानवधर्माचे ॥ १३ ॥
जलराशींचे डोंगर उठले । परस्परांवरि अपटुन फुटले ॥
जलकण परि ते लेश न मुकले । आर्द्रगुणा अपुल्या ॥१४॥
नानादेशीं भटकत फिरले । मनुवंशाचे रोपे तुटले ॥
मूळभाव परि नाहीं सुटले । मानवधर्माचे ॥ १५ ॥

वा. ब. पटवर्धन ( वसंत ).

---

## १३ धर्म-भीमांचें दुर्योधनाशीं त्याच्या अंतकाळचें भाषण.

भीम आणि दुर्योधन यांचें गदायुद्ध होऊन दुर्योधन मरणोन्मुख पडल्यावर त्याला भीम खोचून बोलला व त्याचें शीर त्यानें पायानें तुडविलें. दुर्योधनास युवराजपदाचा अभिषेक झालेला होता, यामुळें हें भीमाचें करणें धर्मराजास आवडलें नाहीं. त्यानें भीमाचा निषेध केला, व दुर्योधनाचें समाधान होण्यासारखें तो बोलला. त्या वेळचा हा उतारा आहे.

### आर्या

पांचाळ मुदित झाले, जैसे होतां चि वृत्रहानि सुर,
होय वृकोदर मारुनि कुरुपतितें, जेविं वृत्रहा निसुर, १
दशमुखवधें कपिनिकर, कीं कंसवधें, नृपा, जसा नंद,
सात्त-सुयोधन-हननें होय तसा धर्मराज सानंद ! २
पतितातें भीम म्हणे, 'रे कुवंधमा, कुबुद्धिच्या कंदा,
'गौर्गौः' म्हणोनि, हांसत होतास सतीस तूं च कीं मंदा!
दुःशासनासि सांगुनि करवित होतासि तूं चि कीं नग्ना,
कृष्णा-कपिला केली क्रूरा, त्वां कष्ट-कर्दमीं मग्ना ! ४
त्या कर्माचें घे फळ ! '' ऐसें गर्जोन वामपादानें—
शिर तुडवी ईश्वरसा दे भीम कृतानुरूप वा दानें. ५
'गौर्गौः' म्हणोनि हांसत नाचत होते यथेष्ट जे दुष्ट,
आम्ही तसें, च 'गौर्गौः' म्हणतों, हांसोनि नाचतों तुष्ट ! ६

जिंकाया शत्रूंतें विष, वन्ही, द्यूत, वंचना कांहीं—
निज-बाहु-बळा-वांचुनि आम्हांस उपाय ठाउका नाहीं. ७
वस्त्र सतीचें फेडित होते, छळुनी प्रभूत पापिष्ट !
तीच्या चि तपें झाले हे देवा सर्वभूतपा, पिष्ट ! ८
कृष्णा, धर्मा, विजया, माद्रीसुतहो, समस्त परिसा रे !
'षंढातिल' म्हणत होते ते म्यां वधिले रणांत अरि सारे!
जो 'गौगौः षंढतिल' इत्याद्युपहास करुनियां हांसे,
तो हा दुर्जन, याच्या पडले कंठांत मृत्युचे फांसे !' १०
ऐसें गर्जुनि मस्तक मर्दी चरणें पुन्हाही कोपानें,
तें साहिलें परोपरि पर-पादाक्रमण जेविं सोपानें. ११
त्यासि अजातारि म्हणे, "केली, बा त्वां खरी प्रतिज्ञा ती,
मूर्धाभिषिक्त कीं हा संमत शौर्यें हरी प्रति ज्ञाती. १२
झालासि निपट वश तूं कोपाला उचित काय बापा हें ?
लिंग पदच्युत, भग्नहि, लंघ्य नव्हे; साधुनीतिला पाहें. १३
सद्ब्राह्मणाभिमंत्रित शत-तीर्थजलाभिषिक्त कीं शिर हें;
अर्घ्यार्ह नव्हे काय ग्रहणीं रविमंडळ प्रभाविरहें ? १४
सर्वजन म्हणति धार्मिक भीम, असें यश तुवां न बुडवावें;
चरणें राजोत्तमशिर बहुमत-शतपत्रसें न तुडवावें." १५
वदुनि असें गहिंवरला माहिवर लावूनि बोल भात्रास,
मग जाऊनि जवळ म्हणे पतिता अतितापद-प्रभावास. १६
"बापा सुयोधना, तूं आतां कांहीं करूं नको शोक,
जो कर्म जसें करितो तैसें सुखदुःख भोगितो लोक. १७
बा, बहु अपराध करुनि, बुडवुनियां स्व-पर, बहु बुडालास,
सुमतांतुनि तूं तोया-आंतूनि अलाबुसा उडालास. १८
रणमखहतासि तुज सुख देतिल आदित्य, रुद्र, वसु नाकीं;
मज दुःख चि राजाच्या करितिल सविलाप उद्भव सुना कीं!
गुरु-बंधु-सुत-स्वजनावांचुनि सुखभोग ते नरक सारे;
बा वर्तेल अवीरा-शत-धिक्कृत मज-असा नर कसा रे ?२०
त्या म्यां कशा पहाव्या झाल्या तुमच्या वधू अवीरा ज्या,

ऐवां दुस्तरा मज पराभूति दिली हे सदा नवी, राजा! '२१
यापरि विलाप बहुत चि करिता झाला नृपा, अजातारी,
समजावी मधुपासुनि जो देव करुनि कृपा अजा तारी. २२

मोरोपंत.

---

## १४. लीला

### दिंडी

( अनाथ बालकाश्रमांतील एक पांच वर्षांची मुलगी. )

दिसे मजला हें पुढें गोड मूल ।
पडे कोमेजुनि रम्य तसें फूल ॥
एक निर्णय मनिं होत नसे साच ।
विषय दृष्टीचा द्विविध हा तसाच ॥ १ ॥
जसें वेलीचें दलित गलित फूल ।
बालविधवेचें तसें पतित मूल ॥
दिसति दोन्हीही सारखीं मलूल ।
कृपादृष्टीची कुणिं न घालि झूल ॥ २ ॥
पांच वर्षांची छबकडी सुरेख ।
जणूं त्रिमणीशी हिरकणी च देख ॥
कशी चित्रासारखी उभी राही ।
नांव ठेवाया सोय मुळीं नाहीं ॥ ३ ॥
कुण्या ऋषिच्या यानास अडखळून ॥
पडे निखळुनी जणुं नील पटांतून ॥
आलि खालीं ही चांदणी च एक ।
तरि च इतकी ही चमकते सुरेख ॥ ४ ॥
बाल अवयव रेखींव एवढाले ।
कल्पनेच्या जणुं भ्रमें चित्र हाले ॥
काव्य तरळत जणुं हृदयिं कविजनाचे ।
बाल-सौंदर्य हि असें देहिं नाचे ॥ ५ ॥

बाल-सौंदर्य हि असें देहिं नाचे ।
तरी वाटे हें स्वप्न निर्धनाचें ॥
यास कारण तें पाहतां दिसेची ।
जोड सौंदर्या उदासीनतेची ॥ ६ ॥
किती लीले ! तव वदन उदासीन ।
सांग बाळे ! कां दिसशी अशी दीन ॥
बघावेसें वाटतें जरी त्यास ।
तरी बघतां मन होतसे उदास ॥ ७ ॥
तों च माझ्या लागलें कुणी काना ।
जन्मवार्ता कथि चित्तसमाधाना ॥
बालविधवेनें टाकिली अनाथ ।
मिळाली ती बालिका कंटकांत ॥ ८ ॥
जणूं कळुनी ही जन्मकथा नीच ।
असे तेव्हांपासून ही अशी च ।
किती हंसवावी तरी हंसत नाहीं ।
दृष्टि भूभागीं यापरी सदा ही ॥ ९ ॥

गोविंदाग्रज.

---

## १५ प्रद्युम्नाख्यान.

शिवानीं मदन जाळला, तो कृष्णाचा पुत्र म्हणून रुक्मिणीच्या पोटीं जन्मास आला. त्याच्या हातून असलेला आपला मृत्यु टाळण्याच्या उद्देशानें शंबरासुरनामक दैत्यानें त्यास जन्मतांच पळवून नेऊन समुद्रांत टाकिलें. पुढील कथा या उताऱ्यांत आहे.

### श्लोक

पूर्वीं रुद्र-ललाट-लोचन-शिखि-ज्वाला-मुखीं जो जळे,
तो रुक्मिण्युदरासि ये रतिपती, हें शंबराला कळे।
कीं स्वप्राणहर स्मर प्रगटला. ' जों अप्रगल्भ स्वयें—
तों मारीन ' म्हणे; ' उपेक्षित रिपू देतो अनल्पें भयें.' १

ऐसें चिंतुनि, कामरूप खळ तो पावे पळें द्वारका,
प्रासादांत शिरे, हरी हरिचिया मायाबळें दारका;
ने व्योमीं सहसा अनिर्दश शिशु प्राणक्षया दांडगा,
जैसा कीं मृगशावकास पळवी भक्षावया लांडगा. २

काम, श्रीहरिजात बाळ, वधवे कैसें सपत्ना करीं ?
टाकी झांकुनि नेत्र निर्दय खळें तें रत्न रत्नाकरीं;
तों मीनें नवनीत-पिंड-मृदुल प्रेक्षुनियां भक्षिला,
जाणों, रम्यकरंडकींच सुमणी रत्नाकरें रक्षिला ! ३

दुष्टें नेउनि पुत्रशोक दिधला श्रीरुक्मिणीच्या मना,
झाला खेद महोत्सवांत सहसा त्या द्वारकेच्या जना;
जो देतो बहुतांसि दुःख कुमती, स्वार्थार्थ तो नाडिला,
कामाद्युग्ररिपुत्रयें चि नरका बांधोनियां पाडिला. ४

भक्षावा जलजंतुंनीं म्हणउनी टाकूनि तो अंबुधी-
मध्यें बाळक, शंबर स्वसदना निश्चिंत गेला कुधी.
जो निःशेष न जाहला जरि हर-क्रोधानळें जाळिला,
केला अंबुधिमग्न, दुर्मति म्हणे, 'मृत्यु स्वयें टाळिला!' ५

पसरुनी गुरुजालक धीवरीं; धरियले बहु मीन नदीवरी;
यदुदरीं शिशु.तो झष सांपडे,विधिबळें व्यसनीं सहसा पडे.
झाशांहीं बहु-पीन मीन-निकरीं तो, देखिला जो बरा,
भावें भेटविला तयाचि असुरा राष्ट्राधिपा शंबरा;
तेणें सूदकरीं दिला, मग तिहीं पाकस्थळीं कापिला,
पोटीं बाळ; करंडकांतुनि निघे जैसा मणि स्थापिला ! ७

होती तेथ पतिव्रता रति पतिप्राप्त्यर्थ रम्याकृती,
आच्छादूनि महानसीं करि तदादेशेंचि पाकाप्रती;
मानी पाचकमंडळी स्वगुरुता देऊनि सारी तिला,
कीं तो शंबर मानवे बहु तिच्या पाकाचिया रीतिला. ८

परम कोमल रम्य शरीर ती—
झिजवि, दुर्जनदास्य करी रती;

प्रियपदींच सती धरि भाव, कीं
उचित मृत्यु तदर्थहि पावकीं ! ९

जैसें रूप, तसें चि नाम दुसरें मायावती हें धरी,
शत्रूच्या सदनीं न पाक, तप ती पत्याप्तिसाठीं करी;
सूदांहीं शिशु पोषणार्थ दिधला प्रार्थूनि तीकारणें,
त्याचें रूप विलोकितां चि घडलें तल्लोचना पारणें. १०

मायावतीस शिशु अर्पिति सूपकार;
सांगोनि तत्व, करि नारद सूपकार;
होतां अकल्पित चि तो पति-लाभ, जाया—
पोषी सुखासह तया पतिला भजाया. ११

रक्षी ज्यासि पतिव्रता प्रियतमा मायावती मायसी,
शंभूची अभयोक्ति ही, मग तया चिंता असे कायसी ?
संसाराब्धि-निमग्न जे जन तयां ज्याचीं पदें पारदें,
योगीन्द्रें अवलोकिलें हि करुणालीलालयें नारदें. १२

महामाया माया रतिपतिस दे, जी न उरवी—
अनेका मायांतें, निबिड तिमिरा ज्यापरि रवी;
गदा ही दे, मायाशत-निपुण शत्रु-प्रमथन—
क्रिया-सिध्द्युत्साहा उपजवि, करी युक्तिकथन. १३

उठे काम क्रोधेंकरुनि कलितोद्दामगद या—
रिपूतें माराया कलह करि, कैंची मग दया !
सभेमध्यें होता असुरपति, त्याच्या चि जवळी—
बसे, बोले कार्ष्णि श्रवणकटु, दुष्टास सघळी. १४

स्वाधिक्षेप-विवृद्ध-मन्यु खळ तो दंडाहतव्याळसा,
धांवे, शीघ्र गदा तदा धरि, न जी ही सोत्सवीं साळसा;
कोपानें करि अस्त्र शस्त्र कपटें वेंचूनिया युद्ध तें,
तैसें जें हरिबाळकोन्मुख बळें येणें गजें उद्धतें. १५

काळ-व्याळ,विषाग्निची च धरिली जाणों करीं जीभ, या-
माराया तरवारि वारिदनिभा देवा हि दे जी भया;
शत्रूचें सकिरीट-कुंडल, शिर च्छेदी क्षणें, होय ज्या-

कांहीं न श्रम, कोमळेंहि खुडितां जैसें नखें तोयजा ! १६
जे होते उत्सवा त्या निरखित अमर व्यापुनी अंबरा, 'रे-
दुष्टा, जा दुर्गतीतें;' म्हणति, 'निजपुरा जा प्रभो, शंबरारे!
प्रद्युम्ना, तूं स्मर, स्त्री रति, बहु दिवसां युक्त झाला बरा हो
हा योग स्वाप्तमूर्तोत्सव चि न घटिका यावरी लांब राहो
गेले ते पुष्पवृष्टि, स्तुति करुनि मुखें शंबरान्तोत्सवासी—
पाहूनि प्रेक्षणीयाकृति रतिपतिला, स्त्रीसख स्वर्गवासी;
नेला मायावतीनें मग गगनपथें मन्मथ द्वारकेला.
विद्युन्मेघभ्रमें चि क्षणभरि कुतकी तो सुहृद्वार केला !१८
व्योमापासुनि जेधवां उतरला अंतःपुरीं, देखिला—
दारांनीं प्रभुच्या, क्षण स्वहृदयीं तो श्रीहरी लेखिला !
शोभा, आकृति, वर्ण, वेष, सकळ, भ्रांतिप्रद; स्त्री-सती-
लज्जेनें लपती, प्रभु-प्रतिनिधित्वें तींच त्या दिसती ! १९

पतिप्रतिनिधिप्रति प्रभुवरस्त्रिया पाहती,
तयाचि भंवत्या उभ्या परमकौतुकें राहती;
परस्पर असें तदा वदति, कीं 'कसें यास ये-
मुकुंदनिजरूप, हें हरिस जाणवूं या, सये !' २०

मोरोपंत.

---

## १६ महाराष्ट्रप्रदेश.

कोटा नांवाच्या एका रजपूत संस्थानांतील वकील पेशव्याकडे कांहीं बोलणें करण्याकरितां येत आहे; त्यास येतांना महाराष्ट्रप्रदेश कसा दिसत आहे याचें वर्णन तो आपल्या बरोबरच्या सरदाराजवळ करीत आहे.

### श्लोक

"बघ सख्या ! रमणीय सुदेश हा ।
दिसुन येइ अशा समयीं अहा ! ॥
उगवुनी नुकता मिरवे रवी ।

महि-तला कनकें जणु सारवी ! ॥ १ ॥
इथुन तेथुन शेतमळे किती ।
उठुन भूमिस व्यापुन टाकिती ॥
अजुन कार्तिक मास न संपला ।
म्हणुनि गारच देश दिसे भला ॥ २ ॥
दंव नसे सुकलें अजुनी जरी ।
प्रखर भास्कर ही न करां करी ॥
जमिन हीच धनीण, इची करीं ।
कठिण शेतकरी करि चाकरी ॥ ३ ॥
बसुनियां छपरावरि गोफणी ।
धरुन हांकिति पक्षि-गणां कुणी ॥
क्षणक्षणां करिं गोफण जों फिरे ।
पळति दूर चि बापुडि पांखरें ॥ ४ ॥
कितिक पेटविती जन आगटी ।
जवळ बैसुन शीत निवारिती ॥
हळुहळू पडतो हुरडा मुखीं ।
बसुन सांगति गोष्टि तिथे सुखी ॥ ५ ॥
वय दहा वरुषें शिशु धाकुटे ।
चपळ धांवति घेउन आउतें ॥
कितिक येथ पतीस गुणी स्त्रिया ।
मदत देति पहा तिकडे सख्या ! ॥ ६ ॥
हरभरा, गहुं, बाजरि, जोंधळा ।
पिकुनि गार इथे दिसतो मळा ॥
जमिन देइल धान्य सुखें जर ।
कितिक खाइल मानव हा तर ? ॥ ७ ॥
कितिक जुंफुन मोट जन स्वतः ।
वृषभ सुंदर हांकिति तत्वतां ॥
श्रम गमो वृषभां हलका सुखे ।
करिति गायन सुस्वर हे मुखें ॥ ८ ॥

पसरती निजपक्ष जशीं शिडें ।
उडति घारि नभीं दिसतीं पुढें ॥
नजर कोसभरी दुर पें किती ।
त्वरित शोधुन भक्ष्य हीं काढिती ॥ ९ ॥
धरुन वेष निळे हिरवे असे ।
उडति पक्षि तरूंवरुनी कसे ! ॥
करिति नादित देश मधुस्वरें ।
सुख खरें जगिं भोगिति पांखरें ॥ १० ॥
घरटियांत बसून पिलांसवें ।
दवडिती निशिला अति उत्सवें ॥
उठति जों अरुणोदय जाहला ।
धरिति संतत उद्यम आपुला ॥ ११ ॥
गगन-राज्य अफाट तथा रवी ।
उगवुनी नृपती बहु तोषवी ॥
म्हणुन पक्षि च भाट सुखावले ।
करिति गायन हीं स्तुति भासलें ॥ १२ ॥
पसरलें जरि दाट दिसे धुकें ।
किरण त्यांत परी शिरकूं शकें ॥
खुलति दोन हि एक च होउन ।
दिसति पारद आणाखि दर्पण ॥ १३ ॥
दिसति अस्फुट त्यांतुन डोंगर ।
पसरलीं बहु दाट घनें वर ॥
म्हणति सह्य जया गिरि हा असे ।
सकल पश्चिम व्यापुनियां बसे ॥ १४ ॥
कितिक जाति नभांत निमूळते ।
किति सपाट शिरीं गिरि देख ते ॥
कितिक एक च रांग धरूनियां ।
असति, खिंड दिसे न कुठे तयां ॥ १५ ॥
गरुड तो शिवभूपति यावरी ।

रचुन दुर्ग पहा घरटीं करी ॥
तिथुन घालुन झेंप दिनोदिन ।
लुटित देश करी रिपु-मर्दन ॥ १६ ॥
म्हणुन पूज्य समस्त मराठियां ।
असति डोंगर हे न मिती तयां ॥
इथुन राज्य-नदी उगवूनियां ।
पसरली अरिला करि ती भया ॥ १७ ॥
शिव अचाट अशी करणी करी ।
स्वरिपु जिंकुन थोर यशा वरी ॥
म्हणुन तत्स्मरणार्थ असे भले ।
विजय-दर्शक खांब च रोंविले ॥ १८ ॥
भरभराट नवा च दिना दिना ।
सुखवि राज्य मराठि कसें जनां ॥
अचल बैसुन पाहति हे असे ।
विगत-पक्ष-जटायु-शरीरसे ॥ १९ ॥

वासुदेव वामनशास्त्री खरे.

---

## १७ सीतारामायण.

राम, लक्ष्मण व सीता अरण्यांतून परत आल्यावर चौघां भावांच्या बायका गोष्टी सांगत बसल्या, व सीतेनें अरण्यांत गेल्यापासून परत येईपर्यंतची सर्व कथा त्यांना सांगितली, यामुळें या रामायणास ‘ सीता-रामायण ’ असें नांव कवीनें दिलें आहे.

श्रीजनक-सुता-सीता प्रभृति सुखें भेटल्या स्वसा, जावा,
तत्संवाद वदावा, सज्जन पावुनि महत्व साजावा. १
भरताची मांडवी स्त्री, लक्ष्मणाची हि ऊर्मिळा,
श्रुतकीर्ति रिपुघ्नाची, जगीं यत्प्रीति दुर्मिळा. २
पडुनि गळां गहिंवरल्या, सीतेच्या कन्यका तशा गमल्या;
श्रमल्या विरहें, श्रीनें भेटुनि कुरवाळितां करें शमल्या. ३
म्हणति, ‘ सुदिन भाग्यें आजि हें प्राप्त झालें,

अमृत परमरुग्णा वांचवायासि आलें;
सुभागिनि, चवदा कीं कल्पसे अब्द गेले,
स्व-सम, सखि, निजेनें निष्ठुर स्वप्न केलें. ' ४
आलिंगुनि कुरवाळुनि, हुंगुनि शिर, पुसुनि लोचनें पदरें,
श्री सांगे निजवृत्त, श्रवणीं ज्याच्या उरो नयेचि दरें. ५
भावोजी चित्रकूटीं परतुनि नगरा न्यावया शीघ्र आले,
माझे डोळे तुम्हांतें निरखुनि बहु हे तेधवां तृप्त झाले;
स्वामींच्या पादुकांतें वरुनि, परतले बोध मानूनि मागें,
विप्रांच्या मानिलें हो परम सुख अविघ्नत्व पावोनि यागें. ६
देउनि अभय मुनींतें, आशीर्वाद-प्रसाद जोडून.
अन्याश्रमासि गेले स्वामी तो चित्रकूट सोडून. ७
जैसे वसिष्ठ, गाधिज, जेविं भरद्वाज गुरु, तसे अत्री—
नमिले शमिलेखर्षभ, जे सुधवळ मानसीं जसे पत्री. ८
जेविं भरद्वाज, तसे द्रवले पाहोनि ते हि मामाजी;
झाले अतितर सुखकर, कर जैसे भानुचे हिमामाजी. ९
तद्भार्या अनसूया मजवरि करि सासु-मायसी माया,
स्वकरें चि अळंकारी, आहे प्रेमासि काय सीमा या ? १०
वेणी घालुनि, लोचनीं निजकरें ती लेववी कज्जळ,
लावी चंदन सुव्रता, मज गमे गंगाचि, तें तज्जळ;
गुंफी सत्कुसुमें शिरीं, सुरुचिरा माळा गळां अर्पुनी,
प्रेमें धर्म कथी सुधाधिक-रसें सूक्तें मला तर्पुनी. ११
तैसा चि मल्ललाटीं साध्वी सिंदूर-तिलक जो लावी,
तो हि अगत-सार सदा,कैसी तत्सुकृत-सिद्धि बोलावी१२
तो अंगराज चिरकाल तसा चि ओला,
यत्सौरभीं भ्रमरपंक्ति सदैव लोला;
घ्राणेक्षणांसि म्हणती कुसुमें हि डोला,
वेणी नवीच, न सती-यश शक्य बोला ! १३
उष्णा उटी हिमीं ती, उष्णीं ही सर्वकाळ परम हिमा;
सृष्टी न मत्यतिक्रम करि, साध्वीचा न वदवे चि पर महिमा!

वत्से मांडवि, मद्विवाह-चरित प्रेमें पुसे ती सती,
सांगावी मज लागली निजमुखें सर्वा कथा तीस ती;
आशीर्वाद् बहु प्रसन्न-हृदया दे, मायसी लोभवी,
त्या आर्येंसि, तसें चि हीस हि महावात्सल्य हें शांभवी !
मग तेथुनि, ऊर्मिळे, निघाले प्रभु, जों दंडक-काननीं रिघाले
धरि राक्षस तो शरीर ह्यातें, न च हें, हे नसतां शरी, रहातें.
स्वामिनीं वधुनि तापसारिला, त्या क्षणें सकळ ताप सारिला,
हा विराध सुरमान्य तारिला तुंबरु, प्रबळ-शाप वारिला.
लोपामुद्रापति, श्रीघटजमुनि, जिहीं प्राशिला सिंधु, अन्या-
सांगावी ख्याति काय, त्रिभुवन-महिता सत्तपःसिद्धि-जन्या
प्रेमें मानूनि पुत्रापरि रघुवर हे मानिली हे हि कन्या,
दिव्यें अस्त्रें दिलीं हो, म्हणुनि, 'वरि जयश्री, दुजी कीर्ति, धन्या'
त्यावरि मामाजींचे गृध्रेंद्र सखे, जटायु या नांवें,
स्नेहाब्धि भेटले हो, त्यांचें साधुत्व काय वानावें ? १९
विनयें करितांचि वंदनातें, द्रवले भेटूनि, जेवि नंदनातें;
प्रभु मानिति गेह काननातें, निववि तें बहु देह कां न नातें?
आम्हां ते वदले, "स्व-तात-सदना आलां सुखें या घनीं
वर्ता पंचवटिस्थळीं मुनिनुतीं गोदा-तटीं पावनीं;"
मत्स्वामी विनयें असें विनविती, "बा, हे स्नुषा आपली;
रक्षावी समर्यी, निवो मति इची स्वादर्शनें तापली!"
निववी मज मातासी श्रीमत्त्र्यंबकजटोद्भवा गंगा,
स्मरणें, स्तवनें, स्नानें शुचि करिती विश्वचित्तवागंगा. २२
सांगे भूमिसुता, दशास्य-भगिनी मांसाशनें मातली,
नामें शूर्पणखा, कुबुद्धि, विधवा, नक्तंचरी पातली;
माया-रूपवती प्रभूंसि भुलली, मोहीं स्मरें घातली,
ती त्यांच्या हि गळां पडे, मति तुझी ज्यांच्या पदीं रातली!
'मला आहे स्त्री, हो मदनुजनि-सौमित्र-दयिता,
वधू तूं योग्या त्या, सुमुखि, गुणरूपातिशयिता;'
असें स्वामी तीतें कथिति; हित ती मानुनि, भजा-

म्हणे मातें त्यांनें, तिस म्हणति ते भानु-निभ 'जा'. २४
,त्या आर्यांच्या पदांचा, सुदति, सतत मी दास; तूं काय दासी
होशी? मत्स्वामिनी हो, सुमुखि, भज तया मानदा कायदासी;'
ऐसें जें ऊर्मिळे त्वत्प्रियतम वदला, ये पुन्हा तन्मनातें,
लावूं पाहे प्रभूंशीं, समुचित नसतां सद्यशा, जन्मनातें. २५

प्रभूंतें म्हणे, 'हें पहा आंग, लीला-
वती मी, वरावें मला चांगलीला;'
स्तवी, दाखवी ती, सये, आस्य, काय,
स्वयें तें पहातां न ये हास्य काय?

कृत्यासी क्रुद्धा ती माझ्या मंदें हि केलि गे, हास्यें,
प्रभु देखतां हि धांवे मज खाया भीतिकेलिगेहास्यें. २७
भ्यालें मी, स्वामींनीं 'हूं' म्हणतां क्रोध-मद तिचा मथिला-
लक्ष्मण-भावोजींनीं, केला तो दंड, योग्य जो अशिला. २८

कथूं दुर्दशा ती तिची काय गे! हा-
वदे स्वापराधें, कुधी जाय गेहा;
खरा बंधुला अन्यथा आरडोनी
स्वयें ताप सांगे, करी आ रडोनी. २९

जनस्थान-वाली खर, क्रूरकर्मा,
न पाहे नया, जो विचारी न शर्मा,
स्व-सैन्यासि आज्ञा कुधी दे वधाया,
प्रभू सिद्ध झाले यशें देव धाया. ३०

प्रेमें लक्ष्मणजीसि सांगति रणारंभींच मद्रक्षण,
स्वामी लाविति न द्विषद्दळवधें व्हायासि भद्र क्षण।
हे तार्क्ष्य प्रभु, ते चतुर्दशसहस्र क्रव्यभोक्ते अही।
बाई, देखिलि दूरुनी हि रुधिरें धाली, निवाली, मही! ३१

माया सुवर्ण-मृग, राक्षस त्या खळानें-
जो धाडिला, परमरम्य, विशृंखळानें;
तो वाटला निरखितां मजला धरावा,
न्यावा पुरा, स्वजन सर्व सुखी करावा. ३२

देऊनि चाप भाते, वदल्यें, ' लांबेल मृग, धरा, जाच ! '
ठेवुनि लक्ष्मणजींतें गेले; स्त्रीचा नव्हे बरा जाच ! ३३
पळे मृग, कळे छळ; प्रभु तया शरें ताडिती,
हरूनि असु, काननीं अरिस, बाइ हो पाडती;
तशांत खळ हाक दे प्रभुवर-स्वरासारखी,
खरें चि म्हणती श्रुती मनाहि, जें बरें पारखी. ३४
' हा सीते, हा लक्ष्मणा ! ' या परीची
दीना वाणी ऐकिली म्यां अरीची;
बाई हो, ती मद्विचारासि मोडी,
धैर्या सोडी, शोक चित्तांत जोडी. ३५
वदल्यें मी, ' लक्ष्मणजी, स्वाम्यसुसंरक्षणार्थ धांवा हो-
धांवा हो ! विपदोघीं म्हणतां सर्वस्व, भव्य कां वाहो'? ३६
तों भावोजी वदले, ' आर्यें, हें स्पष्ट राक्षसच्छद्म,
पद्मच्छ-दाक्ष आहे विजय-श्री-नित्य-केलीचें सद्म, ३७
गमलें लक्ष्मणजींचें वच कटु, मधुर हि, असत्य, सत्य हि तें;
त्यांतें वदल्यें वचनें हृदय विदारावयासि अत्यहितें. ३८
गेले लक्ष्मणजी त्यजूनि उटजा जों, तोंचि ओका यती-
तैसा ये दशकंठ, दाखवि तनू जी उग्र तो, काय ती-
सांगावी भयदा, तरी न वदल्यें पावोनि मी कंप, हा !
मंदावो, परि तेज सोडिल निजज्वाला हिमीं कां पहा? ३९
लंघुनि बहु-नग-गहनें, जलनिधि, सोडूनि मरणशंकेला,
लंकेला खळ गेला वेगें घेउनि मला विपंकेला. ४०
स्वामींचा मज न कळे माझा स्वामींसही समाचार,
सोसित होत्यें सर्वे अहितांचे मी महीसमा चार. ४१
सुज्ञाना सरमा, बिभीषण-वधू, विद्या चि माना; कळा-
तत्कन्या त्रिजटा हि, रंजवि, जशी गानाभिधाना कळा;
चिंतीं लक्ष्मणजींसमेत सतत स्वामींस मी, चातकी-
जैसी जीवनदासि, बाइ, तिळ ही तो न द्रवे पातकी ४२
मामाजींचे शतमख सखे धाडिती अन्नपात्र

स्वामीतें मी स्मरत कवळीं तत्प्रिया ग्रासमात्र;
केलें देहावन मुनि-सती-निर्मितें अंगरागें,
चिंती चित्त प्रभु-जय सदा, शत्रुचा भंग रागें. ४३
हा वातभू कुशलवृत्त समग्र सांगे,
दे हर्ष, जेंवि, जवळ स्वकुमार रांगे !
जे मन्मनोरथ महाविगदार्त, पांगे,
झाले समर्थ, अमृतें नुठतील कां गे ? ४४
मज चवथे भावोजी सुगळ मिळाले वनीं, असें कळलें;
टळलें व्यसन, उजळलें यश, मद्धरणेंकरूनि जें मळलें. ४५
मिळालीं उत्साहें बहु कपि-बळें, ऋक्ष-कटकें-
कळे; वाटे, केली मजवरि दया विश्व-घटकें;
खुणेला म्यां चूडामणि निज दिला, 'जा न अटकें'-
म्हणें या; हा भासे जनक चि, वदावें न लटिकें ।४६
जोडी हात मला, निघे पवनभू, खोडी करी हा बळें,
मोडी वृक्ष सुरम्य जे उपवनीं, झोडी अरींचीं बळें;
तोडी मस्तक-लक्ष राक्षस-रणीं, सोडी न एकासही,
थोडी यातुचमू उरे, बहु असृग्गोडी सुखें घे मही ! ४७
माराया कपिला दशास्य असितें घे घोरकर्मा, सये,
प्रार्थी साधु बिभीषण, 'क्षितिपते, हा दूत मारूं नये;'
वैरी पेटवि पुच्छ बाइ, सरमा सांगे तदा अंजली—
केला म्यां ज्वलनासि, कीं, महित जें तद्धी स्तवीं रंजली.
ज्या मत्ता राक्षसांच्या पद
अतिकुतुकें होय हास्या सभा जी,
तीतें, त्यांच्या तयांचा मळ-
माति पतिच्या त्या हि आस्यांस भाजी;
तेजें सर्वांसि घोळी; करि कनक-
पुरी हा कृती वत्स होळी;
याच्या पुच्छा न पोळी दहन,
खळ सये 'हा' म्हणे, हात चोळी. ४९

रक्षू मला करुनियां अरि-हानि रोप,'
स्वामींस सिद्ध सखिहो; करि हा निरोप;
आले महाकपि-चमूसह सागरातें,
घ्याया परायु, शिवसे सहसा गरातें. ५०
स्वामींनीं श्रितशर्मद धर्म, द्या करुनि, सनय आठविला,
त्या ताराबाईचा सुत, अंगद, पूत दूत पाठविला. ५१
धर्मज्ञ, नयज्ञ, कुशळ, ऐसा लोकांत बोलका नाहीं,
परि त्या अरिनें याचा एक हि वरिला न बोल कानांहीं. ५२
वदला, ' घेउनि देवी प्रभुच्या चरणांसि चाल वंदाया,
मंदा, याद जलधिशीं विटतां वांचविल कोण धंदा या ?'
कोपें दुष्ट म्हणे, 'धरा चि!' चवघे बाहुद्वया झोंबले,
तों हा अंगद वत्स जाय गगनीं; क्रव्याद ते लोंबले;
वेगें जाउनि, दूर भव्य भुज या शूर-स्तुतें झाडिले,
झाले पंक धरातळीं सकळ ही, तत्काळ जे पाडिले. ५४
ज्या वृत्रारि-चमू-समूह समरीं दे पाठ वीरा वण—
स्वांगीं जो पविचे प्रहस्त मिरवी, त्या पाठवी रावण,
सेनानी प्रथमाहवींच खपला; घेऊनि सैन्यास हा—
बोले 'पावुनि भंग,हीन कटका देऊनि दैन्या, सहा'. ५५
त्याचा दारुण इंद्रजित्सुत, सये, युद्धांत माया-बळें—
कीशांचीं अतिशोक पावुनि पळें सारीं शमाया बळें,
विस्तारूनि भुजंग-पाश समरीं स्वामींस बांधी, सये,
स्वोत्कर्षें मग उद्धतत्व अरिच्या तेव्हां न कां धींस ये? ५६
केले लक्ष्मणजी हि बद्ध अहिंनीं, मर्मस्थळीं चाविले,
दोघांनीं हि सुनेत्रपद्म, मुलिहो, मूर्च्छाभरें लाविले;
दासींनीं मज पुष्पकीं बसवुनी त्रासावया दाविले,
शोकें मी रडलें बहु, व्यसुचि मत्स्वांतें, सये, भाविले. ५७
मत्संगतिशी त्रिजटा नाशी बोधकरूनि मन्मोहा,
वदलि, 'महाभागे, या मायेनें त्वन्मूर्छा न जन्मो' हा ! ५८
मातें घेऊनि गेल्या फिरुनि उपवनीं राक्षसी नागपाशा—

संपूर्णा यत्प्रसादें करुनि; परि हरी तत्सखा नाग-पाशा;
दोघांचे देह केले स्वकर फिरवुनी स्वस्थ, तत्काळ जाला-
सर्वां साधूंसि मोठा महद, दशमुख जो, ताप तत्काळजाला
तेव्हां तो कुंभकर्णा उठवि अहित, कीं यत्न कांहीं न चाले,
मरुत्स्वामी सानुजन्मे कटकसह पुन्हा संगरा सिद्ध झाले;
भ्याले उग्रा पहातां कपि सकळ, सये, काळसा वाटला गे
प्राण-त्राणा धरावीं त्यजुनि रण तयां सेतुची वाट लागे !
कळेच्या तातानें निपुण कथिलें हें बुजवणें,
फिरावें त्यांहीं, ज्यां स्वजनु पति-कार्यें उजवणें;
धरी सुग्रीवातें, पळवुनि भयें सर्व, परते;
सये बाई, तेव्हां सकळ धरिती गर्व पर ते. ६१
मूर्च्छा जातां हरिती तन्नासा-श्रुति सुकंठभावोजी,
ती त्यांस हि दे समयीं, प्रेमें श्रीनरहरीन भावो जी. ६२
खिजोनि परते अरी, गिळि न चावितांही हरी,
कितेक पळती परी वरुनि कर्ण नासा दरी;
अनर्थ बहु तो करी मळ-वनांत जैसा करी,
गति प्रभु बरोबरी करि तयासि दे ती बरी. ६३
इंद्राजित् पुत्र तद्बुद्धि भेदी, रहा-
स्वस्थ ऐसें वदे, मूढ दे धीर हा;
श्मश्रु हातें पिळी, वीर सारे खिळी,
मोह सेना गिळी खांडि खड्गा विळी. ६४
स्वामी, लक्ष्मणजी, सुकंठ, अवघे शस्त्रव्रजें ताडिले,
शल्यार्ते क्षणदाचरेश्वर-सुतें निःप्राणसे पाडिले;
होता सावध वत्स मारुति सुधी, कीं हा कळातात, मी-
सांगों नेम कसे धरूनि फिरले हस्तीं अलाता तमीं. ६५
मामाजींसम वृद्ध, मान्य सकळां ऋक्षेंद्र हे, औषधी—
आणाया पवनात्मजासि कथिती, पावावया तोष धी;
कैलासाजवळील शृंग गिरिचें वत्से पळें आणिलें,
केलें सर्व विशल्य, निर्व्रण बळ, प्रेमाश्रूंनीं न्हाणिलें. ६६

तो अरि लक्ष्मणजींनीं साधु-बिभीषण-मतें रणीं वधिला.
सखि, काढिला शर-करें हरिच्या कांटाची काळजामधिला
मारावे अरि सर्व आपण रणीं, किंवा मरावें असा-
चित्तामाजि करूनि निश्चय निघे तो दुष्ट, कांपे रसा;
रुद्ध व्याघ्रचि रावण क्षण रणीं, कीशौघ भासे ससा,
पाडी लक्ष्मणजींस शक्ति अरिची, जी स्पष्ट काळस्वसा.६८
हा साधुवत्स आणी ओषधि-शृंगासमेत पुनरपि त्या,
विनवी स्वयशें प्रभुसह,सज्जन-निकरासि,जेविं सुनर पित्या
युद्धीं भूमिवरि प्रभूंसि सुरथीं दिक्कंधरा पाहिलें.
शस्त्राच्या, सखिहो, न तें अनुचित स्वांतें तदा साहिलें।
प्रेमें मातलिनें शतक्रतु-रथीं प्रार्थूनियां वाहिलें.
तेव्हां राक्षस-सैन्य रक्त विपुल क्षोणीतळीं वाहिलें. ७०
होय द्वैरथ युद्ध, रावण-शर स्वामींस ही लागले,
स्वामींचे शर दिङ्मुखास हि, न हे दोघे, सये, भागले;
सप्ताहर्निश निर्निमेष अतुळीं त्या अध्वरीं जागले,
तेव्हां वात, न बाण रुद्ध-गगनीं सूर्यांशुही, वागले. ७१
खंडिलीं शत शिरें पर तो न प्रेत होय, उठलीं परतोन;
ग्लानि लेश हि शिवे न च काया लाधिना च हृदया वचकाया
कुंभज मामाजींनीं केला मंत्रोपदेश समरांत,
उर भेदुनि अरि वधितां, 'जय! जय!' हा शब्द होय अमरांत!

झाली प्रभूत्तम-शिरीं वर-पुष्प-वृष्टी,
स्वर्वाद्यनाद भरि तत्क्षणिं सर्व सृष्टी;
देवांगना करिति हर्षित-बुद्धि नृत्यें,
गंधर्व गाति मधुरस्वर पुण्यकृत्यें ! ७४

स्वामींनीं पाठविला मारुति माझ्चित्त ताप पळवाया,
कळवाया प्रिय, बाई, कीं करि देहा वियोग पळवा या.७५

निरोप म्यां पाठविला, ' दावा चरण-सारसें
वियोग-तापें गमलें मना मरण सारसें ! ' ७६

आज्ञा होय, बिभीषण आले घेऊनि भव्य शिबिकेला,

भेउनि दाखविले ते, यत्स्मरणें प्राप्तभव्य शिबि केला. ७७
स्वामी सर्वज्ञ चि, परि जपती निंदक यशा विटाळाया,
म्यां दिव्य म्हणुनि केलें प्राकृत जनसें, यशा पिटाळाया.
होत्यें मी अग्नि-कुंडीं प्रमुदित-हृदया, जेविं पार्टीर पंकीं,
स्वामींच्या मूर्तिधारी दहन मज,सये,स्थापिता होय अंकीं;
राहे नाथप्रसादें असुख न, निधिनें जेविं रंकत्व रंकीं,
तेव्हां माझ्या न मावे महि-भर सखिहो,मानसीं त्यक्त-शंकी!
तों मामाजी विमानीं बसुनि तरणिसे शक्रसे पातले ख—
ध्यापूनि स्वप्रकाशें स्तविति बहु;तया जोडिती हात लख;
त्यांहीं स्वाराज्य आम्हां निपट गमविलें वंदितां पाय सानें
कीं धावें प्राशितां जें सुख अमृतरसें काय तें पायसानें?
मातें ते वदले, " तुवां उपवनें, तैसींच वत्से, वनें
केलीं पूत; पतिव्रता व्रत सती-सर्वस्व, तत्सेवनें—
भर्ता तारुनि संकटीं कविसभाश्रीसंपदे, वारिला—
विश्वोपद्रव, जाहला तव तपें या कंप देवारिला. ८१

त्वां सूर्यवंश सुयशें, सति धन्य केला,
वंदेह धन्य तुज पावुनि कन्यकेला; "
प्रेमें असा मज दिला बहु मान, लज्जा—
सांगे मदीय नयनांसि पदीं च मज्जा. ८२
विमानीं बैसले स्वामी, मज सादर वाहिलें,
वाहिलें बाइ अंकीं, हें प्रेम कोठें न पाहिलें! ८३

कांहीं स्वामी कांहीं लक्ष्मणजी सांगती कथा सारा;
साराया क्षिप्र पथ, स्वामींचा विरहताप ही सारा. ८४

तीर्थक्षेत्रतपोवनें मुनिजन प्रेमार्द्रधी पाहुनी,
स्वामी या विषया, पुरा, विसरते पुण्याश्रमीं राहुनी;
स्वप्नीं न त्यजिते विरक्ति; नसती चित्तें, सखी हो ढिले,
आले गाय तसे चि, वत्स-भरत-स्नेहींचि हे ओढिले. ८५
भक्त-प्रेम-वश प्रभु प्रिय नसे यांला दुजें काय तीं—
जातीनें शबरी वरी गति जिला भव्या दिली आयती;

बाईहो गुह हा सखा भरतसा जो गृध्र तो तातसा,
यांना प्राप्त असे दयालु नसतां सत्कार हो तो तसा. ८६
मागें शत्रुघ्न, आले कवि भरत महाभाग मेघां समोर;
प्रेमें जें प्रेक्षिति क्षुद्रिकळ कवळिती हा गमे घांस मोर;
श्रीकंठीं बाष्प दाटे, न विजय विळतां ही असा हर्ष वाटे,
जाणों, ग्रीष्मीं तृषार्ता विपुलतर मिळे तें सुधावर्ष वाटे !
श्रीसीता भगिनींतें अर्पी, सांगोनि आशि कथा, रतितें;
प्रभुचें पुण्ययशोमृत हें त सकल, ज्यांत रसिक थारति, तें

मोरोपंत,

---

## १८ सृष्टीची आरती.

मूळ बंगाली मधून डॉ. भांडारकर यांनीं रूपांतर करुन घेतलेली आहे ती "प्रार्थना संगितांत" आहे. सर्व सृष्टी परमेश्वराची आरती करीत आहे असें कल्पून सृष्टींतील विविध गोष्टी या ह्या आरतीचें साहित्य आहेत असें कवी मानीत आहे. हें रूपक रमणीय आहे.

( राग—अल्हैया, ताल—आडताल.)

तुझी आरती करी सकल भूवन ।
देखुनि निर्वृत होती नयन ॥ धृ० ॥
विशाळ पात्र हें गगन । त्यांत दीप अनुक्षण,
शोभती शशी-तपन । हे हृदय-रंजन;
मुक्तामाला जैशा काय । तारका समुदाय,
किती नभा शोभा होय । हे भवभयभंजन,॥ ॥
धूप मलयपवन । निरंतर समीरण,
करी चामरवीजन । हे विश्व-कारण;
सर्व वनें उपवनें । अर्पिती सदा सुमनें,
वाजे भेरी उच्चस्वनें । ऐकती भाविक जे जन २
तुझी आरती करी० ॥

भांडारकर.

# स्पष्टीकरण व टीपा.



## भाग पहिला.

१–१. हेर–याचा नेहमींचा अर्थ गुप्तपणें धाडलेला दूत असा आहे. पण येथें नुस्ता दूत. रुचिरीं द्वारीं–मराठींत आकारान्त विशेषणांशिवाय बाकीच्यांना लिंगादि भेद नाहीं. पण कवितेंत पुष्कळदां सर्व प्रकारचीं विशेषणें विशेष्याच्या लिंगादिकांप्रमाणें फिरतात. ४. नयनगति इ०–पूर्वी ईश्वरासंबंधीं अज्ञान हा पडदा डोळ्यांवर होता, पण आतां तो निघून जाऊन समजण्यास अशक्य असें कांहीं राहात नाहीं.

२–४. स्वैर गती–स्वच्छंद वृत्ती. ५. भर्तृहरि या नांवाचा एक राजा होऊन गेला. हा मोठा विद्वान् व कविही होता. याचे नीतिशतक व वैराग्यशतक हे संस्कृत ग्रंथ प्रसिद्ध आहेत. ७-८. यांत पंचमहाभूतें मनुष्यानें आपलीं दास केलीं असें सांगितलें आहे, हें स्पष्टच आहे. वाफेचें यंत्र वगैरे आग्नि, पाणी इत्यादि कांचे साह्यानें चालतात. १०. ही कविता लिहिली, त्या वेळेपेक्षां सांप्रत मनुष्य विजेपासून फारच जास्त कामें करून घेतो हें सर्वांस माहीत आहेच. ११. रवि चित्रकार केला–रविकिरणांचे योगानें पदार्थांचें हुबेहुब चित्र ( Photograph ) काढतात हें प्रसिद्धच आहे. सुस्वरें गानें वायु तुष्ट करि—एक तंतुवाद्य आहे. तें वाऱ्यावर ठेविल्यानें वाजतें. १७. कल्पतरु–स्वर्गलोकींचा वृक्ष, हा इच्छित पदार्थ देतो. २०. परि तें फळ, इ०–कवीचा भावार्थ असा कीं, व्यास, वाल्मीकि. यांनीं जर भारतरामायणादि ग्रंथ लिहिले नसते, तर रामयुधिष्ठिरादि राजांचें यश पृथ्वीवर पसरलें नसतें.

३–१. पवित्र सृष्टीं—पवित्र रितीनें किंवा स्वच्छ रितीनें; संस्कृत शब्द हेंच कोणी सुवर्णताट, कर्मधारय स० २. महाराष्ट्रभाषा–रंभापर्ण=महाराष्ट्रभाषारूप रंभापर्ण [ केळीचें पान ];

कर्म० समास, सेविजे, अर्पिजे इत्यादि हीं जुनीं कर्मणी रूपें आहेत [ पाहा बाल० व्याक. पु. २, क० १११. ] ७. म्हणे– मी–कवि.

४–२. वीचार––येथें 'वी' असें दीर्घ लिहिलें आहे. कवि कवितेंत ऱ्हस्व–दीर्घ इत्यादींत फेरफार करितात. ३ ऱ्या कवितेंत 'वीषयाचा' येथें तसें च आहे. ४ मत्सरू, दंभभारू–जुन्या मराठींत 'ऊ' व 'ओ' हे प्रथमेचे प्रत्यय होते. ( पाहा, बाल० व्या० पु० २ क० २०० ) ६. हेचि क्रीया इ०–ती, जी, ही, सर्वनामें कवितेंत ते, जे, हे अशीं पुष्कळ वेळां येतात. ८. पुरे ना जनीं लोभ, इ०–जगांतल्या इच्छा तृप्त होत नाहींत म्हणून मन क्षुब्ध होतें, व यामुळें जीव सृष्टीमध्यें पुनः जन्मास येतो. तृष्णा म्हणजे जगिक इच्छा हें पुनर्जन्माचें कारण मानिलें आहे. १३ सगूणीं–साकार ईश्वरास. आपले साधु दोन प्रकारची भक्ति सांगतात; एक निराकार परमेश्वराची, ही मोठे ज्ञानी आहेत त्यांनाच साधते. दुसरी साकार परमेश्वराची, म्हणजे शिव, विष्णु, गणपति अशा देवांच्या मूर्ति करून, ही अज्ञान लोकांकरितां. १४. जनीं बोलण्यासारखें, इ०––याचे दोन अर्थ होतील; एक जनीं म्ह० लोकांनीं तुझ्याबद्दल बोलावें म्हणजे स्तुति करावी असा वाग; दुसरा, जसा बोलतोस तसा जनीं म्ह० लोकांत वाग, म्हणजे बोलांत व कृतींत साम्य असूंदे. १९. द्वैत – द्वेषभाव किंवा दुजाभाव; अथवा वेदान्त मताप्रमाणें ईश्वर व जीव यांचा भिन्नभाव.

५–१ ईषत्प्रफुल्ल–किंचित् फुललेलें. मृदुस्मित–थोडें गालांतल्या गालांत हसणारें. बहु. स० उत्फुल्ल करावें–मनःकुसुम प्रफुल्लित करावें. ५ सुवाचें–सुवाचेनें ( सामान्यरूपीं तृतीया ) ८ करगत–स्वाधीन.

६–हा उतारा सीतास्वयंवरांतलि आहे. यज्ञरक्षणार्थ राम व लक्ष्मण विश्वामित्राबरोबर गेले. त्यांनीं तें कार्य साधल्यावर विश्वामित्र त्यांस घेऊन जनकाचे घरीं स्वयंवराची मौज पाहण्याकरितां व शिवधनुष्य म्हणून जें प्रसिद्ध होतें तें रामास दाखविण्याकरितां घेऊन आला. या उताऱ्यांतील नृप म्हणजे जनकराजा व मुनिराज म्हणजे विश्वामित्र. १. भवतापविमोचन–भवतापाचा विमोचन, सोडविणारा राम. षष्ठी तत्पु० ३. स्वानंद-संभ्रम–स्व म्ह० अंतःकरण याचा आनंद व संभ्रम

म्ह० आश्चर्य यांचा भर. ३. धर्में करूं रक्षणीं-धर्मानें प्रजेचें रक्षण करण्यामध्यें; हा चमत्कारिक समास आहे. कृपा-ईक्षणीं—कृपेनें पाहाणें, हा समास संस्कृताचे रितीनें केला आहे, पण मध्यें संधि केला नाहीं. ४. या श्लोकांतील ताटिका राक्षसी व मारीच व सुबाहु राक्षस यांच्या कथा लोकप्रसिद्धच आहेत. हे राक्षस यज्ञाचा विध्वंस करीत म्हणून यांना रामानें शिक्षा केली. याच मारीच राक्षसानें पुढें राम वनांत असतां सुवर्णहरिणाचें रूप घेऊन रामास फसविलें व रावणास सीतेला चोरून नेण्यास संधि दिली. ५. चाप-शिव-धनुष्य, याची कथा अशी आहे, कीं हें धनुष्य परशुरामानें जनकाचे घरीं ठेविलें होतें. एक वेळ तें सहज घरांत पडलें असतां जवळ सीता बाळपणीं खेळत होती, तिनें त्याचा घोडा केला. हें पाहून जनकानें पण केला• होता कीं, जो हें धनुष्य उचलून सज्ज करील, त्यालाच सीता द्यावी आहिल्या शिला मुक्त केली, इ०—अहिल्या ही गौतमऋषींची स्त्री. ही फार सुंदर व पतिव्रता होती. तिच्या बापानें लग्नसमयीं पण लाविला होता, कीं जो कोणी पृथ्वीप्रदक्षिणा करून येईल; त्यास ती द्यावी. इंद्र या पणाप्रमाणें पृथ्वीप्रदक्षिणेस निघाला. पण गौतमऋषीनें एक धेनु प्रसूत होत असतां तिला प्रदक्षिणा घातली, तेव्हां शास्त्राप्रमाणें ती पृथ्वीप्रदक्षिणा होऊन इंद्र परत येण्यापूर्वी गौतमाचें अहिल्येपाशीं लग्नही झालें, परंतु ह्या गोष्टीमुळें इंद्रास फार वाईट वाटलें. त्यानें कोणत्या तरी उपायानें अहिल्येचें पातिव्रत्य भंगण्याचा निश्चय केला. एक वेळ ऋषि घरीं नाहीं असें पाहून इंद्र त्याच्या रूपानें आला, व बिचाऱ्या अहिल्येस फसविलें. गौतम घरीं येतांच इंद्र मार्जाररूपानें पळत होता, त्याचेवर ऋषीनें झारीनें पाणी ओतलें, यामुळें त्याच्या शरिरास सहस्र छिद्रें पडलीं; व अहिल्येस त्यानें शापानें शिळा बनविलें. पुढें रामाच्या पादस्पर्शानें ती पुनः पूर्ववत् झाली. अशी कथा आहे. ७. विखीशशिमुखी-पूर्ण चंद्रासारखें जिचें मुख आहे अशी; मानीचना आन-नृपाकृति म्हणजे रामाची राजपुत्रास योग्य अशी आकृति याशिवाय दुसरें मानीचना; कौतुकीं-कौतुकानें किंवा 'कौतुकी' असें रामाचें विशेषण, अर्थ, कौतुक वाटण्यासारखा;

तुकी माथा मनीं–मनचे मनांत मान हालवी, म्हणजे संतोष मानी.

७–२. अश्वमेध हा एक यज्ञ आहे. यांत हवनासाठीं घोडा मारितात. तो घोडा श्यामकर्ण म्हणजे सर्व अंग पांढरें व कान काळे असा असावा. हा घोडा प्रथम सर्व पृथ्वीवर हिंडण्यासाठीं सोडतात. त्याला जो शरण येऊन करभार देणार नाहीं; त्याला युद्धांत जिंकावयाचें. अशा रितीनें एक वर्ष दिग्विजय करून मग यज्ञ करावयाचा; असे शंभर यज्ञ केल्यानें इंद्रपद मिळतें, अशी समजूत होती. मेरुसर्षप दृष्टान्तें—मेरुला जशी सर्षप म्ह० मोहरी त्याप्रमाणें. ३. साङ्ग ज्ञान—वेदांचीं अंगें म्हणून कांहीं प्रकरणें आहेत. त्यांच्या सहित वेदांचें ज्ञान. ६. नाम–नांव देखील. कल्पांत—कल्प+अंत, कल्प म्हणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस, तो भरला म्हणजे सर्व सृष्टीचा लय होता. ८. नातळे–न आतळे–स्पर्श करवत नाहीं.

८–२. इंद्रचाप इ०––इंद्रधनुष्यासारखे पण त्याहून उत्तम रंग आहेत म्हणून लाजे. ७. जवळहि असतां मानस—हंस मानससरोबरावर न जातां येथेंच राहतात. ९. विजेसहित—वीज ही मेघाची स्त्री असें कवि समजतात. ११ चंचल–पल्लव=चंचल––हालणारे आहेत पल्लव ज्याचे, बहु० समा०

९–३. अरिमित्रांची विचारणा करावी, म्हणजे शत्रु कोण, मित्र कोण हें नीट पहावें. ६. उपाधींस कंटाळला–ज्याचें मन संसारानें त्रासलेलें आहे असा. विचार–ईश्वराचे विचार. ८. कार्यकर्ते–फार हुशार लोक, यांना नेहमीं दूरची कामगिरी सांगावी, असा अर्थ. ९. धक्के चपेटे सोसून–जगाच्या सुखदुःखांचा चांगला अनुभव घेऊन. १२. जी गोष्ट खुणेनें सांगावयाची, ती बोलूं नये, जी नुस्ती बोलावयाची, ती लिहूं नये, जी लिहावयाची ती तोंडानें सांगूं नये.

१०–१. चौगुणीनें–चौपटीनें, चंद्रास सोळा कळा असतात व नळाला त्यांचे चौपट म्हणजे चौसष्ट कळा माहीत होत्या. २. गंगेसि भंग––गंगेच्या भरतीस भंग असें म्हणतात. ३. वाजीचें मन जाणता—घोडा स्वाधीन ठेवणारा, अश्वपरीक्षक. ४. साङ्गनाहे तो कुसुमचाप इ०—साङ्ग=स+अंग=ज्याला अंग आहे असा.–कुसु-

मचाप [ मदन ], यास शंकरानें जाळल्यावर त्याचें शरीर नाहींसें झालें म्हणून तो साङ्ग नाहे असें म्हटलें.मदनास अनङ्ग असें नांव आहे. तुल्यरुप–सारखा. ५. वरि वरि=पुनः पुन्हां. ६. धाले धनीं इ०–नळाचें पुढील [ पुढें आलेले ] याचक धनीं म्हणजे धनांनीं धाले म्ह० तृप्त झाले, किती तृप्त झाले तर, ' येतां फिरोनी समुदाय इ०'– म्हणजे मागून जे आणखी याचक आले, त्यांस त्यानींच धन देऊन तृप्त केले.

११–१. कविजांबर=कविजा=देवयानी, तिचें अंबर–वस्त्र. तत्परिहितात्मवास–तिनें परिहित म्ह० नेसलेलें आपलें वस्त्र २. समुदाचार-लोप–चांगल्या आचाराचा लोप. ४. बंदी—शुक्राचार्याचें नांव कवि असें होतें. म्हणून त्यास शर्मिष्ठा ' बंदी ' म्हणजे स्तुतिपाठक म्हणते. ७. मी तों– मी तर सर्वसेव्यदात्याचीसेव्य म्हणजे सेवन करण्यास योग्य असें सर्व देणाराची–मुलगी आहे.

१२–हें वर्णन एका अमेरिकन मुलीचें म्हणून कवीनें केलें आहे. परंतु हें साधारणपणें कोणच्याही देशातील एका लहान मुलीचें वर्णन म्हणून म्हणतां येईल. ३.तयाप्रति=नेत्रांप्रती. लोल=चंचल. ४.नतिमान अग्र=अणकुचीदार टोंक. आर्यान्वयोद्भव=( आर्य+अन्वय+उद्भव ) थोरकुलांत जन्मलेली. ७ अव्याजता=अंतःकरणाचा निर्मळपणा.

**अन्वय**—ज्याचें हें नेत्र सुंदर चारुतेचें अग्र नतिमान [ अपूर्व ] सारल्य मज अपूर्व दिसे, [ असें ] हिचें नासिक जगाला सोत्कंठ म्हणतें ' [ ही ] रम्य बाला खरोखर आर्यान्वयोद्भव [ आहे. ] '

**अर्थ**—ज्याचा हा नेत्रांना सुंदर दिसणारा, गमतीचा ( मौजेचा ) शेवटीं अणकुचीदार झालेला सरळपणा मला अपूर्व ( विशेष प्रकारचा–क्वचित् आढळणारा असा ) दिसत आहे, असें हिचें नासिक जगाला ( सर्वांना ) मोठ्या उत्कंठेनें सांगतें कीं ही मुलगी खरोखरीच आर्य वंशांत ( श्रेष्ठ कुळांत ) उत्पन्न झाली आहे. असा नाकाचा सरळपणा उत्तम कुळाशिवाय इतरत्र सांपडणार नाहीं. अथवा,आर्य लोकांचा वंश ( race ) याचें नाक अणकुचीदार सरळ असणें हें लक्षणच सांगितलेलें आहे. ही एक आर्यवंशाची दुसरे कोठे न सांपडणारी खूण सांगतात.

१३–२. ' जें शास्त्र०– इत्यादि–रामशास्त्री यांचें काम शास्त्रार्थ देण्याचे होतें. ' ऐसें अकर्म–तुमच्यासारख्यास देहान्त प्रायश्चित्त सांगणें हें अ–कर्म–वाईट कर्म, न आवडणारें काम.

१४–२. समकरुणेचीं–सारख्या दयेचीं, ईश्वराची दृष्टि सर्वांवर समान असते. ४. ' प्रवृत्तिविषयीं०––लोकांचीं मनें जरी संसाराकडे लागलेलीं असलीं तरी; प्रवृत्ति म्ह० संसार.

१५–२. डोंबल–डोकें [ तिरस्कारानें हा शब्द उपयोगितात. ] ६. सुधें सरळ. मानवी–मनुष्य प्राणी.

१६–७. हा उतारा पांचव्या उताऱ्याची पुरवणीच आहे. ३. ती भूमीसि इ०––या श्लोकांत सीता भूमी, शेष, कूर्म इत्यदिकांस रामाला जड धनुष्य उचलण्यास साह्य करण्याविषयीं विनवीत आहे. उमानीं- उचलून धर. पृष्ठीसीं=पाठीवर, कूर्माच्या पाठींवर पृथ्वी आहे अशी समजूत आहे; म्हणून सीता कूर्मास म्हणते, कीं तूं धनुष्य पाठी-वर धर. ४. पुरश्चरण-मोठा जप. उद्यापन-व्रत पुरें करणें ९. श्लोकाचा भाव असाः––रामानें धनुष्य वर उचललें, त्यावेळीं ऋषीलाही वर उचललें, म्हणजे त्यास इतका अभिमान वाटला. व ' हा पोर धनुष्य काय उचलतो, ' हा राजांचा संशय आणि रामाच्यानें धनुष्य उचलेल कीं नाहीं हा जनकाचा संशय, उडविला; धनुष्याच्या दोरीबरोबर सीतेचें चित्तही ओढलें, परशुरामासारख्याचा गर्व हरण केला, व सर्व धनुभृत् म्हणजे वीर यांना त्यांच्या आकृति टाकावयास लाविलें, म्हणजे त्यांनीं एवढा वेळ ज्या वर माना केल्या होत्या; त्या लज्जेनें खालीं घातल्या. १०. सर्वे भुप=सर्वें हें ' सर्व ' याचें संस्कृतामधील बहुवचन. भुप–यांतील ' भू ' दीर्घ असून छंद जुळविण्याकरितां ऱ्हस्व घातला आहे; असाच पांचव्या श्लोकांतही घातला आहे.

१७–१. जनमेजय=परीक्षिताचा पुत्र व अर्जुनाचा पणतू; ह्याला सर्व भारती कथा वैशंपायन नामक ऋषीनें सांगितल्या. २. दढतरे–प्रतिज्ञेचें विशेषण; दृढतरा–अत्यंत दृढ अशी, याचें सामान्यरूप. ३. असे गर्व तो ही इ०–अर्जुनाच्या मनांत गर्व

होता कीं आपण फार पराक्रमी, आपणांस कोण जिंकील? श्लोक ६ वा पहा. वामनावतारीं प्रभूंनीं बळीचा गर्व हरण केला होता, म्हणून येथेंही वामन हें नांव घातलें आहे. ५. सव्य-साची—सव्य—डावा, साच—बाण जोडणें; अर्जुनास दोन्ही हातांनीं सारखेंच शरसंधान करितां येत असे, म्हणून त्यास 'सव्यसाची' असें नांव होतें. अर्जुनाचीं दहा नांवें खालच्या श्लोकांत आहेत:—— अर्जुनः फाल्गुनो जिष्णुः किरिटी श्वेतवाहनः। बीभत्सुर्विजयी कृष्णः सव्यसाची धनंजयः'. ६. काळखंज—काळखंज नांवाचा राक्षस. ८. हुतवहार्पितखांडवानें—हुतवह म्ह० अग्नि, त्याला अर्पित आहे खांडव (वन) ज्यानें; बहु. स०. १७. मारावें इ०——भीष्म म्हणतो कीं, 'तुझ्या मनांत जर मला मारावयाचें असेल, तर माझें रक्षण कोण करणार आहे? पण तसें तुझ्या मनांत नाहीं; तर मी जो तुझा भक्त त्याची प्रतिज्ञा तुला खरी करावयाची होती, म्हणून तूं शस्त्र धारण केलें आहेस, मला मारण्यासाठीं नव्हे.'

१८—१. संसार—गज—केसरी—संसाररूप हत्तीचा सिंह. शौरी—कृष्ण; 'शूर' हें कृष्णाच्या वंशाचें नांव होतें, त्यावरून त्यास शौरी म्हणत. १८. आर्त पुरो पांडूची—पांडवांनीं राजसूय यज्ञ करावा असा त्यांचा स्वर्गस्थ पिता पांडु यानें त्यांस निरोप धाडिला होता. २२. भैरवाकार दृष्टी—दृष्टीनें. येथें केवळ सामान्यरूपानें विभक्ति दाखविली आहे. (बाल० व्या. पु. २ क. २०० (१) पाहा.) २४. 'जरेनें सांधिला. इ०——जरासंध याच्या दोन आया होत्या. प्रत्येकीच्या पोटीं याचें उभें अर्धे जन्मास आलें. जरा म्हणून कोणी राक्षसी होती, तिनें तीं शकलें सांधून असा वर दिला कीं, हा सांधा जसा जुळविला आहे तसाच सोडविला तर मात्र जरासंध मरेल. हा सांधा उखळण्याचा संकेत कृष्णानें भीमास दाखविला.

१९—१. कैटभ—कृष्णानें मारलेला एक दैत्य. २. रथचरणपाणी, रथचरण=चक्र. ३. लोक—भयकारक——लोकांना भय वाटण्यासारखा 'भव' अशुद्ध 'भय' शुद्ध. 'आश्चर्य टाका'—आश्चर्य सोडून द्या. असें म्हणण्याचें कारण पुढील श्लोकांत आहे. ६. खळ—दंड—पाणी—

खलाला दंड करणारे आहेत पाणी म्ह० हात ज्याचे असा; बहु. स०. ८. 'कर्णहीन नयनें' इ० अशी समजूत आहे कीं सर्पांस कर्ण नाहींत. तो ऐकण्याचें काम डोळ्यांनींच करितो. हल्लींच्या शोधाप्रमाणें सर्पाला ऐकण्याचें इंद्रियच नाहीं. २०. दुःशब्द-अभद्र, वाईट असे शब्द. २१. जीर्ण-तृणाचें विशेषण.

२०-१. कवण्याबोलें-कोणच्या शब्दांनीं. २. पक्षिकुलें-पक्षांचे समुदाय. ३. हा गुलाब०--हा गुलाब फुलला, त्यामुळें बागेंत सुंदरता (ये). मधुकर-भुंगे.

२१-१. माधवी कुंज--उन्हाळ्याकरितां माधवी वेलाचे कुंज-मंडप. ३ हरिखुनियां-संतोषून. अल्प पुष्पहीं०-लहान फूलसुद्धां आपल्या पेल्यांत येणारे दंवाचे थेंब खालीं टाकून आपल्या इतर भावंडांना देतें.

२२-४. शस्त्रजवन्हि--शस्त्रांच्या आपटण्यानें उत्पन्न झालेले अग्नि. ५. तुमुल-आवह--मोठें, भयंकर युद्ध. १०. शरभ हा एक कल्पित पशु असून तो सिंहास मारितो असें मानतात ११. न आटे-हार गेला नाहीं. १२. मूर्तवात-मूर्तिमंत वारा. १३. सुषेण, दीर्घलोचन, कुंड, हीं कौरववीरांचीं नांवें आहेत.

२३-१. 'कोठें जातां' इ०--मनुष्य उद्योगास निघालें म्हणजे त्यास कोठायूं नये, ही समजूत सर्व प्रसिद्धच आहे. २. हरिणापरिस-हरिणास गीत म्ह० गाणें आवडतें अशी समजूत आहे. ३. शरणागतभयशमन-शरण आलेल्याचें भय नाहींसें करणारा. ४. तत् शुभ दैव म्हणजे चांगलें दैव हाच कोणी अनुकूल समीर म्ह० वारा, त्याच्या योगानें करुणेचा मेघ जो प्रभू तो त्याकडे वळला. ६. 'सागर फुटतां' इ० सागरच फुटला तर सिकतासेतूचें म्ह० वाळूच्या बांधाचें त्यापुढें काय चालेल १०. रुक्मिणीचें चित्त-" मी देवीयात्रेंत येऊन तुला घेऊन जाईन असें आश्वासन कृष्णानें रुक्मिणीस दिलें असतांही तिचें चित्त अधीर झालें होतें. (भाग २ उतारा १९ यांतील कथासंबंध पाहा.) त्याप्रमाणें तुझ्या सदय मनांत मला योग्य समयीं पावावें असें जरी असलें, तरी माझें मन अधीर झालेलें आहे. ११.

पुराणपुरुष–परमेश्वरास म्हणतात; पुराण–जुना, म्हातारा; म्हणून भागलास, असें म्हटलें. १२. 'उगाळितां कोळसा' इ०—मी कोळशासारखा बाहेर जसा तसाच आंत आहें. कोळसा आंत कसा आहे, हें पाहण्यासाठीं कोणी उगाळूं लागल्यास उगाच हात मात्र दमतील. १३. धनवंत कण कसा वेंची–धनवंत झाला तरी तो धनाचा एक कणही टाकीत नाहीं. तेव्हां मला ठेवायला जागा नाहीं म्हणून तुम्ही टाकून कसें देतां ? जागा दुसरी तयार करा. १४. चारीही मुक्ती–सलोकता, समीपता, सरूपता व सायुज्यता अशा चार मुक्ति आहेत. १५. 'भेटि बहु दिसां' इ०—बारा वर्षांत कोणाची भेट नसल्यास प्रथमतः शिवालयांत भेटावें असें शास्त्र आहे. १८ तूं जर मला पापाचें बीज, म्हणजे रुजविण्यासाठीं बीं म्हणून जतन करून ठेविलें असें म्हणावें, तर तुझें नांव माझ्या तोंडांत कसें येतें ? कारण नांव तोंडांत आलें तर मुक्ति मिळालीच पाहिजे, असा अर्थ.

२४—१. शब्द-सृष्टि=भाषा, वाङ्मय, सारस्वत. ४. वैरागार किंवा वैरागर=खाण. १२. नाना–धाटी–मुद्रा–छंद=नानाप्रकारचे कवितांचे प्रकार, रचना, वृत्तें वगैरे ज्यांत आहेत असे प्रबंध म्हणजे काव्यें. २३. सरोवर=हा शब्द संस्कृताप्रमाणें येथें पुल्लिंगी घातला आहे.

२५—८. उभविलें–उभें केलें. ९. कासारांत–सरोवरांत.

२६—७. चातक नांवाचा एक काल्पनिक पक्षी आहे. याच्या मानेची रचना अशी आहे कीं, तो तोंड वर करून ठेवील तरच त्यास मेघापासून पडणारे जलबिंदु मिळतील. ८. मोरास मेघ फार आवडतो; तिकडे या श्लोकाचा संबंध आहे. ९. मुकुटाला मोराचीं पिसें लावतात,हें प्रसिद्धच आहे. १४. वनांतरीं वन अंतर दुसरें वन; संस्कृत समासांत 'अंतर' हा शब्द 'अन्य' या अर्थी येतो. १५ एक कावळा तोंडीं मांसखंड घेऊन झाडावर बसला असतां खालून सिंह चालला; तो आपल्या मांसखंडाकडे पहात आहे असें कावळ्यास वाटतें, अशी कल्पना करून कवी कावळ्यास म्हणत आहे. १६. 'जो (जो नाद, शब्द) ऐकून मत्तहि करी भिउनि पळती, त्या नादातें तो पामर, क्षणभरि (तरि) वसा करील ?' असा अन्वय.

२७.—हें पद 'प्रार्थना संगीतांत' आहे. पण त्यांत व यांत बराच पाठभेद आहे. हें कवि वामन आबाजी मोडक यांनीं मागाहून सुधारलेल्या हस्तलिखित प्रतीवरून घेतलें आहे. १. आपुलें नातें=एकाच परमेश्वराचीं बालकें असल्यामुळें असलेलें बहिण-भावंडांचें नातें. २. नयनीति=न्याय व नीती. असदाचरण=खोटें दांभिक आचरण. जनशास्ता-विभु अगर धर्मनयनेता. ( अन्वय ) विभू समस्तां वंद्य आणि भक्तराज असा धर्मनयनेता निर्मितो. ३.जिन=जैन धर्मसंस्थापक. शंकर=शंकराचार्य. मूशा-ईशा=मोझेस् आणि जीझस् ( येशू ), जरदुश्त-पारशी धर्मसंस्थापक.

---

# भाग दुसरा.



१—१. जगदंड-जगत्+अंड=ब्रह्मांड. २. चर्म-चक्षु=शारीरिक डोळे; दुसरे ज्ञानचक्षू म्ह० ज्ञानरूपी नेत्र. ' मनोहरा ' व 'साधारणा' विशेषणें विशेष्याचे लिंगाप्रमाणें फिरलीं आहेत. ३. किन्न-राद्यपरिजनगण=यक्ष, गंधर्व, किन्नर, इ० हे देवांचे परिजन म्हणजे चाकर आहेत. हे देवांचीं अनेक कामें करीत अस-तात; त्यांच्या मनोरंजनासाठीं गायनवादनादिक करितात. त्यासि —परिजनगणास. 'तें' याचें दर्शक जें सांगावयाचें तें. ४. याचीं=प्रार्थना करीं. ५. दूत=सूर्याचे अगोदर थोडा वेळ उगवतो म्हणून शुक्र हा सूर्याचा दूत. ६. अंतरात्मा-अंतर=हृदय, आत्मा=सर्वांचे हृदयांत असणारा, परमेश्वर. ७ चंद्र रवीच्या घराला अमावास्येस येतो. ९. पंच द्रव्यें=जुनी समजूत अशी होती कीं, पृथ्वी, आप ( पाणी ), तेज, वायु आणि आकाश ( पोकळी ) हीं पंचमहाभूतें, त्यांपासून जगांतले सर्व पदार्थ बनले हल्लींच्या शास्त्रांवरून मुख्य तत्वें सुमारें साठ मानिलीं आहेत; व पूर्वीं मानिलेलीं पंचमहाभूतें खरीं नाहींत. ज्यांच्या संयोगें षड्ऋतु सुखद होती—ज्या पंचमहाभूतांचा उत्तम मेळ बनल्यानें वर्षांचे जे सहा ऋतू ते सुखकारक होतात. ११. श्रवण-रंध्र-विहार=

श्रवणरूपी रंध्रांत विहार करणारे. १२. सत्पक्ष-ज्याचे पंख सुंदर आहेत, असे-बहु. स.

२-४. दहिवर तोयें-दहिवराचे पाण्यानें. ८. वैतालिक-भाट. १०. तरुवसनावृत्त-तरु हींच जणु काय वस्त्रें तीं अंगावर घेतलेलें. तुंग-उंच.

३-४. औदासीन्य-उदासीनपणा; नावड. ६. ' अनघा मन घालुनियां ' इ० = तुं अनघा म्ह० पुण्ययुक्त पदार्थांत मन घालून अतिपूर्वक म्ह० मोठ्या प्रयत्नानें, पहिल्या चरणांत सांगितलेले पदार्थ म्ह० गोष्टी साध. १०. वचीं = वचांवर ( सदा विश्वास धरीं ). ११. ' पुरुषार्थाचें साधन ' इ० शरीर हें धनाप्रमाणेंच पुरुषार्थ म्हणजे पराक्रम करण्याचें साधन आहे. १३. ' आपलें शरीर जें सात विती आहे, तें अपकार सोसून सहा विती होत नाहीं, अथवा न सोसून आठ विती होत नाहीं. १५. व्यसनीं सहाय होऊनि इ०-जो स्वकीयांना संकटांत सहाय्य होऊन परासु होतो म्हणजे मरतो, तो इतका पुण्यवान कीं त्यास स्वर्गीं देव मान देतात. २०. त्याच्या कु दृष्टि-पातें = वाईट लोकांच्या दृष्टीनें ( दृष्ट पडून ) तेजस्वी अशीं पुरुषरत्नें उलतात म्हणजे फुटतात.

४-२. कपि-कटक-सिंधु-उद्गत = कपींचें प्रचंड कटक हाच कोणी लंकेच्या उत्तरेकडचा सिंधू त्यांतून उद्गत म्ह० निघालेला. ३. भू-देवीनें वेणी ओढिली-बायका भांडूं लागल्या म्हणजे एकमेकींचे केस ओढतात. पृथ्वी-सीतेची आई, इकडे यांत संबंध आहे. ५ प्रभु-प्रताप-असित-पथ = राक्षसरूप अरण्य जाळावयाचें, मग जलधिरूप तृण कोण जाळतो, म्हणून प्रभूचा जो प्रताप-अग्नि तो वरच्या वर जसा काय समुद्ररूप गवताचे शेंडे जाळीत गेला. त्याचा जो काळा मार्ग तो सेतू असा भाव. ७. महा-सुधी = मोठा बुद्धिमान् असा सेतू रचणारा नळ नांवाचा वानर.

५-१. अणि = आणि. कवितेंत " आणि " " व " या अव्ययांचा उपयोग केलेला बरा दिसत नाहीं म्हणून तो सहसा करीतही नाहींत. येथेंही तो शब्द टाकला असता, तर बरें झालें असतें.

६–२. जें कांहीं स्वर्द्रुसुम–जो कल्पवृक्ष तोही देण्यास अक्षम म्ह० अशक्त, तें कर्णाचे तोंड देऊं म्हणतें. ६, कूप देशाला = विहिरीच्या प्रदेशास म्ह० विहिरीवर. १०. ' विष्णुहि म्हणेल कीं, रमेला म्हणजे आपल्या बायकोला, शोकद असला तरी यशस्वी असा पुत्र व्हावा. ' ११. स्ववधेच्छु धनंजय = आपल्या वधाची प्रतिज्ञा ज्यानें केली असा अर्जुन. १२. ऐसा स्वप्न = संस्कृतांत ' स्वप्न ' शब्द पुल्लिंगी आहे, तसाच त्याचा उपयोग येथें केला आहे. १३. ' द्विज-काम-पूर्ति-पर्वी, ' इ० = कर्णाचा रोजचा मंत्र-जप झाल्यावर तो जे ब्राह्मण आले असतील त्यांच्या इच्छा पूर्ण करी; येथें तें पर्व म्ह० नियमित वेळ. १४. तुजाचि पुढें ' दे ' हें उच्चारितां कवि न भी; कारण कोणी निराश होतच नाहीं. १९. स्व-जीवनहेतु सरसू–दान = आपल्या जीवनाचें, प्राणरूपी जें पाणी त्याचें कारण असें जें सरस म्ह० सरोवर त्याचें दान. २०. न्यायव्रत-वर्ती = न्याय-रूप व्रतानें वर्तणारा. २२ ' ही माझी शक्तिरूप कृत्या व्याली म्ह० सर्पिणी व अशनि म्ह० वज्र यांची शक्ति व त्यांच्या अनेक-विध लीला दाखविते.

७–१. वाम-बाहु-सुरता = डाव्या हातास चिकटून बसलेली. वल्कलांबर-जटा-अभिरामा = वल्कलरूपी वस्त्रें व जटा यांच्या योगानें अभिराम म्ह० सुंदर. ६. ' तों माउल्या तिघिहि ' इ०— कैकयीनें जरी हट्ट धरून रामास वनास धाडिलें तरी दशरथ मृत झाल्यावर व भरतानें तिचा निषेध केल्यानंतर तिला पश्चात्ताप झाला होता, व यामुळें या प्रसंगीं तीही बरोबर आली होती. ७. सूप-राम = सु-उप-राम = शेवटची शांती, किंवा मरण. ९. ' देखतां सुरवरांस ' इ० = रावणादिकांच्या वधार्थ रामानें दक्षिणारण्यांत जावें अशी देवांची खटपट होती. १४. पाहे वसिष्ठ-मुनि वक्त्र-सरोरुहातें ' इ० = रामानें वसिष्ठाकडे पाहून त्यास भरताला अव-तारकथा सांगून त्याचें समाधान करण्यास सुचविलें. १५. गुप्त-अवतार-चरित्र जें कोणास ठाऊक नव्हतें असें राम-अवताराचें चरित्र–राम पुढें अरण्यांत जाऊन काय करणार वगैरे. २१. तव-पद-अंबुज-

लाभ-कामी = तुझ्या पदकमलाचा लाभ व्हावा अशी इच्छा करणारा.

८-१. ' जें ब्रह्मलिखित. ' इ०-कवी म्हणतो कीं यमानें ब्रह्मलिखित म्हणजे सत्यवानाच्या कपाळावरचा लेख बरोबर वाचला नाहीं; वाचला असता तर त्याला एव्हां मरण नाहीं असें त्यास समजून त्यानें त्यास नेलें नसतें. २. ' स्नेह ऋण ' इ० नवरा मरेपर्यंत सावित्री पतीची ऋणी होती. पुढच्या गोष्टी तिचे हातांतल्या नव्हत्या. ४. ' सन्मित्र-इ० = सत् म्ह० साधूचें मित्र संकटीं पडत नाहीं. दुसऱ्या सर्वांचें मित्र संकटांत पडतें. येथें ' मित्र ' शब्द संस्कृताप्रमाणें नपुंसकलिंगी योजिला आहे.

१०-२. हा शूर दूर ओ सर=हा असा शूर व तेजस्वी आहे कीं तो महाप्रभू जो रवी त्याला ' दूर ' म्हणणार, त्याचे हाकेस हाक देणार व त्याला ' सर ' म्हणणार. ' महा-प्रभा-बहु-मोठी प्रभा धारण करणारा. हार विलासि जनेंसा-विलासि-जनानें जसा आपल्या गळ्यांतील हार देऊन टाकावा, त्याप्रमाणें. ४. श्रित-सुहृद्-अनवन-करून— आपले आश्रित असे जे आप्त त्यांचें अनवन म्हणजे अरक्षण करून म्हणजे रक्षण न करून. ६. देवापगा विलाप—देवांची अपगा म्ह० गंगानदी ही भीष्माची आई; तेव्हां तिला शोक होईल हें उघड आहे. ९. हारें-हत-इभ—सिंहानें मारलेला हत्ती. ११. ससाध्वस—भ्यालेला; हें ससा याचें विशे०. १२. दर-रक्त-चक्षु—भयकारक असे लाल डोळे १३. त्या प्रभुनें—शंकरानें.

११-२. नीर—पाणी. ३ मोर-मुगुट बन्सीवाल्यापरि-मोराचे पिसांचा मुगुट असलेला, व हातांत पावा असलेला श्रीकृष्ण, त्याप्रमाणें. ४. समाधान हाच परीस, तो दुःखरूप लोहास लावतांच त्या दुःखाचें सुखरूप सोनें होतें. परिसाचा दगड लोखंडास लाविल्यास लोखंडाचें सोनें होतें, अशी कल्पना आहे. निज हृदयाचा०—मी फक्त आपल्या हृदयाचा आहें, व एवढ्या स्वामित्वापुढें मी पृथ्वीचें स्वामित्वही तुच्छ मानतों.

१२-१. ' युद्धीं परमार्थ मिळे '—क्षत्रिय रणांत मेला असतां त्यास

स्वर्ग-प्राप्ति व्हावयाची, अशी समजूत आहे. ४. धौम्य--पांडवांच उपाध्याय ६. वन-कोल यूथ नाथें-रानडुकरांच्या राजानें. यज्ञकोलेश-वराह अवतार. ७ ' जागा दाटुनि, ' इ० -- ' हरि दाटुनि जागा केल्या गजा वांचाया जागा नसे. ' असा अन्वय.

१३-५. भीति मनीं इ०—दैत्याच्या मनांत भीति उत्पन्न झाली ७. उंबरा-उंबऱ्यावर. नखें--नख सजीवही नाहीं व निर्जीवही नाहीं, कारण त्यांत रक्त नाहीं म्हणून सजीव नाहीं व वाढतें म्हणून निर्जीव नाहीं. ८. करि सुमंगळ -- अमंगळ जीं आतडीं तीं गळ्यांत घालून सुमंगळ केलीं. १०. चतुर्दश लोक-विश्वामध्यें निरनिराळे चौदा लोक पुराणांत सांगितले आहेत. ११. स्वकृतविभुकोपाभ्युपरमा--विभुला म्ह० देवाला आपण आणलेला कोप त्याचा उपरम करण्यास म्हणजे तो घालविण्यास.

१४-१. कृष्ण म्हणतो, तूं सुज्ञच आहेस, तुला कळतें, पण मी तुझा आप्त म्हणून सांगितल्याशिवाय राहवत नाहीं. ४. गुप्त-प्रगट व्यवहार--कौरवांनीं पांडवांस मारण्यास अनेक गुप्त व उघड गोष्टी केल्या. त्यांतल्या बऱ्याच धृतराष्ट्रास माहीत होत्या ७. प्रभुनें--शंकरानें ९. ' अन्यरणीं ' इ०--शत्रूबरोबर लढण्यांत प्राण वेंचले तरी चिंता नाहीं, पण आपसांत लढण्यांत वेंचूं नका. ११. कश्यप—देवांचा बाप हा तुझे मुलगे देवांपेक्षा गुणांनीं श्रेष्ठ झाले, म्हणजे ' हा ' म्हणेल. १२. वचनकराऽपत्य-वचनकर म्ह० आपली आज्ञा मानणारा, अपत्य म्ह० मुलगा. १४. क्षीरधिजाननचंद्रचकोर--क्षीरधीची मुलगी जी लक्ष्मी तिचें आनन म्ह० मुख हाच कोणी चंद्र, त्यास चकोरासारखा.

१५-३. आर्यांबेच्या पोटीं-आर्य मातेच्या पोटीं.

१६-१. राधेय=कर्णाचें पालन करणारी राधा म्हणून होती, म्हणून त्यास राधेय व तिचा नवरा सूत म्ह० सुतार होता, म्हणून त्यास सूतपुत्र म्हणत. या आर्यांत कौरवांनीं पांडवांस ज्या गोष्टींच्या योगानें त्रास दिला त्यांचा संबंध आहे, त्यांची थोडक्यांत हकीकत:—विषान्न चारणें व डोहांत बुडविणें व त्यास सर्प चावविणें या गोष्टी कौरवांनीं भीमास केल्या होत्या. जतुगृह=धृतराष्ट्रानें वारणावती पांडवांस देऊन

तेथें त्यांस राहण्यास पाठविलें. तेथें पांडवांस राहण्यासाठीं जो वाडा बांधिला होता, तो दुर्योधनानें जतु म्ह० लाख व दुसरे शीघ्रज्वालाग्राही पदार्थ यांचा बांधविला व त्यास आग लावून पांडवांस जाळण्याचा विचार होता पण ते सुटले. २. कपटद्यूत=कौरवांचा मामा शकुनी हा कपटद्यूत खेळण्यांत प्रवीण होता. त्याच्या साह्यानें कौरवांनीं पांडवांचें सर्वस्व हरण करून द्रौपदीस दासी म्हणून सभेस आणिलें व पांडवांस वनवास करावयास लाविलें; व वनवास, अज्ञातवास, वगैरे सर्व पांडवांनीं कबुलीप्रमाणें केलें असूनही त्यांस त्यांचें राज्य दिलें नाहीं. ७. खरदुर्वाक्यशर शत=दुष्टांचे तीक्ष्ण शब्द हेच कोणी शेंकडों शर. ९. धर्मगृहा=यमाच्या घरीं. १०. येथून पुढें 'धर्म' या शब्दाचे धर्मशास्त्र व धर्मराजा असे दोन अर्थ घ्यावयाचे. न तोय सांचविता=पाणी सांठवून न ठेवणारा.

१७–५. तनुअर्ध=शंकराच्या अर्धांगीं पार्वती आहे, म्हणजे तो अर्ध–स्त्रीरूप आहे. ८. 'कथि न सुरस गाथा–संसारचाथा'=तिनें त्यास गोड गोष्टी किंवा संसाराच्या कंटाळवाण्या गोष्टी सांगितल्या नाहींत. चाथा=बडबड, वटवट. १४. हातीं आमलकासमान=हातावर आंवळा ठेविला असतां त्याचा प्रत्येक भाग जसा स्पष्ट दिसतो त्याप्रमाणें त्यास शास्त्रें अवगत होतीं. मूळ संस्कृतांत 'हस्तकामलक' असें असून, त्याचें मराठींत 'हातचा मळ' असें झालें. याचा अर्थ एकाद्याच्या अगदीं हातची गोष्ट. २०. 'शितिकंठ-वरें दिधलासि बरा'=' शितिकंठवरें' कर्तृपद; तूं. अध्याहृत कर्म, व येथें उद्देश्य, दिधलासि क्रियापद, कर्मणिप्रयोग; मराठींत कर्मणिप्रयोग प्राय: प्रथम व द्वितीयपुरुषीं होत नाहीं; तसले प्रयोग कवितेंत मात्र आढळतात. (बाल० व्या० पु० २ क० १४ (१०) टीप पाहा) ३०. चिरंजीवी–जगाचे अंतापर्यंत वांचणारा. असे चिरंजीव पुराणांत सात सांगितले आहेत, ते:–अश्वत्थामा, बली, व्यास, हनुमान, बिभीषण कृपाचार्य, आणि परशुराम. विषबाधा=संसाररूप विषाची बाधा.

१८–१. तप:श्री-विलास-सदन=तप:श्रीच्या विलासाचें स्थान. ३. मूर्तिसंपदेवर किरातत्वाचें आच्छादन घेतलें. ४. 'मूक' हें राक्षसाचें

नांव. ७. मृगयाधर्म—मृग ज्याच्या आटोक्यांत आला असेल त्याची ती शिकार; मग दुसऱ्यानें त्यास मारण्याचा यत्न करूं नये, हा मृगया धर्म; असा नियम अजूनही मानितात. ९. किटी-किरी=डुकर, १०. 'खद्योतत्व०' इ०='खद्योतत्व म्ह० आकाशांत प्रकाशणें हें रवी व काजवा यांचें काम समान असतें पण तिमिरास म्ह० काळोखास रवी खाणी म्ह० खणून काढतो कीं, काजवा खणून काढतो ?' १२. हरि-पुढें पर्वत, इ०—इंद्रानें पर्वतांचा गर्व वज्रप्रहार करून घालविला; पूर्वी पर्वतांस पंख असून ते पक्ष्यांप्रमाणें उडत. त्यांचे पंख इंद्रानें तोडले अशी पौराणिक कथा आहे. १४. गरळ जसें यमुना-ह्रदा=कालिया-मर्दन या आख्यानांतील कथा पाहा. पढवी जो चापश्रुति रामासी=शिवानें परशुरामास धनुर्वेद शिकविला. 'कामादिक जे रिपु त्यांचा गर्व हाच कोणी तम त्यास रवीसारखा.' २१. ज्यांच्या म्ह० ज्या शंकराच्या लीला देवांसही म्हणतात कीं मृत्यूचें भय हरण्यास सुधेचें चुबुक (हनवटी) धरूं नका, म्ह० तिला विनवूं नका. इ०. २३ नत-कामद-पद='शरण आलेल्यांच्या इच्छा पूर्ण करणारे आहेत पद ज्याचे असा;' बहु० स० २४. पुरस्थ-स्व मदघ्न=आपला गर्व हरण करणारा असा जो पुढें असलेला किरात. त्याच्या मस्तकीं शंकरमूर्तीवर वाहि-लेलीं फुलें पडलीं.

१९–२. धरा नखेंबु खणी=मार्गी नखें जमीन खणीत—आसोमे. ५. मोह रोग वैद्य=मोहरूप रोगाचा वैद्य. चैद्य=चेदी देशाचा राजा शिशुपाल; यास रुक्मिणीला द्यावी असा तिच्या भावाचा विचार होता. शाल्व, मगधपति (जरासंध), हे त्याचे मित्र. १२. 'नत चातक' इ०—भक्त हेच चातक त्यांची दयारूप सुधा तिचा जलद म्ह० मेघ. २१. तडित् स्फुरण=अकस्मात् कृष्ण दिसला तेव्हां विजेचा झटका बसल्यासारखें वाटलें; याचीं कारणें पुढील दोन आर्यांत सांगितलीं आहेत. २४. मूर्तिमंत मनोरथ असा रथ (कृष्णाचा). २५. माळा=गळ्यांतली; कृष्णानें रथावर ओढून घ्यावें म्हणून उंचविली म्ह० वर केली. २६. हरि नील निभ—वर अंक=हरीचा नीलरत्नाच्या प्रभेनें युक्त असा अंक म्ह० मांडी; कृष्ण मेघश्याम होता म्हणून. ३०. म—मनो-

रथ-रथ-शस्त्र=मनोरथ, रथ, शस्त्र यांसहवर्तमान तो म्ह० रुक्मी प्रभूनें भग्न केला. ३२. दुर्दशा-यावेळीं कृष्णानें रुक्मीच्या डोक्यावर सात पाट काढले; ही दुर्दशा.

२०-१. स्थिर=स्थीर. २. रमणीकचपाशीं=स्त्रियांच्या वेणींत. ३. कानीं गुंफुनि मी बसतें=माझ्या वर्णनपर काव्यें झालीं असतीं. ५. पंचमीं=पंचमस्वरांत. कोकिलेचा सूर हा पंचमांत असतो अशी समजूत आहे.

२१-६. संत म्हणति इ०-संत मनाला ह्मणतात कीं पूर्वागत जो त्याला साह्य करणें हेंच शिवपद, तेथें बैस. म्हणजे पूर्वी जो येईल त्यास साह्य करावें अशी साधूंची चाल आहे. ७. 'सर्वहि संत' इ०-संत आगमनामध्यें भेद पाहत नाहींत; तर अगोदर ज्याची भेट झाली तो अगोदर आला असें समजतात. ११. दैव अदैव संपद- ओघ=दैव व अदैव या ज्या संपत् त्यांचे ओघ; अनुक्रमें अर्जुन व दुर्योधन. २०. बल्लव-मूर्ख लोक, टोणपे. २३. 'तूं मुनिनीं चित्तीं षड्रिपु[illegible] धरिलास',-येथें द्वितीय पुरुषी कर्म असतां कर्मणिप्रयोग केला आहे. २६. मातलिसारथीं-मातली आहे सारथी ज्याचा असा महेंद्र. बहु०स०.

२२-१. तरुवर-श्रेष्ठ मोठा उंच वृक्ष. उष्णकाळमासीं-उन्हाळ्यांत. सवें-बरोबर;-मूल जन्मलें कीं दूध उत्पन्न होतें; व मूल जसजसें वाढतें तसें दूधही जास्त होत जातें. २. वोढे-त्याजकडे तिचें मन ओढलें जातें. गोडधड-गोड पदार्थ. कारभार-कारभाराची, कामाची काळजी. उमगोन-शोधून. बळें-मुद्दाम, पोट नसलें तरी. ५. अमृत हें इ०-हें म्हणणें. ६. मोलें-गुजराथी मारवाडी वगैरे लोकांत मजुरीनें माणसें रडावयास लावितात. रंग बेगडीचा-बेगडीचा रंग कायम नसतो तसा. वेठीं धरिल्या-जबरीनें कामास धरणें. ११. घेतसे गगन-आकाशांत उडत असतो. मत्स्य आठवितां पाळी-कूर्म दृष्टीनें सांभाळी-मासे आपल्या पिलांचें रक्षण नुसती आठवण करून व कूर्म म्ह० जे कांसवें नजरेनें नुस्तें पाहून करितात, अशी समजूत आहे. १२. बाह्य झळपळ-बाहेरची स्वच्छता. १३ शब्द पडसाद-शब्दाचा प्रतिशब्द. १४. डोळां घालितां-डोळ्यांत बोट घालून पाहिलें तर एका पदार्थाचे दोन पदार्थ दिसतात. बाधी-बाधते.

२३-४. हरिणान्योक्तीमध्यें ४ ते ७, ८ व ९ व १०, अशा निर- निराळ्या अन्योक्ती आहेत. त्यांच्या अर्थांचा परस्पर संबंध नाहीं. १२. इथें या वृक्षावर. २०. चकोर म्हणून एक पक्षी कल्पिला आहे; त्याला चंद्राचा व चांदण्याचा आनंद वाटतो. सुधापाना चंद्र हा सुधा म्ह० अमृत यानें पूर्ण आहे, व त्याच्या प्रत्येक किरणांतून अमृत येत असतें अशी कल्पना आहे. २१. मानसींचा--मानस सरोवरावरील; हंस हे मानस सरोवरावर असतात. मरुजनपद--मारवाड देश.

---

# भाग तिसरा.



१-१. समान-गुण हिमालय बर्फामुळें शुभ्रद्युती, ( शुभ्र आहे द्युती ज्याची, बहु० ) व शुक्र हा शुभ्रद्युती हे समान गुण.समान आहेत गुण ज्यांचे बहु० समास.५. तरी न मन इ०=तुझें भव्य-स्वरूप पाहून जरी आनंद होतो. मोद-आकार-आनंदाचें स्थान. तरी मन तुला थोर मानीत नाहीं,तर ईश्वरासच थोर मानतें.'गमे उदय पावतो इ०=' वाद्यांचा रव बहिर्विषयक आहे,तरी तो मनांतच उत्पन्न होतो.तशी हिमालयाची मूर्ती जरी दृष्टिविषयक आहे, तरी ती मनांतच जशी काय उत्पन्न होते; मग मानस प्रमोदरभर म्ह० आनंदयुक्त होऊन निजा ( आपली ) चेतना ( शुद्धी ) विसरते, व ईश्वरीं तल्लीन होतें;असा भाव त्रिजगदात्मरूपा=सर्व सृष्टि आत्मरूप आहे अशी ( भावना ). ९. येथपासून कवी पुढें पर्वत, नद्या, वगैरे यांना ईश्वरानें दिलेल्या गोष्टींची आठवण देऊन त्यांस त्यांचें स्तवन करावयास सांगतो.नियामक-नियम लावून देणारा. ११.इंद्रवज्रा- हतां=इंद्रवज्र ( विद्युल्लता ) त्यानें आहेत-फोडलेले; हें ' कातळां ' याचें विशेषण. १२. भंगावलि=लाटांची पंक्ती, १४.तुम्हां भास्करें कवण रंग दे.' वदा '=तुम्हांस भास्कराकरवीं( भास्करें, करणी तृतीया )रंग कोणी दिले तें सांगा. पुष्पाकरें=वसंतऋतूकरवीं. १५.सरलवृक्ष='सरल' नांवाचें वृक्ष ' १६. गवय-वनगाई. १७ व १८यांत कवी हिमालयास त्याच्या जवळ म्हणजे त्याच्यावर असलेले निरनिराळे पदार्थ घेऊन परमेश्वराची षोडशोपचारें पूजा करावयास सांगतो.

२-१. प्रधानपंतातें—पेशव्यास;-मोरोपंताच्या वेळीं पेशव्यांचें राज्य होतें, म्हणून कवी म्हणतो, कीं राजा (सातारचा) व पंतप्रधान यांबद्दल राजनिष्ठा धरावी. २. 'चूर्णें तसेंच हळदीनें'-चूर्ण म्ह० डाळ ज्याप्रमाणें हळदीनें रंगते-' जेविं कधीं इ०- ज्याप्रमाणें दीनें कर्षकें (शेतकऱ्यानें) हळ (नांगर) कधीं सोडूं नये, इ०. ६. ' मधुपा चंपक '-इ०-भ्रमरास सोनचाफ्याच्या फुलाचा वास आवडत नाहीं असें म्हणतात. ८. सुकवि कुल-गीतें—सुकवींचें जें कुल म्ह० समुदाय त्यानीं गीतें ' म्हणजे गाइ-लेलीं म्ह० कविवलेलीं. ११. नगां जशी मुग्धा=ज्याप्रमाणें तरुण मुलगी (मुग्धा म्ह० जिची पोक्त बुद्धी झालेली नाहीं अशी) नगां म्हणजे दागिन्यांना वाहते, त्याप्रमाणें.

३-१-राजा. हे दुर्योधना; ही कथा भीष्म दुर्योधनास सांगत आहे. २. सुरापगांग भवा=सुरापगा जी गंगा तिचा अंगभव=तिच्यापासून जन्मलेला. अर्थात् भीष्म. गांग=गंगोदक; हें शिवास दुरावे नाहीं, कारण गंगा त्याच्या डोकीवरच आहे. ३. गरुडें सुधा इ०=गरुडाची आई विनता व सापत्न माता कद्रू याच्या मध्यें कांहीं पण पडून विनतेला कद्रूचें दास्य करावें लागलें. पुढें कद्रूला अमृत पाहिजे होतें तें गरुडानें आणून देऊन मातेला दासत्वांतून सोडविलें. ९. गुरु-कुंभ भव व छात्रांमृतांशु जनक-छात्र म्हणजे शिष्य हाच अमृतांशु म्ह० चंद्र त्याचा जनक म्ह० समुद्र. या आर्येंत गुरूला कुंभभव म्ह० अगस्त्य याची व शिष्याला समुद्राची उपमा दिली आहे. १६. मरणीं-परशुरामाच्या मरणीं; ' तुम्हांस मारण्यासाठीं क्षत्रियांनीं देवांना नवस करून मला मागितलें, ' असें भीष्म म्हणतो. २१. महृषित तेज—भी मापसंत केलेलें तेज म्ह० पराक्रम किंवा मोठी गोष्ट, कृत्य. २४. जयमाशास्व-मला जय येवो असा आशीर्वाद द्या. कीर्ति कैलि सदन-कीर्तीचें क्रीडेचें घर; मोठा कीर्तिमान. २६. वंदावा. गुरु हर्षद इ०-हा द्विजराज (ब्राह्मण) अमळ म्ह० शुद्ध आहे व द्विजराज म्ह० चंद्र हा मलिन आहे, म्हणून चंद्रानें यास नमन करावें. २८. तुमच्या ब्राह्मण्या इ०-भीष्म म्हणतो, कीं तुमचें ब्राह्मण्य, तप, व विद्वत्ता यांचेवर मी प्रहार करीत नाहीं, तर तुम्हीं

जें अयोग्य म्ह० क्षत्रिय नसतांना जें क्षत्रियपण स्वीकारलें आहे, त्याच्यावर प्रहार करितों.

४–१. विंध्याद्रिव्रत आचरोनि०—विंध्यपर्वत उंच वाढून सूर्याच्या रथास अडथळा करूं लागला. त्यास अत्री ऋषींनीं नम्र होण्यास लाविलें. भार्गवराम मार्गणभयें–परशुरामाच्या बाणाच्या भयानें. परशुरामाच्या बाणानें समुद्र मागें हटला व तेथें कोंकण वसलेलें आहे अशी दंतकथा आहे. हल्लीं कोंकणप्रांत आहे त्या ठिकाणीं फार प्राचीनकाळीं समुद्र असावा व पुढें भूकंपानें तेथें जमीन वर आली असावी, असें अर्वाचीन भूगर्भशास्त्रवेत्त्यांचें मत आहे. ह्याच सृष्टिक्रमानें घडलेली गोष्ट वरील दंतकथेच्या रूपानें लोकांत रूढ राहिली असावी. मुली=पर्वताच्या मुली–नद्या. ३. अच्छोदक=( अच्छ + उदक ) स्वच्छ पाणी. स्फटिकभा=स्फटिकाची शोभा. ४. महीरुह=पर्वत. ६. पंचगंगा नदीच्या स्नानाचें पुण्य प्रयागक्षेत्रीं स्नान केल्याइतकें आहे असें समजतात. ७. ज्योतिःस्वरूपें बारा ज्योतिर्लिंगाच्या रूपानें. सप्तशृंगी –ह्या देवीचें देऊळ त्र्यंबकेश्वराजवळ आहे. ९. शिवा–कोल्ही. १०. प्रतापगडावर शिवाजीमहाराजांनीं अफझुलखानास वाघनखें पोटांत खुपसून मारलें, ह्या गोष्टीस अनुलक्षून हें वर्णन आहे. ११. जावळीचा कवी रामदास.

५. रामप्रसाद इ०=कर्ण हा राम म्ह० परशुराम याचा शिष्य होता. ६. रिपुमद-महिष इ०=रिपुमद हाच कोणी महिषासुर त्याला महाशक्ति भवानीप्रमाणें. ८. ' दिव्यास्त्रइमायावी'=घटोत्कच हा भीमाचा मुलगा. यानें भारतीय युद्धांत द्रोण सेनापती असतां भयंकर युद्ध मांडलें, तेव्हां कर्णास अर्जुनवधासाठीं मागून घेतलेली इंद्रशक्ति त्याच्यावर सोडावी लागली. ९. संक्षुब्धौर्वानल=संक्षुब्ध म्ह० अत्यंत खवळलेला असा वडवानळ. १२. तुमच्या विजयि भुजबळें–तुमच्या विजयी भुजबळाच्या योगानें भीष्म, द्रोण यांचे वधाबद्दलही मला वाईट वाटत नाहीं.

६. हे श्लोक भर्तृहरिकविकृत संस्कृत नीतिशतक याच्या भाषांतरापैकीं आहेत. यांतला प्रत्येक श्लोक अर्थाला स्वतंत्र

आहे. ३. हरि कवि, इ० कृपावळीच्या आरंभींचे शब्द. ९. तें धैर्य=चेंडूच्या सारखें. १२. ज्ञातिपंकेरुहाचें=कमळाचें भावंड म्ह० कमळासारखें. १४. दे आपणास असतां=आपणास ( आपणाजवळ ) असतां म्ह० असलें तर ( दुसऱ्यास ) देतो. १५. स्वातीस्तव-स्वाती नक्षत्रीं सूर्य असतां शिंपल्यांत थेंब पडून त्यांचीं मोत्यें बनतात अशी समजूत आहे. १८. अमोलवी-सुखाची वृद्धि करतो; किंवा अमोल हें सुखाचें विशेषण व 'वी' हें क्रियापद. २१. कडे-विकडीच्या-डोंगराच्या पलीकडच्या. २२ मैनाक हा एक पर्वत दधिसमुद्रांत आहे. हा इंद्रास भिऊन त्याशीं युद्ध न करितां समुद्रांत जाऊन लपला. पित्यातें भिडणें-पित्याबरोबर खांद्यास खांदा देऊन लढण्यास उभें राहाणें. २५. न आनें दुसऱ्या कोणत्याही वस्तूनें नाहीं २६. दे आळंबूनि इ०—हत्तींचा महात 'बाप, भाई,' अशा हाका मारून जेव्हां घांस देतो, तेव्हांच हत्ती घेतो अशी हत्तींची मोठी बढाई आहे. ३२. नीर—उदकें; हें अनेकवचन आहे. पुष्कळ उदक असा अर्थ. ३५. जन—शासन—दंड धर्ते—मायबाप लोकांचें संरक्षण करणारे; राजे. सर्वसम—सर्वांशीं सारखे वागणारे.

७. हा उतारा कै० चिंतामणी पेठकरकृत 'गंगावर्णना' या सुरस काव्यांतला आहे. १. ही-गंगानदी. २. तिला—दृष्टीला. १३. प्रवितत.-फार पसरलेले असे जे विषाग्नार त्यांच्या गंधानें युक्त असे भाग; हे विषाग्नार म्हणजे मागें सांगितलेलीं पानें कुजून निघालेले विषाग्नार. १९. निपजतीं—प्राप्त होतात. तरुणादित्यतापार्ते—प्रखर सूर्याच्या तापानें पिडलेले. २० गलत्प्रेमनेत्रांबुपूर—ज्यांचे डोळ्यांतून प्रेमाश्रु गळत आहेत असे—बहु० स०. २६. पात—विशीर्ण तूर्ण—शतधा- पडण्याच्या योगानें शंभर ठिकाणीं तुटलेली. २७. स्वर्गारोहण हेतु -निर्मित—स्वर्गांत चढून जाण्यासाठीं केलेले ३०. आदिमवर्ण-त्यांचा पहिला स्वतांचा—मूळचा रंग.

८.—३. या आर्येत कर्णानें जें म्हटलें आहे, तसें कर्णाचें वर्तन अगदीं अक्षरशः होतें दुर्योधनानें त्यास आपलासें म्हटलें होतें, तर कर्णानें कांहीं झालें तरी त्याचा पक्ष सोडला नाहीं व शेवटीं दुर्यो-

धनासाठीं त्यानें आपले प्राणही खर्ची घातले. ६. घोषयात्रा–पांडव वनांत असतां त्यांस त्रास देण्याचे उद्देशानें कर्णदुर्योधनादि अरण्यांत गेले. तेथें एका सरोवरावर चित्रसेन गंधर्व क्रीडा करीत असतां कौरव–गंधर्वांचें भांडण होऊन चित्रसेन गंधर्वानें कर्णादिकांस पळविलें व दुर्योधनास व त्याच्या बंधूंस बद्ध करून तो घेऊन चालला. तेव्हां कौरव-सेवक धर्मास शरण गेले. धर्माला दया येऊन त्यानें भीमार्जुनांस आपल्या चुलत बंधूंना सोडवून आणण्यास सांगितलें. चित्रसेन हा अर्जुनाचा मित्र होता. त्यानें अर्जुनाच्या सांगण्यावरून कौरव राज-पुत्रांस सोडलें. या गोष्टीचें कर्ण व दुर्योधन यांस फार वैषम्य वाटत असे. आर्या ५।७ यांत हा कथासंबंध आहे. ८।९ गोग्रह–विराटाच्या गाईंचें हरण. या वेळीं अर्जुनानें सर्व कौरवांस मूर्च्छित करून त्यांचे वस्त्रालंकार हिरून नेले १३. भूपसखा–भूप हाच सखा, दुर्योधन, कर्म० धा० स० १५. भृगुपतन–भृगु–पर्वत–कडेलोट १७. हे प्रभु–बाहुरूपी प्रभु. २०. पानें–सुरापानानें. २४. ‘ श्वान स्वपोषकाच्या ’ इ०—येथें कर्ण व त्यास आश्रय देणारे कौरव यांच्याशीं हा दृष्टांत चांगला जुळतो २६. प्रसवे तीच अभिज्ञा–जी बाळंत होते, तीच प्रसव वेदना जाणते. वेणेची–प्रसूतवेदनेची. २९. कर्णाची मानखंडना करून बोलण्यामध्यें वास्तविक शल्य चा उद्देश त्याचा हुरूप कमी करावा हा होता. कर्ण त्याचा भाव म्ह० उद्देश कळला म्हणतो तो हा भाव नव्हे. शल्य मुद्दाम असें बोलतो हें कर्णास कळत नव्हतें. कर्णास वाटलें कीं, शल्य पांडवांस भ्याला आहे म्हणून असें बोलतो; ‘ भाव ’ कळला तो हाच. ३०-३१ या आर्येंतील उद्गार केवढे शूरत्वाचे आहेत ! त्यांवरून कर्णाची खरी योग्यता कळते ३०. कृष्णांला=कृष्ण व अर्जुन यांस, कृष्ण असें अर्जुनाचें नांव होतें ३२ भूत–प्राणी, मनुष्य.

९—४. नित–नित्य. महान–महान व्यसन–मोठें संकट. ५. समुद्राला कितीही भरती येवो अगर त्यावर तुफान होवो, तो आपली मर्यादा सोडीत नाहीं. १०. सुधामय=अमृतासारखी गोड.

१०—१.‘ न तें अनृत ’—इ० जनीं सदाचार बुध जें वर्णिती तें अनृत न, ‘ ऐकते ’ व ‘ बोलते ’ हीं बुध यांचीं विशेषणें. ३

सदैव इ०--सदैव पद नमितां किणें (घट्यानें) ललाट (आपलें) पद (म्ह० स्थान) केलें म्ह० तुह्मास नमन करून करून जरी कपाळास घट्टे पडले, इ० ४. आयसें मणिहेमभूपतिस जोडिल्या न लाभ'--ज्या भूपतीजवळ रत्नें व सुवर्ण आहे, त्याचा जर लोखंडानें आश्रय केला, तर त्या राजाला ती गोष्ट लाभप्रद नाहीं; म्हणजे राजाला लोखंडाची पर्वा नाहीं. ६. गमो मधुर, व हरा पारिस तूं बरा इ०--हर ह्म० शंकर एकदांच विष प्याला व तूं स्तुतिरूप विष सदा पितोस ह्मणून तूं त्यापरीस बरा. ७. शरणागती-शरण, आगती-येणें; खरें, ह्म० योग्य रीतीने शरण येणें. ८. तदा=कृष्णावतारीं. रजोमलिन काय=रजानें मलिन आहे काय ज्याचा असा तू; बहु० स० ९. दयामृतरसार्द्र-धी=दयारूप जो अमृतरस त्यानें आर्द्र आहे धी जीची अशी ह्म० जननी, बहु० स०. परगुरुत्वे=दुसरा गुरु ह्म० वडील जो बाप त्याचे प्रसादपट झांकितां पण थिटे म्हणजे आखूड पडतात; कारण बाप अमुक एक मर्यादेपर्यंत ममता करितो. एक गुरु आई; व पर ह्म० दुसरा गुरु बाप. १०. कवि ह्मणतो कीं, तुह्मांस प्रसाद करायास उशीर लागत नाहीं; पण तुम्हांला आम्ही शरण येऊं तेव्हां. खरोखर जसें शरण यायला पाहिजे, तसें शरण आह्मी आलों नाहीं. ११. भजक बर्हि-मेघा=भक्त हेच कोणी मोर त्यांचा मेघ. 'गुणचि घेतला'=' उतावळेपणाचा गुण मीं मुद्दाम अंगीं घेतला आहे,' कवीनें कारण पुढें सांगितलें आहे. १२. कृतांत-कटका मल ध्वज-जरा=यमाच्या सैन्याचा शुभ्र ध्वजच अशी जी जरा ती. १४. सदुक्तमार्गी=साधूंनीं सांगितलेल्या मार्गाकडे. स्वतत्त्व, आत्मबोध=ब्रह्मज्ञान; आपण कोण, आपला, परमेश्वराचा व जगाचा संबंध काय, हें ज्ञान, १५. असा अतिथि=पाप्यांना तारणें तुम्हांस मुळींच जड नाहीं; पण माझ्यासारखा पापी तुम्हांस कोठें सांपडेल? जितका पातकी मोठा, तितकी तारणाराची तारीफ मोठी.

११--२. विष चारिलें-पांडवांना कौरवांनीं जें जें कांहीं वाईट केलें त्याबद्दल मागें भाग २--१६ याच्या टिपेंत सांगितलेंच आहे. जतुसद्म-च्छद्मकर्म=लाक्षागृह करण्याचें लबाडीचें कृत्य. ३. कितव=फस-

ण्या;—येथें शकुनी. ५. अलंकारे=हें क्रियापद आहे. ६. घननाद=इंद्र-जित; त्याचा बाप म्हणजे रावण. ८. निखिळा-निखिला, सर्व 'श-कुनी रूप ताप देणारा खिळा तूं पुन: माझ्या उदरांत लाव, मार, बोंच.' ९. अक्ष=फांसे, कपटद्यूतांतले. ११. युद्धश्रद्धेसह=तुझी युद्धाची हौस व तुझा काय दोन्ही भंगितों. १२. 'तू महिष' इ०=शोण म्हणजे रक्त त्यानें लाल झालेली जी गदा तीच कोणी शक्ति झ० देवी तिच्या दृष्टीचा कटाक्ष तुझ्यावर जोंपर्यंत पडला नाहीं, तोंच तूं जो महिषा-सुररूपी त्याच्या गमजा चालतील. १३. भूमींत, इत्यादि,= पाडूच्या त्या सुना वितिलका व्हाया भूमींत (रणभूमांत) सीर (शीर), '= असा अन्वय. १६. कढी, भात, इत्यादि=भीम विराटाचे घरीं बल्लव नामक स्वयंपाकी बनला होता हें प्रसिद्धच आहे. १७. घटजें—अगस्त्य ऋषीनें जसा समुद्राचा क्षय केला तसा. पूर्व-अपर सरस्वत्-ओघ=पूर्व व पश्चिम या समुद्रांचे ओघ. १८. 'जतन' इ०—शरीराचें जतन. १९. 'विषचि ती अगदीं'=औषधांत विष; कीर्तीमध्यें अपकीर्ति. २०. शारद-वारि-घन शरदृतूंतील मेघ; हे गर्जना करितात पण फारसें पाणी देत नाहींत.

१२—२. तुंग=उंच. ४. ही ओळ, "हाणी, विखरुनि टाकी, जुळवी" अशी असावी, असें अर्थानुक्रम व यमक दोन्हीवरून वाटतें. ६. गिरि-कुहर=पर्वतांतील दऱ्या. ७. विशिष्ट तऱ्हेनें कंठांतून वारा बाहेर येऊं दिला म्हणजे त्याचा त्यात्याप्रमाणें शब्द उमटतो. ८. म्हातारी=शेवरी-ची बी तिच्या भोंवतीं कापूस तसाच चिकटलेला असतां उडते. ती अगर त्यासारखे उडणारे कांहीं हलकेसलके पदार्थ यांस मुलें फुंकर मारून उडवितात, त्यांस म्हाताऱ्या असें म्हणतात. ९. सुसाट=सोसा-ट्यानें. गगनकटाहो=गगनरूपीं कटाह—कढई. १५. रोपें=तंतू, बंध.

१३—१. पांचाळ-पांडव-पक्षाचे लोक. ३. गौमौं—बैलरे बैल-' कौरवांनीं शत्रूंस जिंकण्यासाठीं विष देणें, जतुगृह करणें वगैरे लबा-डीचीं कृत्यें केलीं, तशीं आह्मांस करावयास नकोत; 'आम्ही बाहु-बळानें शत्रूंस जिंकणार,' असें भीम म्हणतो. ८. देवा, सर्वभूत-पा हें कृष्णास उद्देशून आहे. १२. मूर्धाभिषिक्त इ० दुर्योधनास युवराज म्ह-

णून यथाशास्त्र अभिषेक झाला होता, म्हणून त्याच्या मस्तकीं भीमानें पाय दिलेला धर्मास आवडला नाहीं. १६. अति-तापद-प्रभाव-अति तापद आहे प्रभाव ज्याचा; बहु० समा. १९. आदित्य, रुद्र, वसु स्वर्गात वसु, रुद्र, व आदित्य असे लोक आहेत; त्यांच्यामध्यें मेलेल्यांचे आत्मे अनुक्रमें जातात. २०. अवीराशत—धिकृत अवीरा झालेल्या म्हणजे ज्यांचे पती-पुत्र रणांत मी मारिले आहेत अशा शंभर स्त्रियांनीं धिक्कार केला आहे ज्याचा असा जो मी तो, कसा सुख पावेन ? २१. सदा नवी=नेहमीं टिकणारी.

१४—२. दलित = कुसकरलेलें. ४. यान—विमान. ५. तरलत—स्फुरण पावत.

१५—१. 'रुद्र-ललाट' इ० शिवाच्या कपाळावर एक डोळा आहे; शिव रागावला असतां तो उघडतो, व तो उघडला कीं त्याच्यांतून अग्नि निघून जिकडे तो डोळा पाहील त्या पदार्थाचें जळून भस्म होत असतें. अशाच रितीनें मदनास जाळिलें. २. काम-रूप—इच्छिलें रूप घेणारा, मायावी. अनिर्दश—ज्याला जन्मून दहा दिवस नाहीं झाले तो. ५. जो निःशेष, इ० शंकराच्या क्रोधानळानें जो निःशेष जळून गेला नाहीं, त्याला समुद्रांत टाकून आपला मृत्यु टळला असें खळ समजला. ८. रम्याकृति आच्छादून आपलें रम्यरूप लपवून, म्हणजे दुसरें रूप घेऊन. १२. पारदें पदें याचें विशेषण. करुणा—लीला—आलय = दयेचें क्रीडास्थान; ह्मणजे फार दयाळू. १३. 'मायाशत' इ० शेंकडों मायांमध्यें निपुण असा जो शत्रु त्याचें प्रमथनरूपी जी क्रिया तिची सिद्धी करण्याचा उत्साह मनांत उत्पन्न केला. १४. कलितोद्दामगद—कलित म्हणजे घेतली आहे उद्दाम म्ह० मोठी गदा ज्यानें; बहु० स० विशेषण काम याचें. १५. स्वाधिक्षेप विवृद्धमन्यु = खळ याचें वि०; आपला अपमान, त्याच्या योनानें विवृद्ध म्ह० वाढला आहे मन्यु म्ह० क्रोध ज्याचा, असा. साळसा—आळस करणारी, गदेचें विशे० इ० ज्याप्रमाणें उद्धत-गजानें हरि बालकोन्मुख याचें त्याप्रमाणें. १७. दिवसां—दिवसांनीं; तृतीया विभ०. स्वासमूर्तोत्सव तुमच्या आतांना मूर्तिमंत

उत्सवच. १८. शंभरान्तोत्सव—शंभरास मारण्याचा उत्सव. स्त्रीसह—ज्यांच्याबरोबर स्त्रिया आहेत असे. सुहृद्वार—सुहृदांचा वार म्हणजे समुदाय. १९, २०. मदन हा हुबेहुब कृष्णासारखा दिसत होता, यास अनुलक्षून हें वर्णन आहे. १९. तीं—शोभा, आकृति वगैरे.

१६—३. प्रखर भास्कर० —(अन्वय) भास्करही प्रखर न करी. ६. वय दहा० = वय दहा वर्षें (असलेले). ११ उत्सवें = हर्षानें. संतत उद्यम = नेहमींचा उद्योग. १२. रवी नृपती उगवुनी तया (अफाट गगन राज्याला) बहु तोषवी. १५. शिवाजी राजा हाच जसा कांहीं गरूड, त्यानें किल्ले हींच जशीं कांहीं आपलीं घरटीं तीं त्यावर बांधलीं. १७. मराठे राज्याची नदी याच डोंगरांतून उगम पावली. १९. भरभराट—या शब्दाचा उपयोग येथें पुल्लिंगी केला आहे. हा बहुतेक स्त्रिलिंगी उपयोगिला जातो. विगत—पक्ष—जटायु—शरीरसे = पूर्वी पर्वतांना पंख होते व ते इंद्रानें तोडून टाकले अशी कथा आहे. त्याचप्रमाणें रावणानें जटायूचे पंख तोडल्याची कथाही रामायणांत आहे. अचल = (१) निश्चल किंवा (२) डोंगर. अन्वय—(१) हे (पर्वत) विगत—पक्ष—जटायु-शरीरसे अचल (निश्चल) बैसुन पाहती, किंवा (२) हे अचल विगत—पक्ष—जटायु—शरीरसे (निश्चल) बैसुन पाहती.

१७—१. स्वसा—जावा सीता, मांडवी, उर्मिळा व श्रुतकीर्ति, या एकीकडून बहिणी व एकीकडून जावा होत्या. ३.श्रीनें = सीता ही श्री म्ह. लक्ष्मी हिचा अवतार. ४.स्वसम०= नीज जाशी निष्टुर झाली होती तसें स्वप्नही झालें होतें; म्हणजे गाढ झोंप नाहीं स्वप्नही नाहीं. स्वप्न हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी आहे, तसा येथें त्याचा उपयोग केला आहे. चित्रकूट = प्रयागाचे आग्नेयीस हें एक पर्वतशिखर आहे; तेथें राम कित्येक दिवस राहिले होते. बोध मानून = बोध ग्रहण करून. ७. देऊनि अभय मुनीतें = मुनीस राक्षसांपासून त्रास होई, तो नाहींसा करितों असें रामानें अभय दिलें. ८. शमिलेखर्षभ = शमी म्ह० साधु त्यांतले देव, 'सुधवळ मानसीं जसे पत्रीं' = मानसीं

म्ह० मानस सरोवरावर जसे पत्री म्हणजे हंस पक्षी शुभ्रवर्ण; तसे जे मानसीं म्हणजे मनांत सुधवळ म्ह० पवित्र. १०. सासु मायशी—सासूसारखी किंवा आईसारखी. १५. त्या आर्येसि = पृथ्वीस; पृथ्वी ही सीतेची आई. पृथ्वी इतक्या प्रकारच्या जीवजंतूंस आपल्या पाठीवर वागविते, तेव्हां तिची वत्सलता अपूर्व होय. राक्षस तो—विराध नांवाचा; हा मूळचा तुंबरू नांवाचा गंधर्व असून शापानें राक्षस झाला होता. १८. श्रीघटजमुनि = अगस्त्यमुनी; याची उत्पत्ति घटापासून झाली. व यानें एकदां कांहीं दैत्य समुद्रांत लपले होते म्हणून सर्व समुद्र प्राशून राक्षस पोटांत जिरविले व मग समुद्र पोटांतून सोडून दिला, अशी पौराणिक कथा आहे. २०. विनमी तें इ० तें जें पुत्राचें नातें, तें देहाला कां विनम्र करणार नाहीं? अरण्य हें घर व जटायु पित्यासारखा, मग त्याला देह नम्र कां होणार नाहीं? २१. पंचवटीस्थळ = गोदेच्या मुखापासून पश्चिमेकडे सुमारें शंभर कोसांवर गोदेच्या उत्तर तीरीं जनस्थान म्हणून एक प्रदेश दंडकारण्याचा भाग होता; तेथचें एक स्थळ; येथें राम राहिले होते. त्या स्थळीं सांप्रत भद्रतीर्थ व पर्णशाळा नांवाचे गांव आहेत. नाशिक हें जनस्थान, व तेथची पंचवटी ही रामाची पंचवटी अशी जी सध्या समजूत आहे, ती चुकीची आहे. २२. श्रीमत्त्र्यंबक—जटोद्भवा = त्र्यंबक म्ह० शंकर, त्याचे जटेंतून आलेली. भागिरथी ही शंकराच्या जटेंतून आली, त्याचप्रमाणें प्रत्येक पवित्र नदी ही शंकराच्या जटेंतून आली व ती भागीरथीचाच अंश असा समज असतो. गोदेचा उगम त्र्यंबकेश्वर नामक डोंगरांतून आहे, म्हणून येथें शंकराच्या 'त्र्यंबक' या नांवाचा उपयोग केला आहे. त्र्यंबक=तीन आहेत अंबक म्ह० डोळे ज्यास तो. २३. ती त्यांच्याही=त्यांच्या म्ह० लक्ष्मणाच्या; हें मांडवीला म्हटलें आहे. २७. माझ्या मेंदीहि हास्यें ती कुत्याशी क्रुद्धा केली. भीति—केली—गेह—आस्य—भीतीचें क्रीडेचें स्थान =भयंकर असें आस्य=तोंड. २८. योग्य दंड=तिचे नाककान कापले. ३६. विपदोघीं=विपद् म्ह० संकट, त्याचा ओघ. ४१. महीसभा=पृथ्वी

ज्याप्रमाणें लोकांचे नानाप्रकारचे चार सोशितये, त्याप्रमाणें; सीता ही पृथ्वीची मुलगीच होती. ४२. सरमा ही विद्या व त्रिजटा ही कला विद्या व कला या जशा आनंद देतात तशा या दोघी आनंद देत होत्या ४४. मारुतीनें वृत्त सांगतांच माझे मनोरथ जे पांगळ्यासारखे झाले होते ते समर्थ झाले. महाधिगदार्त=महान् आधि म्ह० दुःख हाच रोग. त्यानें आर्त म्ह० पीडलेले; तत्पुरुष स०. ४५. चवथे भावोजी सुगळ=सु+गळ=सुग्रीव; रामाचें व याचें परस्परांस साह्य करण्याचें बंधूसारखें सख्य झालें. म्हणून हे चवथे भावोजी. ४६. ऋक्षकटकें= अस्वलांचीं सैन्यें. या हा, म्हणजे मारुती. ४८. महित जे तद्दी–इ०– साधु जे आहेत त्यांना स्तवनानें आनंद होतो. ५१. स्वामींनीं धर्म आठविला–अगोदर साम करण्याचा यत्न करणें हा धर्म. ताराबाई= सुग्रीव व वाली या दोघांची स्त्री. मलबाराकडील प्रदेशांत नायर वगैरे लोकांमध्यें पुष्कळ भावांनीं मिळून एक बायको करण्याची चाल अद्यापि आहे. प्रहस्त=रावणाचा सेनापति. ५६. इंद्रजित–रावणाचा मुलगा मेघनाद; यानें इंद्रास जिंकलें होतें म्हणून यास इंद्रजित म्हणत. ५७. पुष्पक=रावणाचें विमान. ५९. नागपाशा संपूर्णा यत्प्रसादें, इ०=ज्याच्या प्रसादें नागग जो गजेंद्र त्याचे मनोरथ पूर्ण झाले असा जो विष्णु त्याचा सखा इंद्र, तो नाग–पाश परिहारी. ६०. कुंभकर्ण=हा रावणाचा बंधू; हा नेहमीं निजलेला असे. हा मोठा भयंकर व बलवान् होता. सानुजन्मे=अनुजन्मा. भाऊ; त्यासह असे, बहु. स०. ६१. कळेचा तात=हा एक वृद्ध व शहाणा वानर किंवा अस्वल होता; त्याचें नांव जांबवंत. ६२. समयीं=योग्य वेळीं; प्रसंगीं. ६३. जो बरोबरी करी म्हणजे ज्यानें बरोबरीनें युद्ध केलें त्याला ( कुंभकर्णाला ) प्रभू बरी गती देती, असा अर्थ. ६७. तो अरि=इंद्रजित; हरिच्या=इंद्राच्या; इंद्राला जिंकणारा म्हणून तो त्याच्या काळजांतला कांटा असें म्हटलें आहे. ६९. हा साधुवत्स–मारुती. ७०. दिकंधर–दिक् म्ह० दिशा- इतक्या ( दहा ) आहेत कंधरा म्ह० माना ज्यास असा रावण. मातलि=इंद्राचा सारथी. ७१. द्वैरथयुद्ध दोनच रथी, यांचें युद्ध; द्वंद्व- युद्धासारखे. दिङ्मुख–रावण. अध्वरीं–युद्धरूप यज्ञांत; तेव्हां बाणांनीं आकाश असें भरून गेलें कीं त्यांत वारा किंवा सूर्यकिरणही शिरेनात. ७६. सारसें–सार–असें, चांगलें. ७७. मत्स्मरणें शिबी प्राप्तभव्य केला; ज्याच्या स्मरणानें शिबीचें कल्याण झालें असा राम. शिबी ह्मणून एक मोठा विष्णुभक्त राजा होता. ७८. दिव्य=सीतेनें आपण शुद्ध आहों हें दाखविण्यासाठीं अग्नींत दिव्य केलें. ८० मामाजी–दशरथ; हा सूर्य-

रूपानें किंवा इंद्ररूपानें आकाशांत आला. ८१. कविसभा-श्रीसंपदा कवींच्या समुदायाची सर्व संपदा, म्हणजे जिच्या कीर्तीविषयीं कवी काव्यें रचतात अशी सीता. ८४. कथा=सीतेला नेल्यानंतर घडलेलें वृत्त. ८५. सीता म्हणते कीं स्वामी पुण्याश्रमीं राहून राज्य, अयोध्या-पुरी, वगैरे सर्व विसरते. ते कांहीं चित्तानें ढिले नाहींत, म्हणजे त्यांचें मन त्यांचे स्वाधीन आहे. परंतु वत्साच्या स्नेहानें जशी गाय घरीं येते, तसे ते भरताच्या स्नेहानें आले. ८६. शबरी-एक भिल्लीण. तिची भक्ति पाहून तिला उद्धरिलें. गुह गंगेवरचा नावाडी, यालाही उद्धरलें, सीता म्हणते राम जर दयाळू नसते तर यांचेवर एवढी कृपा त्यांनीं कशी केली असती ? ८७. राम हा मेघ, त्याला भरत-शत्रुघ्न हे मोर सामोरे आले, तेव्हां क्षुधित जे आहेत ते सांपडेल तें कवळतात, त्याप्रमाणें रामानें भरतशत्रुघ्नांस कवाळिलें म्हणजे आलिंगन दिलें. शेवटल्या चरणाचा अन्वय ' जाणों ग्रीष्मीं तृषार्ता वाटे ( वाटेंत )-विपुल-तर-सुधावर्ष ( सुधेचा पाऊस ) मिळे.'

१८-१. निर्वृत्त=संतुष्ट. शशी-तपन=चंद्रसूर्य. भव-भय-भंजन =संसारताप नाहींसा करणारी. २. मलय पर्वतावरून येणारे सुगंधित वारे हाच तुला धूप आहे. आणि निरंतर वाहणारे वारे हे तुजवर जणु काय चामर ढाळीत आहेत.

पृष्ठ १५४—८ चे पुढील राहिलेला मजकूर

८. चक्षुस्तेज:संपन्न = चक्षुरूप तेजानें युक्त, ज्यास डोळे आहेत असा. १३. ' हा लक्ष्मीसुत ' इ०-' जें यश उमासुत ( गणपती ) न लिहिल तें मी जो लक्ष्मीसुत ( मोरोपंतांच्या आईचें नांव लक्ष्मी होतें ) तो किती लिहीन ? जें काम गणपतीच्यानें झालें नाहीं तें माझ्यानें कसें होणार ? १९. ' सत्यगुणासक्त-मानस ' सत्य हा जो गुण त्याचे ठायीं आसक्त आहे मानस ज्याचें असा; बहु स० २०. अ-विनाभावें = विनाभावें म्ह० वियोग तो झाल्याखेरीज.

९-१. कृष्णपद-भक्ति-विशारद = कृष्णाची भक्ति करण्यांत कुशल. ३. पवन-येथें अर्थ श्वासोच्छ्वास. ५. अनादिभवशोक = प्राचीन काळापासून चालत आलेला किंवा ज्याचा आरंभ कोणास माहित नाहीं असा भवशोक. ६. आम्हुशीं-आमच्या-जवळ. ८. अवघडीं-हें क्रोधाचें विशेषण. पूर्वस्थितीस घडी बसतां तीस विघडी; म्ह० नेहमींप्रमाणें मनाची स्थिति होत असतां तिनें पुनः ती स्थिति बिघडली म्हणून राग केला; १५, ' हरिकरें, ' इ०—कृष्णाच्या हातांतली जी गंगावनाची म्ह० केसांची मूद

म्ह० पेड; तो काळा होता म्हणून तीच यमुना, ( यमुनेचें पाणी काळें आहे ); म्हणून त्यांत जीं धवल म्ह० पांढरीं फुलें घातलीं होतीं त्यांच्या योगानें गंगावनाची म्ह० गंगेच्या प्रदेशाची शोभा आली होती. ( गंगेचें पाणी पांढरें आहे ); याप्रमाणें सित म्ह० शुभ्र, व असित म्ह० कृष्ण, अशा नद्यांचा संयोग झाला; अशी यदुपतीनें चित्रविचित्र वेणी घातली. गंगा व यमुना यांच्या संगमास त्रिवेणी संगम असें म्हणतात. तेथें तिसरी नदी सरस्वती ही गुप्त आहे किंवा जमीनीखालून वाहात आहे. ‘ वेणी ’ म्हणजे नद्यांचा संगम किंवा पाण्याचा डोह असाही अर्थ आहे.

---

# कविपरिचय.



**वामन**-[ मृत्यु सन सुमारें १६२५ ]-हा ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. मोठा संस्कृत पंडित होता. त्याचें भाषेवरील प्रभुत्व चांगलें असून त्याचीं वर्णनें उदात्त आणि मनावर ठसा उमटविण्यासारखीं असतात. यानें विशेषत: भागवतांतील व कांहीं भारत रामायणांतील आख्यानें मराठींत आणिलीं. तीं फार गोड आहेत. त्याची भाषा प्रौढ व सरळ असून तींत स्वभावोक्ती व ओजस्विता हे गुण भरपूर आहेत. त्याच्या कवितेंत अर्थालंकारही असतात, व अनुप्रास वर्णनानुरूप असतात. त्याचीं वीररसाचीं वर्णनें जोरदार व खळखळाटाचीं असतात. त्याचे वेदान्तपर पुष्कळ ग्रंथ आहेत, आणि गीतेवर ओवीबद्ध विस्तृत भाष्य आहे. त्याच्या कवितेंत पुनरुक्ती व पुन्हां पुन्हां तींच तींच वर्णनें फार येतात, आणि भाषेची रचना पुष्कळ अव्यवस्थित असते. तरी एकंदरींत हा जुन्या मराठीचा प्रतिभावान् कवी असून त्यानें श्लोकवृत्तांना मराठींत झोकदार स्वरूप आणून दिलें.

**विठ्ठल**—हा कवी शालिवाहन शकाच्या सोळाव्या शतकांत होऊन गेला. हा वामनपंडिताचा समकालीन. याचें संपूर्ण नांव विठ्ठल अनंत क्षीरसागर. हा बीडजवळील गौरीपूर येथें राहणारा. व्यापार करून हा उदरनिर्वाह करीत असे. हा पंढरीचा मोठा भक्त होता. मराठींत चित्रकाव्य यानेंच प्रथम लिहिलें, म्हणून यास चित्रकवि विठ्ठल

अशी संज्ञा आहे. रुक्मिणीस्वयंवर, सीतास्वयंवर, पांचालीस्तवन, विद्वज्जीवन, रसमंजरी, द्रौपदीवस्त्रहरण व बिल्हणचरित्र हीं याचीं काव्यें होत.

**मुक्तेश्वर**-[ इ. स. १५९९ ते १६४९ ]-हा कवी देशस्थ ब्राह्मण असून एकनाथ कवीचा नातू-मुलीचा मुलगा-होता अशी आख्यायिका आहे. यानें मराठींत आख्यान-कवितेला व्यवस्थित आरंभ केला; व श्लोकवृत्ताची प्रथम सुरवात केली. याची एकंदर कविता बरीच मोठी आहे. हा जुन्या मराठींतला उत्तम कवी आहे. याची वाणी प्रौढ व रसाळ, वर्णनें उदात्त व भाषणें आणि संवाद उत्साहक असतात. भाषेंत अलंकार फार असतात, व भक्तिरस आणि वीररस यांचा ओघ चांगला असतो.

**रघुनाथपंडीत**—याचा काल बरोबर कळत नाहीं. तो शिवाजीचा बाप शहाजी याच्या वेळीं होता असें वाटतें. तो कर्नाटकांत गेलेल्या दक्षिणी ब्राह्मणांपैकीं असून स्वतः हरदास किंवा कीर्तनाचा शोकी असावा. संस्कृत नैषधकाव्याच्या आधारें रचिलेलें त्याचें नलोपाख्यान काव्य अत्यंत मनोहर, रसभरीत आणि अलंकारिक असें आहे. तें नानावृत्तमय असून त्यांत गाण्यायोग्य पदें व छंद आहेत. त्यांत प्रास, यमकें श्लेषही बरेच आहेत. निवडक संस्कृत व मराठी शब्दांचा उपयोग, रस, अलंकार, प्रासंगिक चातुर्याचीं भाषणें, भाषेला जुळेल अशी सुव्यवस्थित वाक्यरचना हे प्रकार या काव्यांत सहज आलेले आहेत. याच कवीचें गजेंद्रमोक्ष नांवाचें एक लहानसें काव्य अलीकडे आढळलें आहे.

**आनंदतनय**—हा रघुनाथपंडिताचा समकालीन होता. हाही कर्नाटकांतील दक्षिणीब्राह्मणांपैकींच असावा. याचीं बरींच आख्यानें आहेत. त्याचें काव्य कीर्तनायोग्य आहे, आणि भाषा सोपी आणि साधी आहे. " हा अरणीचा कवी यमकांनीं आपलें काव्यशोभवितो " असें मोरोपंतांनीं याजविषयीं म्हटलें आहे.

**तुकाराम**—[ १६०८-१६४९ ]-पुण्यापासून नऊ कोसांवर देहू म्हणून गांव आहे, तेथचा हा राहणारा. हा जातीनें शूद्र असून त्याचा वडिलोपार्जित धंदा वाण्याचा. परंतु लहानपणापासूनच त्याचें चित्त संसारांत नसल्यामुळें त्यानें व्यापाराचे सर्व कागदपत्र इंद्रायणींत बुडवून टाकिले; व तो ईश्वरोपासना करूं लागला. तो पंढरीची वारी करीत असे व कथा करीत असे. आपण केलेला अभंग म्हणून त्याचा अर्थ स्पष्ट करून दाखवावा आणि लोकांस बोध करावा हा त्याचा उद्देश असे. कथा

करण्याची चाल तेव्हांपासूनच पडली असें म्हणतात. त्यानें केलेले हजारों अभंग म्हणजे वारकरी मंडळींत बसून भजन आणि उपदेश करीत असतां स्वयंस्फूर्तीनें प्रगट झालेले त्याचे उद्गार होत. आणि यामुळेंच त्याची भाषा पूर्ण प्रासादीक, रसाळ आणि प्रेमळ आहे. त्याच्या सोप्या व साध्या भाषेंत एक प्रकारचा जोर आहे, आणि त्यामुळेंच त्यानें केलेल्या उपदेशाचा मनावर चांगला ठसा उमटतो.

**रामदास**--[ १६०८--१६८१ ] हा ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. ह्याचें पहिलें नांव नारायण असें होतें, परंतु तो रामभक्त होता म्हणून त्याचें नांव रामदास असें पडलें. तो लहानपणापासून विरक्त असे, व आजन्म ब्रह्मचारी होता. तो प्रथमारंभीं तीर्थयात्रा करीत फिरत असे. पुढें शिवाजीची राज्यस्थापना होऊं लागल्यावर तो परळीच्या किल्ल्यावर येऊन राहिला. तेथें संतमंडळी जाऊं येऊं लागल्यामुळें त्या किल्ल्यास सज्जनगड असें नांव पडलें. याचा शिष्यसंप्रदाय फार मोठा होता. रामदासीपंथ स्थापून त्यानें रामभक्तीचा प्रसार केला. त्याला स्वदेश व स्वधर्म याचा फार अभिमान होता शिवाजीच्या राज्यस्थापनेस याचें बरेंच साह्य झालें असें समजतात. दासबोध, रामायण, सुंदरकाण्ड, युद्धकाण्ड, मनाचे श्लोक व इतर बरेच अभंग, भजनी पदें, स्तोत्रें व श्लोक असें त्याचें बरेंच काव्य प्रसिद्ध आहे. त्याची कविता सुलभ आणि भक्तिरस प्रधान असून, भाषा साधी पण जोरदार आहे, आणि त्यांत व्यवहारज्ञानही पुष्कळ आहे.

**मोरोपंत**-[ १७२९--१७९४ ]-हा जातीचा कऱ्हाडा ब्राम्हण, उपनांव पराडकर. याचें मूळ ठिकाण पन्हाळा असून तो बारामती आणि पंढरपूर येथें राहात असे. हा संस्कृत पंडित असून मराठी भाषेवर त्याचें चांगलें प्रभुत्व होतें. हा जुन्या मराठीचा उत्तम कवी आहे. याची कविता सुमारें पाऊण लक्ष आहे. भारत, रामायण, भागवत यांतील मूळ कथा घेऊन त्या त्यानें मराठींत आपल्या शैलीनें वर्णिल्या आहेत. त्यानें निरनिराळ्या तऱ्हेनें १०८ रामायणें रचिलीं आहेत. त्याची स्वतंत्र कविताही पुष्कळ आहे त्याची कांहीं कविता निरनिराळ्या श्लोकवृत्तांत आहे, परंतु बहुतेक आर्यावृत्तांतच आहे. त्याची भाषा शुद्ध, प्रौढ, झोकदार, रसभरीत व अनेक अर्थालंकारांनीं भरलेली असते. याचे अनुप्रास व यमक हे शब्दालंकारही चांगले असून क्वचित् श्लेषात्मक रचनाही असते. त्याच्या भाषेंत संस्कृत शब्दांचा भरणा फार. संस्कृत शब्दांचा मराठींत यथायोग्य उपयोग कसा करावा हें मोरोपंतांच्या काव्याच्या अभ्यासानेंच शिकावें. याच्या काव्यांत वेदांत नाहीं परंतु भक्तिरस पुष्कळ आहे.

**कृष्णशास्त्री चिपळूणकर**—[ १८२४ ते १८७८ ] अर्वाचीन मराठी वाङ्मयाच्या सुरवातीचे हे एक मुख्य ग्रंथकार होत. इंग्रजी व संस्कृत यांचा कित्ता पुढें ठेवून उत्तम मराठी भाषा कशी लिहावी हें शास्त्रीबोवांनीं दाखवून दिलें. त्यांचें लेखन गद्य व पद्य दोन्ही रूपांत आहे. मराठी कवितेला अर्वाचीन वळण लावण्याचा प्रयत्न यांनींच प्रथम केला म्हटलें तरी चालेल. त्यांचें साकीबद्ध मेघदूत व बऱ्याच स्फूट कविता प्रसिद्ध आहेत. त्यामुळाचें सुंदर भाषांतर केलेल्या आहेत. आरबी भाषेंतील गोष्टी, साक्रेटिसाचें चरित्र, रासेलस वगैरे भाषांतर केलेलीं त्यांचीं पुष्कळ गद्य पुस्तकेंही प्रसिद्ध आहेत. प्रसिद्ध विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचे हे वडील होत.

**चिंतामणी पेठकर**—हे अगदीं आरंभींच्या अधुनीक कवींपैकीं एक होत. दक्षिणाप्राइझ् कमेटीनें गंगानदीवर काव्य करण्यास बक्षीस ठेविलें, तेव्हां यांचें " गंगावर्णना " हें भावना प्रधान उत्तम काव्य रचिलें गेलें.

**वामन दाजी ओक**—हे नागपुरास राहात असत. त्यांनीं आपल्या गद्य व पद्य लेखनद्वारें मराठी वाङ्मयाची फार मोठी सेवा केली आहे. काव्यसंग्रहांत प्राचीन मराठी कवींच्या कवितांवर यांनीं इतर कांहीं मित्रांच्या साहाय्यानें उत्तम चिकित्सात्मक टिपणें लिहिलीं आहेत. त्यांचीं ' लॉर्ड बेकन, ' व ' बाबा नानक ' यांचीं चरित्रें प्रसिद्ध आहेत. मोरोपंतांच्या कवितेचा त्यांचा अभ्यास दांडगा होता. " थोरले माधवरावावरील काव्य " त्यावेळचे मासिकांतून प्रसिद्ध झालें होतें, तें फारच चांगलें आहे. शिवाय त्यांची किरकोळ कविता पुष्कळ असून ती ' पुष्पवटिका ' या पुस्तकांत प्रसिद्ध झाली आहे.

**रा. ब. विष्णु मोरेश्वर महजनी**, एम्. ए. ( जन्म सन १८५१ मृत्यु १९२१) हे कवी, ग्रंथकार, इंग्रजी, संस्कृत आणि मराठी या भाषा उत्तम जाणणारे, आणि मराठी निबंधकार व मार्मिक टीकाकार होते. त्यांनीं वऱ्हाडच्या शाळाखात्यांत शिक्षकाचें व इन्स्पेक्टरचें काम केलें. त्यांनीं शेकस्पीअरच्या आधारें कांहीं नाटकें लिहिलीं; व कांहीं इंग्रजी कवितांचीं सुंदर भाषांतरें केलीं आहेत, तीं " कुसुमांजली " या पुस्तकांत आहेत. या भाषांतरांना मराठीच्या दृष्टीनें नवीन तऱ्हेची काव्यसरणी आहे.

**दत्त** ( दत्तात्रय कोंडो घाटे बी. ए. ) [ जन्म सन १८७५ मृत्यु सन १८९९ ]. यांचे मूळ गांव अहमदनगर जिल्ह्यांतील श्रीगोंदे,

जात मराठा. अल्पवयांतच त्यांच्या शिक्षणास सुरवात झाली; व मिशनरी लोकांच्या मदतीमुळें ते १५ व्या वर्षी म्याट्रिक झाले, व १८९८ त बी. ए. झाले. लहानपणापासूनच त्यांना कविता करण्याचा नाद असे. इंग्रजी कवींचा त्यांनीं पुष्कळ अभ्यास केला होता. व तो त्यांचा अत्यंत आवडीचा विषय असे. त्यांची कविता बहुतेक सृष्टीवर्णनपर असून त्यांत नैसर्गिक प्रेम, नाजूक अभिरुची, माधुर्य व मार्दव हे गुण विशेश दिसतात. ते अत्यंत अल्पायुषी झाले, नाहींतर त्यांनीं अर्वाचीन कवितेंत पुष्कळ चांगली भर टाकली असती.

**वामन आबाजी मोडक** [ जन्म सन १८३५ मृत्यु सन १८९७ ] दापोली जवळ गव्हें येथें यांचा जन्म झाला. आरंभीचे शिक्षण त्यांनीं माधुकरी मागून केले, कारण वडील लहानपणींच वारले होते. पण नंतर दापोली येथें एका सद्गृहस्थाच्या साह्यानें त्यास इंग्रजी शिक्षण मिळालें. पुढें मुंबईस बऱ्याच अडचणी सोसून त्यांनीं १८५९ त म्याट्रिकची परिक्षा दिली, व १८६२ त बी. ए. झाले. त्याच वर्षी बी. ए. ची परिक्षा प्रथम झाली. त्यांना संस्कृत वाङ्मयाची फार आवड असे. त्यांनीं शिक्षणाचें कामांत सर्व आयुष्य घालविलें. मराठी कवींमध्यें त्यांना ज्ञानेश्वर, एकनाथ, मुक्तेश्वर, व तुकाराम हे फार प्रिय असत. ईश्वर प्रार्थनेला गाण्याचे साह्य मोठे असतें, म्हणून त्यांनीं मुद्दाम गवई ठेऊन त्याच्या साह्यानें मराठींत प्रार्थनापर व उपदेशपर अनेक पदें रचलीं. त्यांची भाषा सोपी, सरळ, शुद्ध आणि भारदस्त असे.

**मोगरे** [ १८८१-१९०४ ]-प्राचीन विचार आणि प्राचीन वृत्तांची आणि रचनेची पद्धत बरीचशी कायम ठेवून रचना करणारे हे नवीन कवी होते. यांची कविता लहान लहान चुटके नसून बरींच लांब काव्यें असतात. यांनीं नवीन विषयांवर विशेषतः श्लोकवृत्तांत कविता केली आहे. सुबोध व मधुर शब्दरचना हा यांच्या कवितेचा मुख्य गुण असल्यामुळें वाचकाचें मन सहज मोहून जातें. त्यांच्या कवितेचे विषय कठीण व डौलदार नसतात, आणि भाषा साधी, शुद्ध आणि व्यवस्थित असते. "कादंबरीसार" "दयानंद काव्य" हीं त्यांचीं काव्यें प्रसिद्ध आहेत. त्यांची इतर कविता "मोगऱ्यांचीं फुलें" या नांवानें पुस्तकरूपानें पांच भागांत प्रसिद्ध झाली आहे.

**रे० नारायण वामन टिळकः**—[ १८६५-१९१९ ] यानीं नवीन प्रकारच्या कवितेला सुरवात केली. यानीं जुनें वळण अगदींच सोडलेलें नाहीं, परंतु त्यांच्या कवितेचें विषय व त्यांतील विचार बहुतेक

नवीन धोरणाचे असतात. हे लहानपणापासून कविता करीत पुढें ख्रिस्ती धर्म स्वीकारल्यावर त्यांनीं भाविक भक्तिरसमय कविता पुष्कळ केली आहे. तुकारामाच्या अभंगाच्या धर्तीवर यांनीं पुष्कळ बोधपर व भक्तिपर अभंग केले आहेत, व "ख्रिस्तायन" नामक ख्रिस्ताचे चरित्रावर ओवबिद्ध काव्य केलें आहे. हे शांत व प्रेमळ स्वभावाचे भावीक गृहस्थ होते. आपल्या साधुसंतांच्या भक्तिपर विचारांकडे त्यांचा ओढा असे. ते हिंदुधर्माचे द्वेष्टे नसून त्यांतील ईश्वरपर व भक्तिपर विचारांना नवीन वळण लावण्याचा त्यांचा प्रयत्न असे. तसेंच त्यांना आपला देश, लोक व भाषा यांचा फार अभिमान असे. त्यांची भाषा गोड, सरस, साधी, सोपी व अत्यंत प्रेमळ असून कवितेची रचना शुद्ध व टापटिपीची असते. त्यांनीं मराठी कवितेला लावलेलें नवीन वळण फार चटकदार आहे. त्यांची गद्य लिहिण्याची शैलीही चांगली होती.

**केशवसुत** (कृष्णाजी केशव दामले)-[१८६६-१९०५] यांनीं मराठी कवितेला नवीन वळण पूर्णपणें लावून दिलें. नवीन सुधारणेचे व देशाभिमानाचे विचार यांच्या कवितेंत पुष्कळ असून ते उत्तेजक व उत्साहक आहेत. सुधारणा, सृष्टिवर्णन, तत्वज्ञान, उपदेश, प्रेम--काव्य वगैरे विषय त्यांच्या कवितेंत येतात. त्यांचीं काव्यें इंग्रजींत ज्यांना Lyrics आणि Odes (गीतें अथवा लघुकाव्यें) म्हणतात, तशा प्रकारचीं आहेत. त्यांच्या भाषेंत कठीण शब्द अथवा रचना बहुधा नाहीं. परंतु भाषेच्या टापटिपीकडे यांचें फारसें लक्ष नसे आणि त्यांच्या कवितेंत संक्षिप्त विचार फार असतात, यामुळें ती टिळकांच्या कविते इतकी सरळ व सहजबोध होण्याजोगी नाहीं. त्यांची कविता रसप्रधान असून सध्याच्या परिस्थितींत सुचणारे विचार मनोद्गाराच्या रूपानें जागोजाग आलेले आहेत, ते सुंदर आहेत.

**गोविंदाग्रज** (राम गणेश गडकरी)--[१८८६--१९१७] नवीन प्रकारची कविता करण्यांत या कवींनीं रे० टिळक व केशवसुत यांच्या पुढें पाऊल टाकलें आहे. आपल्या कवित्वाचा आरंभ केशवसुताच्या अनुकरणानें झाला असें ते स्वतःच म्हणत, परंतु आपल्या रचनेंत पुष्कळ ठिकाणीं त्यांनीं केशवसुतांवर ताण केली आहे. तथापि त्यांच्या कवितेंत तात्विक व गहन विचार त्या दोघा कवींच्या इतके नसतात. यांचें वर्णन रसभरीत असून सुंदर कल्पनामय व संवेदनात्मक असतें. यासंबंधानें त्यांनीं टिळक व केशवसुत यांपेक्षां इंग्रजी कवींचें जास्त अनुकरण केलेलें आहे. भोंवतालीं दिसणारे पदार्थ पाहून

त्यावरून सुचलेले सहज उद्गार सुंदर रितीनें प्रगट करणें हें नवीन तऱ्हेचें कार्य यांना चांगलें साधलें आहे. यांच्या बहुतेक कविता लहान लहान गीतें आहेत. भाषेच्या दृष्टीनें त्यांची रचना टापटिपीची किंवा अगदीं शुद्ध नसते, तरी त्यांची भाषा वाचकास तल्लीन करणारी आहे; व तींत उपमा, रूपकें, उत्प्रेक्षा वगैरे पुष्कळ असतात. यांनीं कांहीं चांगलीं नाटकें रचिलीं आहेत, व कांहीं विनोदपूर्ण गद्य निबंधही लिहिले आहेत.

**कवि वसंत** (प्रि. वा. ब. पटवर्धन)–[१८६१–१९२२]–यांनीं डेक्कन एज्युकेशन सोसायटींत२०वर्षे काम केलें.कविता व नाटकें समजावून देण्याची त्यांची हातोटी फारच वाखाणण्यासारखी असल्यामुळें विद्यार्थीवर्गांत ते फारच प्रिय झालेले होते. मरणापूर्वी एक वर्ष ते फर्ग्युसन कॉलेजचे ॲक्टिंग प्रिन्सिपाल होते. कवि या नात्यानें ते विशेषसे कोणास माहीत नाहींत. त्यांनीं कविता बरीच लिहिली आहे, परंतु त्यापैकीं प्रसिद्ध अशी फारच थोडी आहे. त्यांची सर्व कविता नवीन प्रकारची आहे.

**गो. वा. कानिटकर** [१८५४–१९२०] यांचें "संमोहलहरी" हें नवीन धर्तीवर तत्त्वज्ञानविषयक काव्य आहे. "नारायणराव पेशव्यांचा वध" "अकबर" हीं त्यांचीं ऐतिहासीक काव्यें आहेत. हीं रसभरीत व उदात्त वर्णनपर आहेत. त्यांची इतरही किरकोळ कविता बरीच आहे.

**वासुदेवशास्त्री खरे**:–[सन १८५८–१९२४] हे कवी कोकणस्थ ब्राह्मण होते. ते मिरज येथें राहात. यांनीं तेथील हायस्कुलांत संस्कृत अध्यापकाचें काम पुष्कळ वर्षे केलें. यांनीं "यशवंतराव"म्हणून वीररस प्रधान महाकाव्य रचिलें, तें संस्कृत काव्याच्या धर्तीवर आहे. हें कल्पित कथानक असून त्याचा काळ मल्हारराव होळकर राजपुतान्यांत स्वाऱ्या करीत असतांनाचा घेतलेला आहे. त्यांची कांहीं किरकोळ कविताही आहे. त्यांची कविता चांगली रसभरीत, वर्णनपर असून भाषासरणी सोपी व बालबोध असते. यांच्या कवितेला अलीकडील वळणही बरेंच आहे. हे गद्यही चांगलें लिहीत. यांनीं 'गुणोत्कर्ष,' 'तारामंडळ' आणि 'शिवसंभव' हीं चांगलीं नाटकें आणि 'नाना फडणविसाचें चरित्र' व 'नानांचा अधिकारयोग' हीं ऐतिहासिक पुस्तकें व दुसरे अनेक लेख लिहिले आहेत. यांनीं इतिहाससंशोधनाचें कामही चांगलें चालविलें होतें.

**भास्कर रामचंद्र तांबे** [जन्म सन १८७४] या विद्यमान कवींचा जन्म ग्वाल्हेर संस्थानांत झाला. यांचे पूर्वज पेशवाईत गोविंद-

पंत बुंदेल्याबरोबर उत्तर हिंदुस्थानांत गेले. भास्कररावांस बालपणा-पासूनच कविता करण्याचा नाद असे. थोरल्या बंधूचे शिक्षणास परि-स्थितीमुळें अडवण येऊं नये म्हणून यांनीं स्वार्थत्यागपूर्वक कॉलेजच्या शिक्षणाचा नाद सोडून देऊन नोकरी धरिली. यांच्या कवितेंत भाषा-सौष्ठव व अर्थगौरव दोन्हीही दृष्टीस पडतात. त्यांच्या कवितेंत प्रसाद व माधुर्य असून त्यांची करुण व भक्तिरसपूर्ण कविता हृदयस्पर्शी असते. त्यांची बरीच कविता पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाली आहे.

**आनंदराव कृष्णाजी टेकाडे**–[ जन्म सन १८९१ ]–या वि-द्यमान कवीचें मूळ गांव नागपूर जिल्ह्यांतील मोहोपा हें होय. त्यांची स्फूट कविता पुष्कळ असून त्यांपैकीं बरीच "आनंदगीत" या त्यांच्या पुस्तकांत प्रसिद्ध झाली आहे. महाराष्ट्रांतील ठळक ठळक मासिकांतून त्यांच्या कविता नेहमीं प्रसिद्ध होतात. ते स्वतःही अनेक प्रसंगीं आपल्या खड्या आवाजांत आपली कविता गाऊन दाखवितात, त्यावेळीं श्रोतृवृंद तल्लीन होतो.

**लक्ष्मीबाई बेहरे**–[ १८९७–१९१४ ]–या कवयित्री प्रसिद्ध कवि रा. नारायण केशव बेहरे यांच्या पत्नी होत. यांच्या कविता मनोरंजन, आनंद वगैरे मासिकांतून प्रसिद्ध झाल्या आहेत.

**श्री. राधाबाई केळकर**–[ जन्म सन १८५७ ] कै. दामोदर गणेश केळकर, रत्नागिरी हायस्कूलचे हेडमास्तर यांच्या या पत्नी होत. या हल्लीं पुणें येथें राहतात. यांची काव्यरचना विशेषतः पौराणिक असून विपुल आहे, परंतु ती बहुतेक अमुद्रित आहे.

---

# शुद्धिपत्र.

| पृ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ५ | २५ | वाच | वाचा |
| ६ | २३ | धरवी | धरावी |
| ६ | २७ | शोधोनी | शोधोनि |
| ११ | १५ | दुसह | दु:सह |
| ११ | १९ | महात्सवातें | महोत्सवातें |
| १२ | ६ | वापिकेसमा | वापिकेसमान |
| १२ | १० | सांङ्ग | साङ्ग |
| १८ | ११ | किंचित | किंचित् |
| १८ | १२ | निश्चित् | निश्चित |
| १८ | २७ | कैमे | कैसे |
| २३ | १३ | जाप | चाप |
| २९ | २ | मुर्छा | मूर्च्छा |
| ३० | १४ | दावि | दावी |
| ३३ | ५ | एकुनी | ऐकुनी |
| ३८ | १६ | साधनाचें | साधनांचें |
| ३९ | ११ | मूर्ती | मूर्ती |
| ३९ | १७ | भांडारे | भांडारें |
| ३९ | २६ | सांष्टांग | साष्टांग |
| ४० | ८ | पिंपळी | पिंवळी |
| ४५ | १३ | मनोहर | मनोहरा |
| ४६ | १६ | नदादिकांवरी | नदादिकांवरि |
| ४७ | २ | तसे | तसें |
| ४८ | १५ | होईल | होइल |
| ५२ | ११ | तृषातु या | तृषार्त तुझ्या |
| ५३ | २३ | माठा | मोठा |

| पृ. | ओळ | अशुद्ध | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ५५ | ६ | हि न | हि सेविजे न |
| ५५ | १९ | मद्धस्ता | मद्धस्ता |
| ५८ | ७ | ब्रह्मांदिकांच्या | ब्रह्मादिकांच्या |
| ७८ | २४ | अशय | अयश |
| ८२ | ४ | उद्यांनीं | उद्यानीं |
| ८५ | २१ | अभिमन | अभिमान |
| ९१ | २१ | करितास | करितोस |
| ९७ | १७ | किर्तना | कीर्तना |
| ११० | ६ | कार्ठें | कोठें |
| १११ | ६ | कोठे | कोठें |
| १११ | १८ | त्यांवांचन | त्यांवांचून |
| १२६ | ७ | प्रेक्षुनियां | प्रेक्षूनियां |
| १३३ | १५ | भेटूनि | भेटुनि |
| १३३ | १६ | निवविं | निववी |
| १३५ | १४ | केलींचें | केलिचें |
| १४१ | ५ | विळतां | मिळतां |

---